नवभारत मासिक

वर्ष दुसरे -

आक्टोबर १९४८ ते

सप्टेंबर १९४९ अखेर

९

अनुक्रमणिका










नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# नवभारत



वर्ष २ रें ]   एप्रिल १९४९   [ अंक ७ वा



अनुक्रमणिका

वर्ष दुसरें
अंक पहिला

# नवभारत

आक्टोबर
१९४८

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रो. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

मुद्रक व प्रकाशक : श्री. र. ग. जोशी

मुद्रणस्थळ : सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार पुणें २। प्रकाशनस्थळ : नवभारत कचेरी, शिवाजीनगर, २१९ पुणें ५

# ' नवभारत ', आक्टोबर १९४८

## लेखक–परिचय

[ या अंकांतील लेखकांपैकीं ज्या लेखकांचे लेख ' नवभारतां 'त या अंकासमवेत पीहल्या प्रथमच येत आहेत, त्यांचा थोडक्यांत परिचय खालीं दिला आहे. बाकीच्या लेखकांचे लेख ' नवभारतां 'त पूर्वी आले असून त्या त्या वेळीं त्यांचा थोडक्यांत दिलेला परिचय वाचकांस विदित आहेच. — का. सं.]

**श्री. किशोरलाल घ. मश्रुवाला** ( वर्धा ) —' हरिजन 'चे संपादक, माजी गांधीसेवासंघाचे अध्यक्ष. ' बुद्ध अने महावीर ' ' गांधीविचारदोहन ' ' स्त्रीपुरुषमर्यादा ' 'Practical Nonviolence' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

**डॉ. अ. स अळतेकर** ( बनारस ) —बनारस हिंदु युनिव्हर्सिटीमध्यें प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृति या विषयाचे प्रधान प्राध्यापक, ' प्राचीन भारतीय शिक्षणपद्धति ' ' The position of Women in Indian Civilization " इत्यादि ग्रंथांचे कर्ते.

**श्री. वा. मु. लिमये**, एम्. ए. एल्एल्. बी. ( पेण ) —घटनाशास्त्र, घटनाकायदा, समाजशास्त्र इत्यादि विषयांचे व्यासंगी अभ्यासक. यांचे घटनाशास्त्रविषयक लेख 'संडे न्यूज ऑफ इंडिया' मध्यें व मराठी नियतकालिकांमध्यें प्रसिद्ध झाले आहेत.

**प्रा. प्र. रा. दामले** एम्. ए. एल्एल्. बी. ( पुणें ) —नौ. वाडिया कॉलेजमध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक.

**डॉ. अबीद हुसेन.** एम्. ए. पीएच्. डी. ( दिल्ली ) —दिल्ली येथील नॅ. मु. युनिव्हर्सिटीमधील शिक्षण व तत्वज्ञान यांचे प्राध्यापक. ' जामिआ ' या उर्दू मासिकाचे संपादक. गांधी व नेहरु यांच्या आत्मकथांचे, कान्टच्या Critique of Pure Reason वगैरे ग्रंथांचे यांनीं उर्दूत अनुवाद केले असून, ' परदा घफलत ' ( नाटक ), ' कौमियत और कौमी तहज़ीब ' इत्यादि त्यांचीं स्वतंत्र पुस्तकेंहि आहेत.

**श्री. वा ल. चिपळूणकर.** ( पुणें ) —थिऑसफिकल सोसायटीचे कार्यकर्ते व मराठी थिऑसफिकल फेडरेशनचे चिटणीस.

**प्रा. य. र. आगाशे** ( पुणें ) —नौ. वाडिया कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक. ' सारस्वतसमीक्षा ' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

**प्रा. म. वि. फाटक** ( अमळनेर ) —अमळनेर येथील प्रताप कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक. ' मराठी निबंध ' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

अनुक्रमणिका

श्री. शंकरराव देव

# 'नवभारता'चें पहिलें वर्ष

'नवभारत'ला दुसरें वर्ष लागलें. 'नवभारता'च्या जन्माचें ज्या प्रेमानें व ज्या उत्साहानें महाराष्ट्रीय विद्वानांनीं व जनतेनें स्वागत केलें, त्यामुळें त्याच्या संचालकाला व संपादकांना त्याचें संगोपन व संवर्धन करण्याला अतिशय प्रोत्साहन मिळालें. 'बहुजन–हिताय बहुजनसुखाय' अशा जीवनांत जें सत्य, शिव व सुंदर आहे तें प्रकाशित व प्रकट करून त्याचा साक्षात्कार करून घेण्याला महाराष्ट्रांतील स्त्री–पुरुषांना 'सर्वेषां अविरोधेन' या वृत्तीनें व तज्जन्य असांप्रदायिक दृष्टीनें मदत करणें ही 'नवभारता'ची भूमिका आहे.

## विद्वान् लेखकांस व वाचकांस धन्यवाद

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त मंडळाचा, एक उच्च प्रतीचें शैक्षणिक व सांस्कृतिक मासिक सुरू करण्याचा मनोदय आहे असें जेव्हां मीं महाराष्ट्रांतील लहानथोर विचारवंतांना कळविलें, तेव्हां मंडळाच्या या साहसी उपक्रमाचें त्यांनीं सहृदयतेनें व उत्सुकतेनें स्वागत केलें, अशा प्रकारचें वैचारिक मासिक चालविण्याच्या आमच्या शक्तिबुद्धीवरील आपला विश्वास प्रकट केला व या कार्यांत सर्वांनीं सर्व प्रकारचें साहाय्य व सहकार्य देण्याचें अभिवचन दिलें. या अभिवचनाच्या भांडवलावरच आम्हीं 'नवभारता'चा उपक्रम केला. गेल्या बारा महिन्यांतील 'नवभारता'चे लेखक व त्यांचे विषय यांच्यावरून नजर फिरविली तर त्यानें आपल्या प्रतिज्ञेनुसार 'सर्वेषां अविरोधन' या वृत्तीनें व असांप्रदायिक दृष्टीनें महाराष्ट्र–जनतेची शैक्षणिक व सांस्कृतिक क्षेत्रांत सेवा करण्यांत बरेंच यश मिळविलें आहे असें आम्ही सविनय पण साभिमान म्हणूं शकतों. गेल्या वर्षाच्या बारा अंकांत महाराष्ट्रांतील एकूण ब्याण्णव विद्वान् लेखकांचे सुमारें दीडशें लेख आले आहेत.

पहिल्या अंकापासूनच 'नवभारत'ला पहिल्या प्रतीचें मासिक म्हणून महाराष्ट्रांत मान्यता मिळाली व वाढत्या इंदुकलेप्रमाणें ती गेले बारा महिने वाढतच गेली. 'नवभारता'सारख्या उच्च प्रतीच्या शैक्षणिक व सांस्कृतिक मासिकाची समाजाला भूक आहे असें प्रचीतीला आलें. तथापि त्याचबरोबर ही बुद्धीची भूक भागविण्यासाठीं ज्या प्रकारच्या सात्त्विक व पौष्टिक अन्नाची आवश्यकता आहे, त्याचा सतत पुरवठा 'नवभारत' करूं शकेल किंवा नाहीं याबद्दल अनेक मित्रांचें मन पूर्वानुभवामुळें साधार साशंक होतें व भीति व आशा अश्या संमिश्र भावनांनीं ते आमच्या या प्रयत्नाकडे पाहत होते. पण भारतभू विद्वद्रत्नांची खाण आहे व महाराष्ट्र या खाणीचा एक संपन्न भाग आहे, अशी आमची स्वतःची श्रद्धा असल्यामुळें मित्रमंडळींच्या या भीतीनें आमच्या मनाला कधींच स्पर्श केला नाहीं. 'नवभारता'चे पहिले बारा अंक, आमची ही श्रद्धा किती सार्थ होती, याची साक्ष देत आहेत. जेवढें ताटांत वाढलें त्याच्यापेक्षां कितीतरी अधिक भांड्यांत होतें. 'नवभारता'ची थाळी 'सती द्रौपदीची थाळी' ठरली, या विधानांत अतिशयोक्ति नाहीं. ज्यांनीं ज्यांनीं या सरस्वतीच्या उपासनेंत व सांस्कृतिक साधनेंत आम्हांला साहित्य पुरविलें त्या सर्वांचे आम्ही ऋणी आहों.

## आशादायक भविष्यकाळ

'नवभारत'ला जशी विद्वानांची मदत झाली तशीच वाचकांची व वर्गणीदारांचीहि झाली असें आम्हांला म्हणतां आलें असतें तर तें दुधांत साखर पडल्याप्रमाणें झालें असतें व आमच्या समाधानांत स्वास्थ्याचीहि भर पडली असती. असें असलें तरी भविष्यकालाकडे आशामय नजरेनें पाहण्याइतकी ती झाली आहे असें जाहीर करण्यांत आम्हांला








आनंद होत आहे. 'नवभारत' स्वावलंबी झाला तरच तो महाराष्ट्राची व भारताची सेवा करूं शकेल येवढें येथें सांगितलें म्हणजे या बाबतींत ज्यांचीं जीं कर्तव्यें असतील तीं ते जागरूकतेनें करतील असें आम्ही मानतों. 'न धनेन, न प्रजया, त्यागेनैके अमृतत्वमानशुः' या ऋषिवचनावर 'नवभारता'ची श्रद्धा आहे.

दुसऱ्या वर्षाच्या आपल्या कार्याला 'नवभारत' श्रद्धेनें व उत्साहानें प्रारंभ करीत आहे. भारताचा स्वातंत्र्य–रवि उदयाला आल्यानंतरच त्याची सेवा करण्यासाठीं 'नवभारता'चा जन्म झाला. १५ ऑगस्ट १९४७पूर्वी स्वातंत्र्य आमचें साध्य होतें; अखंड विकास हा मानवी जीवनाचा धर्म असल्यामुळें कालचें साध्य आजचें साधन झालें आहे. स्वातंत्र्य मिळालें; स्वातंत्र्याचा उपयोग कसा किंवा कशासाठीं करणार ? या प्रश्नाचें उत्तर दिलें पाहिजे. मिळालेल्या स्वातंत्र्याचा नवा समाज निर्माण करण्यासाठीं उपयोग करूं असें आम्हीं जाहीर केलें आहे. नव्या समाजाची निर्मिति म्हणजे नव्या मानवाची आणि नव्या संस्कृतीची निर्मिति होय.

## ईश्वराची नितान्तसुंदर कलाकृति

सृष्टीला प्रारंभ झाल्यानंतर हजारों–लाखों वर्षांनीं पृथ्वीवर मनुष्य निर्माण झाला. एकादा कलाकार मनाप्रमाणें मूर्ति तयार झाली नाहीं तोंपर्यंत नाना मूर्ती बनवीतच राहतो, तसें ईश्वराच्या वा निसर्गाच्या बाबतींत झालें. मानवाची मूर्ति तयार करीपर्यंत ईश्वरानें अनंत मूर्ती घडविल्या आणि जणूं मानवाची मूर्ति तयार होतांच त्यानें आपलें काम थांबविलें. मानवाकडे पाहतांच त्याला असें वाटलें असावें कीं आपल्या कल्पनासृष्टींतील सर्वोत्कृष्ट मूर्तीला प्रत्यक्ष स्वरूप देण्यांत आपण संपूर्णतया सफल झालों ! यांत संशय नाहीं कीं ईश्वराच्या सर्व कलाकृतींत मानव ही त्याची नितांत सुंदर कलाकृति आहे. कारण, आपली स्वतःची मूर्ति डोळ्यांपुढें ठेवूनच त्यानें ती बनविली आहे ! फरक येवढाच कीं आपले सर्व गुण ईश्वरानें मानवाला जन्मतःच दिलेले नाहींत, तर बीजरूपानें त्याच्यांत ठेवले आहेत व ते विकसित करून घेण्याची शक्ति त्याला दिली आहे. ज्यानें आपल्याला निर्माण केलें त्याच्या स्वरूपाप्रत प्रयत्नानें प्राप्त होण्याची शक्ति ईश्वरानें फक्त माणसालाच दिली आहे. "तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः । गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥" या सिद्धान्ताची सत्यता पटवून देणारा एक मानव नुकताच आमच्यांत होऊन गेला.

## एक उंच हिमालय, बाकी सपाट !

या भूतलावर मधून मधून असे पुरुष अवतरतात कीं, जे आपल्या जीवन–साधनेनें पुरुषाला पुरुषोत्तम होणें शक्य आहे असा श्रद्धादीप मानवी हृदयांत लावतात. मानवाच्या मूळ स्वभावांत कांहीं सुधारणा झालेली असेल तर त्याचें प्रधान कारण सर्व विश्वाबद्दल ज्यांच्या अंतःकरणांत स्नेह व सहानुभूति आहेत अश्या व्यक्ती मानवसमाजांत मधून मधून निर्माण झाल्या आहेत हेंच होय. तथापि 'एक उंच हिमालय तर बाकी सर्व सपाट पृथ्वी' अशीच आजपर्यंत मानवाची स्थिति आहे. मधून मधून अश्या महाविभूती मानवसमाजांत जन्म घेत असल्या तरी सर्वसाधारण मानव आज हजारों वर्षें आहे तसाच आहे. अर्थात मानवजातींत 'युगे युगे' अश्या ज्या विभूती जन्म घेतात त्या मानव–जातीला प्रगतीचा कोणता टप्पा गांठावयाचा आहे व गांठणें शक्य आहे आणि त्याचा मार्ग काय हें दर्शवितात.

शास्त्र व कला यांच्यामध्यें जी विलक्षण वाढ तशीच प्रगति झाली आहे, तिनें माणसांत बरीच सुधारणा केली आहे असें मान्य केल्याशिवाय गत्यंतर नाहीं; पण अनुभव असा येतो कीं, ही सुधारणा पुष्कळशी वरवरची आहे. कारण, जेव्हां मनोविकार क्षुब्ध होण्याचे प्रसंग उद्भवतात, तेव्हां सुधारलेले लोकहि पशूंप्रमाणें वर्तन करूं लागतांना दिसतात. ज्यांनीं आपलें जीवन एकाद्या श्रेष्ठ ध्येयाला अर्पण केलेलें आहे व ज्यांचा व्यवहार स्वार्थानें व 'कळप'–वृत्तीनें प्रेरित होत नाहीं अश्या व्यक्ती अशा आणीबाणीच्या प्रसंगीं संयम पाळतांना आढळतात. परंतु सर्वसाधारण मानवाची हजारों वर्षांपूर्वी जी नैतिक, बौद्धिक व सांस्कृतिक पातळी होती तीच जवळ जवळ आजहि आहे, असें मोठ्या दुःखानें म्हणावें लागतें. सामान्य जनता आहे तशीच अज्ञानी आहे. स्वतंत्रता, समता व बंधुता हीं आध्यात्मिक व सांस्कृ-








तिक मूल्यें प्राचीन कालांतल्याप्रमाणें अर्वाचीन कालींहि सामान्य जनतेला दुर्मिळच आहेत. मानवी व्यवहारांत या मूल्यांचा आविष्कार कसा होईल ही समस्या अनेक क्रांत्या करूनहि मानवाला अद्याप सुटलेली नाहीं.

### संस्कृतीचीं भांडारें जनतेला लुटूं द्या

मानवाच्या या अपयशाचें मुख्य कारण आजपर्यंत त्यानें हीं मूल्यें संघर्ष व सत्ता यांच्या द्वारें मानवी समाजांत प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला आहे, हें होय. निसर्गांत विषमता आहे, माणसांमाणसांमध्यें गुण–भेद आहेत, म्हणून कर्म–भेद वा व्यवसाय–भेदहि आहेत. असें असूनहि गुणकर्मांच्या भेदामुळें कोणालाहि खास हक्क (Privilege) न मिळतां मानवी समाजांत खरी समता व खरी बंधुता स्थापन करावयाची व प्रत्येकाला स्वयंविकासासाठीं संपूर्ण स्वातंत्र्य मिळावयाचें, तर तें शक्तीच्या वा सत्तेच्या जोरावर होणार नाहीं. त्याला हृदयपरिवर्तनाची जरूरी आहे व हें हृदयपरिवर्तन शैक्षणिक व सांस्कृतिक क्रांतीनेंच घडून येईल. समाजांतील श्रेष्ठ वर्गांनीं आपल्याजवळील संस्कृतीचीं भांडारें दामाजीपंतानें धान्याचीं कोठारें लुटूं दिलीं तशीं स्वखुषीनें सामान्य जनांना लुटूं दिलीं पाहिजेत. त्यांनीं लोकांना शिक्षण दिलें पाहिजे व सुसंस्कृत केलें पाहिजे. लोकांना स्वावलंबी शिक्षण मिळाल्याशिवाय व त्यांचा सांस्कृतिक दर्जा वाढल्याशिवाय खरें स्वातंत्र्य वा खरी समता स्थापन होणें शक्य नाहीं.

स्वातंत्र्य, समता व बंधुता या आध्यात्मिक वा सांस्कृतिक मूल्यांची महती जनतेला पटवून द्यावयाची आणि समाजांतून व त्याच्या सर्व व्यवहारांतून या मूल्यांचा आविष्कार करावयाचा तर या मूल्यांचा नाश करणाऱ्या ज्या दोन मुख्य गोष्टी—सत्ता व तिच्यासाठीं संघर्ष—त्या टाळल्या पाहिजेत. सर्व मूल्यांत जें श्रेष्ठ मूल्य—मानव व त्याची मानवता—त्याचें रक्षण करणें हाच श्रेष्ठ धर्म मानला पाहिजे. देश, धर्म, पंथ, वाद यांच्या नांवावर या सर्वश्रेष्ठ मूल्यांचा बळी गेला तरी हरकत नाहीं अशी विचारसरणि कांहीं ठिकाणीं दिसून येत असून तिचा परिणाम म्हणजे ज्याच्यासाठीं हें सर्व, तो मानव व त्याची मानवताच आज नष्ट होऊं पाहत आहेत !

### विचारवंतांस प्रार्थना

या महत्संकटांतून साऱ्या मानवजातीची मुक्तता करावयाची तर माणसांमाणसांमध्यें भेद पाडणाऱ्या धर्म, पंथ वा वाद यांसारख्या सर्व वस्तू बाजूला सारून मानवधर्माची प्रस्थापना व त्याचें पालन झालें पाहिजे व त्यासाठीं लोकांना सोदाहरण शिक्षण दिलें पाहिजे. भेदांतून सर्व अशुभच निघतें तर अभेदांतून शुभ वा चांगलेंच निघतें. मूळ स्वरूपांत सर्व सारखेंच आहे. प्रत्येक नरामध्यें जो नारायण आहे त्याची प्रचीति त्याला आली म्हणजे, त्याच्या हातून अशुभ असें कांहीं होणारच नाहीं व त्याचीं पावलें कल्याणमार्गावर पडतील, अशी या मानवधर्माची श्रद्धा असली पाहिजे. ज्यांची अशी श्रद्धा असेल तेच लोकशिक्षणाच्या द्वारा नवा समाज व नवी संस्कृति निर्माण करूं शकतील. ज्यांनीं ज्यांनीं या नवधर्माची दीक्षा घेतली आहे व ही श्रद्धाच ज्यांच्या जीवनकार्याची प्रेरक शक्ति आहे अशा महाराष्ट्रांतील आणि भारतांतील सर्व लोकसेवकांच्या व लोकशिक्षकांच्या शैक्षणिक व सांस्कृतिक प्रयत्नांची 'नवभारत' ही केंद्रशक्ति बनावी असा नवभारताच्या संचालकाचा व संपादकांचा सतत प्रयत्न राहील. या आपल्या प्रयत्नांत महाराष्ट्रांतील विचारवंत व वाचक यांचेकडून पहिल्या वर्षीं जें सहकार्य त्यांना मिळालें त्यापेक्षांहि अधिक दुसऱ्या वर्षीं मिळेल असा त्यांना विश्वास वाटतो.

---

सर्व गोष्टींना मानदंड एकच. तो म्हणजे मानव हा होय.










# स्थूल विषयवार समालोचन

'नवभारता 'नें एक विशिष्ट विशाल ध्येय आपल्या डोळ्यांपुढें ठेवून पहिल्या वर्षांत सांस्कृतिक साधना करण्याचा जो कसोशीनें प्रयत्न केला त्याचें स्वरूप ' नवभारतां 'त गेल्या वर्षी प्रसिद्ध झालेल्या लेखांवरून वाचकांस दिसून येईल. राजकारण, समाजकारण, अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान, मानसशास्त्र, विज्ञान, ललितकला, विदग्ध वाङ्मय इत्यादि सुसंस्कृत जीवनाच्या विविध क्षेत्रांतील महत्त्वाच्या विषयांवर तज्ज्ञांचे व्यासंगी अभ्यासूंचे व सेवापरायण कार्यकर्त्यांचे लेख 'नवभारता 'नें वाचकांस सादर केलेले आहेत.

गेल्या वर्षांत साधारणतः राजकारणविषयक लेख पंचवीस येऊन गेले असून त्यांतून, जागरूक वाचकांच्या मनांपुढें साधारणतः ज्या राजकारणविषयक समस्या उभ्या राहिल्या असतील, त्यांचा सूक्ष्म ऊहापोह झालेला आढळून येईल. अभूतपूर्व अशा शांतिमय मार्गानें झालेलें हिंदुस्थानांतील सत्ता–संक्रमण, त्याच वेळीं झालेलें हिंदुस्थानचें दारुण विच्छेदन व या विच्छेदनानंतर स्वतंत्र हिंदुस्थाननें अनुभविलेलीं भयंकर संकटें तश्याच वेदना, त्या संकटांना व वेदनांना धैर्यानें व खंबीरपणें तोंड देणारें राष्ट्रीय सरकार व त्या सरकारपुढील नाना प्रश्न, हिंदुस्थानचें राज्य धर्मभेदातीत ( Secular ) ठेवण्याची जरूरी, भारतानें ज्या अपूर्व मार्गानें स्वातंत्र्य मिळविलें त्याचें जगाच्या इतिहासांत स्थान, त्यामुळें स्वतंत्र नवभारत जगाला कोणती नवी दृष्टि देईल व नवीन जग निर्माण करण्यास किती मदत करील याचा ऊहापोह, भारतीय राजकारणांतील निरनिराळे राजकीय पक्ष व त्यांच्या तत्त्वप्रणाली यांची तर्कशुद्ध मीमांसा, सर्व पक्षांनीं सहिष्णुतेनें व उदारतेनें वागण्याची जरूरी, संयुक्त महाराष्ट्रासारख्या भाषावार प्रांतांची आवश्यकता व शक्यता, मुंबईचा प्रश्न, काश्मीर वगैरे विषयांवर आचार्य जावडेकर, प्रा. पुणतांबेकर, श्री. ह. कृ. मोहनी, आचार्य दादा धर्माधिकारी, प्रा. शेजवलकर, त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी, श्री. सोवनी प्रभृतींचे लेख वेळोवेळीं 'नवभारतां'त आले आहेत. भारतीय राजकारणाशिवाय चीन, रशिया, पॅलेस्टाइन, मध्य युरोप, या देशांतील राजकीय परिस्थिति, तिची ऐतिहासिक भूमिका, संयुक्तराष्ट्रसंघटनेचें स्वरूप व तिचें कार्य यांची मूलगामी चिकित्सा प्रा. कोगेकर, श्री. दि. के. बेडेकर, श्री. सतीश कालेलकर, श्री. गो. मा. कुलकर्णी इत्यादिकांच्या लेखांतून केलेली आढळून येईल. मार्क्सचा जाहीरनामा निघून शंभर वर्षें झालीं त्या निमित्तानें मार्क्सवादाचें निरनिराळ्या भूमिकांवरून केलेलीं समालोचनें आचार्य जावडेकर आणि प्रा. कामत यांच्या लेखांत दिसून येतील.

'गांधीजींचा अमानुष खून' या घटनेनें हिंदुस्थानला व जगाला जो हादरा बसला त्याचे वैचारिक पडसाद 'नवभारतां 'त येणें अपरिहार्यच होतें. फेब्रुवारीच्या अंकांत गांधीजींचें व्यक्तिमत्त्व व जीवनकार्य यांसंबंधीं आचार्य जावडेकर, म. म. पोतदार व श्री. देव यांचे लेख आलेले आहेत. गांधीजींच्या खुनानंतर देशांत, विशेषतः महाराष्ट्रांत, जी दंगल माजली तिची कारणमीमांसा करण्याचा प्रयत्न अनेक विचारवंतांनीं केला आहे. महाराष्ट्रीय समाजाला बसलेल्या या भूकंपासारख्या हादऱ्याची चिकित्सा श्री. चापेकर, प्रा. पुणतांबेकर व डॉ. दप्तरी यांनीं 'नवभारतां 'तून केलेली आहे. गांधीजींच्या खुनानंतर गांधीप्रेमी कार्यकर्ते सेवाग्रामला जमले व त्यांनीं धीरोदात्तपणें आपलें दुःख गिळून 'सर्वोदय समाजा'ची स्थापना केली, या महत्त्वपूर्ण घटनेचाहि साधारण सविस्तर परामर्श 'नवभारतां 'त आला आहे.








# स्थूल विषयवार समालोचन

'नवभारतां'त गेल्या वर्षांत सामाजिक व शैक्षणिक विषयांवर आलेले लेख एकवीस आहेत. त्यांपैकीं कांहींतून सामाजिक विकासाच्या मूलतत्त्वांची चर्चा केली असून, इतरांतून सामाजिक संस्कारांचा, सामाजिक उत्सवांचा व इतर सामाजिक स्थितीचा प्राचीन काळचा व अर्वाचीन काळचा इतिहास अत्यंत उद्बोधक रीतीनें चर्चिलेला आढळून येईल. याबाबत उदाहरणादाखल आर्यांची विवाहसंस्था(डॉ. दप्तरी), दिवाळीचा इतिहास (प्रा. गोडे), आदिवासी (आचार्य कालेलकर) व पाश्चात्य विद्येच्या प्रकाशांत (प्रा. सरदार) या लेखांचा उल्लेख करतां येईल. 'महानुभावपंथाच्या सामाजिक दृष्ट्या क्रान्तिकारक कार्या'ची चर्चा आचार्य भागवतांनीं केली असून प्रा. कोलते यांनीं महानुभावांच्या तत्त्वज्ञानाची चर्चा करून ते कसे अवैदिक आहेत याचा ऊहापोह केला आहे. शिक्षणाची पुनर्घटना व प्रौढ शिक्षणाचें साध्य या विषयांवरील श्री. के. जी. सैयिदेन यांच्या मूलगामी व स्फूर्तिप्रद लेखांचे 'नवभारत'मध्यें समग्र अनुवाद देण्यांत आले आहेत. प्रा. के. रा. कानिटकर यांनीं पुणें–विश्वविद्यालयाबाबत इष्ट ती नवीन दिशा विचाराकरतां मांडली आहे.

मानसशास्त्र, त्याचप्रमाणें जीवन आणि तत्त्वज्ञान, यांसंबंधीं 'नवभारतां'तून गेल्या वर्षी चौदा लेख आले आहेत. नवीन मानसशास्त्राच्या भूमिकेवरून लेखक श्री. मोरे यांनीं गुन्हेगार हे गुन्हेगार कां बनतात याची चिकित्सा केली असून, श्री. आठल्ये यांनीं आधुनिक मानसशास्त्राच्या सिद्धान्तांचें दिग्दर्शन केलें आहे. प्राचीन भारतीय मानसशास्त्राचें तुलनात्मक दिग्दर्शन श्री. कृ. के. कोल्हटकर यांनीं आपल्या पहिल्या लेखांकांत केलें असून त्यांचे पुढील लेखांक येत्या वर्षी 'नवभारतां'तून येतील. भारतीय तत्त्वज्ञानांतील निरनिराळ्या दर्शनांचें अत्यंत उद्बोधक आणि मार्मिक समीक्षण एका नवीन दृष्टिकोनांतून त. तीं. लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं दोन लेखांत केलें आहे. तत्त्वज्ञानांत अनुभवाचें महत्त्व काय हें श्री. केदारनाथ यांनीं आपल्या लेखांत विशद केलें आहे.

याच सदराखालीं 'नवभारता'नें एक स्फूर्ति–दायक व अभिनव लेखमाला सुरू केलेली आहे. तिचें नांव 'माझ्या जीवनाचें तात्त्विक अधिष्ठान' हें असून तींत सेनापति पां. म. बापट, महर्षि अण्णासाहेब कर्वे, श्री. श्रीकृष्णदास जाजू, या निरनिराळ्या क्षेत्रांतील पराक्रमी जीवनवीरांनीं आपले लेख दिले आहेत. याच विषयावरील आपल्या विचारांचें त्रोटक दिग्दर्शन श्री. ना. गो. चापेकर यांनींहि केलें आहे. धर्मानंद कोसंबी यांचेहि याच विषयावरील विचार संगृहीत करण्यांत आले आहेत.

अर्थशास्त्रविषयक असे दहा लेख 'नवभारतां'त गेल्या वर्षी येऊन गेले आहेत. हिंदुस्थानसमोर वेळोवेळीं उत्पन्न झालेले भारतीय आर्थिक प्रश्न—नियंत्रणें, वि-नियंत्रणें, स्टर्लिंगशिल्लक व हिंदी—अमेरिकन करार—यांवर प्रा. धनंजयराव गाडगीळ, ना. रा. कृ. पाटील, प्रा. स. वा. कोगेकर, प्रा. प. वि. पटवर्धन यांसारख्या तज्ज्ञांनीं साधार चर्चा केली आहे. गांधीजींच्या ग्रामोद्योगप्रधान अर्थशास्त्रासंबंधीं श्री. झवेरभाई पटेल यांचा 'ग्रामोद्योगामागील शास्त्रीय दृष्टि' हा, त्याचप्रमाणें शं. वि. ठकार यांचा 'मद्याचें माहात्म्य' हा, असे दोन वैशिष्ट्यपूर्ण लेख आले आहेत. यांशिवाय मांडवलशाही अर्थव्यवस्था आणि समाजवादी अर्थव्यवस्था यांतील मौलिक भेदाची चर्चा प्रा. कामत यांनीं एका लेखांत केलेली आढळून येईल.

इतिहासविषयक असे निरनिराळ्या कालखंडांतील निरनिराळ्या भूमिकांवरून लिहिलेले चार लेख गत वर्षी 'नवभारतां'त आले आहेत. प्रा. शेजवलकरांनीं पानिपतच्या १७६१ च्या मोहिमेवर व प्रा. मिराशी यांनीं प्राचीन महाराष्ट्रावर लेख दिले असून प्रा. वि. ब. आठवले यांनीं आपल्या लेखांतून महाभारत या प्राचीन 'इतिहास'ग्रंथांतील कांहीं स्थळांसंबंधीं आधुनिक भौगोलिक दृष्ट्या आपलें संशोधन दिलें आहे.

भौतिक शास्त्रांपैकीं 'जीवशक्तीचें स्वरूप' या विषयावर प्रा. करबेलकर यांचा व 'राक्षसी व्यूहाणू' या विषयावर प्रा. दि. धों. कर्वे यांचा, असे दोन भिन्न शास्त्रांतील दोन लेख येऊन गेले आहेत.

वाङ्मयक्षेत्रांत 'नवभारता'नें प्रसिद्ध केलेल्या लिखाणाचें वर्गीकरण करावयाचें झाल्यास तें, एकांकिका व लघुकथा मिळून आठ, कविता अठरा आणि वाङ्मयसंबंधीं ललित चर्चात्मक निबंध पंचवीस असें आहे असें दिसून येईल. या ललित वाङ्मयविषयक

निबंधांमध्यें किती विविधता व व्यापकता आहे याची खालीं उपलक्षणादाखल निर्देशिलेल्या लेखां-वरून कल्पना येईल:—मराठी रंगभूमीचे गुणविशेष (प्रा. श्री. ना. बनहट्टी), खलील जिब्रानचा क्रान्ति-वाद (प्रा. स. ज. भागवत), जॉर्ज बर्नार्ड शॉचें पहिलें नाटक (श्री. त्र्यं. सी. कारखानीस), मराठी निबंध—विष्णुशास्त्री ते विनोबा (डॉ. मा. गो. देशमुख), शाकुन्तलांतील प्रतीक : मृग (प्रा. म. अ. मेहेंदळे), सौंदर्यवाद व गूढवाद (प्रा. श्री. के. क्षीरसागर). यांशिवाय संगीत व नृत्य या क्षेत्रांतील विषयांवर श्री. केशवराव भोळे व रोहिणी भाटे यांचे वैशिष्ट्यपूर्ण लेखहि आले आहेत.

यांशिवाय निरनिराळ्या थोर व्यक्तींचें जीवन-कार्य व त्यांचें व्यक्तिमत्त्व यांसंबंधीं चौदा लेख येऊन गेले आहेत. गांधीजींवरील एतद्विषयक लेखांचा उल्लेख वर आलाच आहे. यांशिवाय निर्वाणप्राप्त धर्मानंद कोसंबी,कै.सा.स.न.चिं. केळकर, खिस्तवासी आ. के. कुमारस्वामी, श्री. क्षितिमोहन सेन व श्री. श्रीकृष्णदास जाजू यांचेवरहि लेख आले आहेत. सामान्य महिलांतहि असामान्य व्यक्तिमत्त्व असूं शकतें याचें दिग्दर्शन श्री. प्रेमा कंटक यांनीं चार सामान्य स्त्रियांचीं शब्दचित्रें रेखाटून केलें आहे.

'नवभारता'नें ग्रंथपरिचय व ग्रंथपरीक्षण या सदराखालीं दहा लेख प्रसिद्ध केले आहेत. विचार-प्रवर्तक अशीं पुस्तकें निवडून त्यांपैकीं कांहींचे परि-चय व कांहींचीं परीक्षणें दिलीं आहेत. अशा प्रकारचे ग्रंथपरिचय किती विविध प्रकारचे व व्यापक स्वरूपाचे आहेत याची कल्पना पुढील कांहीं लेखांवरून येईल:—'अर्धकथानक' (तीनशें वर्षांपूर्वीच्या एका हिंदी कवीचें आत्मचरित्र)—म. म. द. वा. पोतदार, विनोबाकृत 'ईशावास्यवृत्ति'—आचार्य वि. प्र. लिमये, डॉ. आंबेडकर यांच्या 'Who were the Shudras?' या ग्रंथाचें परक्षिण—डॉ. के. ल. दप्तरी, दि. के. बेडेकरकृत 'संयुक्त महाराष्ट्र' याचें द्विविध परीक्षण—प्रा. पुणतांबेकर आणि प्रा.शेजवलकर, बा.ना. देव-कृत बाळशास्त्री जांभेकरांचें चरित्र—श्री. ग. गं. जांभेकर.

यांशिवाय विविध विषयांवरील सारसंकलनहि (सुमारें साठ पृष्ठें) आलें आहे.

—वि. म. बेडेकर

———

## संस्था आणि व्यक्ति—

केवळ संस्थांच्या द्वारा व्यक्तीची उन्नति होईल असा गांधीजींना विश्वास वाटत नाहीं. व्यक्तीची उन्नति हा गांधीजींच्या विचारसरणीचा पाया आहे. उलट कांहीं तत्त्वचिंतकांच्या मतें तोच तिचा मोठा दोष आहे. त्यांच्या मतें व्यक्तीच्या उन्नतिद्वारा समाजाची उन्नति साधूं पहाणें हें एक अदभुतरम्य, स्वप्नमय व अशास्त्रीय असें ध्येय आहे. असें स्वप्नमय अदभुतरम्य ध्येय बाळगणाऱ्या रस्किन, सें. सायमन आणि फूरिएर यांसारख्या स्वप्नवाद्यांपासून समाजवादाला जर कोणी सोडविलें असेल तर तें मार्क्सनें; कारण मार्क्सवादी विचारसरणीप्रमाणें माणसें परिस्थितीनें बनत असल्यामुळें, परिस्थितीवर-संस्थांवर मुख्य भर दिला पाहिजे, व्यक्तींवर नव्हे, असें त्या तत्त्वचिंतकांचें म्हणणें आहे.

या उलट सर्व सुधारणांचा व क्रांतींचा इतिहास असें दाखवितो कीं, संस्था ह्या विचारांना आणि ध्येयांना मारक ठरल्या आहेत. पार्लमेंटमध्यें लोकसत्तेला मूठमाती मिळाली आहे, आणि कम्युनिस्ट पक्षाच्या सत्तेंत समाजवादाचा मुडदा पडला आहे. या दोन गोष्टींवर—लोकसत्ता आणि समाजवाद यांवर मानव-जातीच्या सर्व आशा एकवटल्या होत्या. पण संस्थेमध्यें त्यांचें रूपांतर होऊन त्यांचा जो विपर्यास झाला आहे, त्यामुळें लोकांचें डोळे उघडून लोक संस्थांच्या हितकरपणाविषयीं साशंक झाले आहेत. संस्थामध्यें जर कांहीं नावीन्य येऊन प्रगति व्हावयाची असेल तर ती नवीन आणि प्रगतिपर अशा व्यक्तींवर अवलंबून असते ह्याचा आपणांस विसर पडतो. म्हणूनच गांधीजींचें मुख्य लक्ष्य मानव हा आहे.

—एम्. एल् दांतवाला.








श्री. प्रेमा कंटक

# मासिकाचें 'मिशन'

सामान्य जनतेला प्रौढ व ललित विचार देण्याचें कार्य मासिकानें केलें पाहिजे. छापखाने अस्तित्वांत नव्हते तेव्हां संतकवी, कीर्तनकार, शाहीर, भाट इत्यादिकांनीं हें कार्य चालविलें होतें. त्या वेळीं आजकालच्या इतकें साहित्य स्वस्त नव्हतें. अर्वाचीन कालांत आमचीं वर्तमानपत्रें—दैनिकें व साप्ताहिकें आणि मासिकें सर्व प्रकारचे विचार व तरंग किरकोळ भावांत विकूं लागलीं आहेत. समाजांतील विशाल व विक्राळ प्रश्नांचा जबाबदारीनें विचार करून जनतेला योग्य मार्गदर्शन करण्याचा अधिकार सर्वांनाच असतो असें नाहीं. सध्यांचीं बहुतेक नियतकालिकें एकाद्या पक्षाच्या अथवा संप्रदायाच्या प्रचारासाठींच निर्माण झालेलीं आहेत; तटस्थ वृत्तीनें जीवनाचा विचार करून समाजाचा तात्कालीन युगधर्म दाखवून देणारीं आणि त्या धर्माचें पालन करण्यास प्रेरणा देणारीं नियतकालिकें दृष्टोत्पत्तीस येणें दुरापास्तच आहे. " हरिजन " या साप्ताहिकाचें नांव घेतल्यावर "अनामिका सार्थवती बभूव" असेंच म्हणण्याची पाळी येते !

'नवभारत' मासिकानें असा कांहीं भव्य आदर्श समोर ठेवून जीवनसेवा करण्याचें ठरविलें. पत्रकार, धर्मोपदेशक व शिक्षक या तिहींचें संमीलित कर्तव्य त्याला पार पाडावयाचें होतें. एक वर्षाची सेवा पूर्ण झाल्यावर वाचक या दृष्टीनें आतां थोडें सिंहावलोकन करण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे. या कालांत एकंदर ११८ लेख, सात लघुकथा व एकांकिका, आणि अठरा कविता येवढें साहित्य मासिकानें छापलें. शिवाय ग्रंथांचे परिचय, ग्रंथ–परीक्षणें, सारसंकलनें, चित्रें, नकाशे वगैरे विविध प्रकारांनीं मासिक नटविलें गेलें आहे. एकंदर ९२ लेखकांचे लेख यांत आले आहेत. अर्थात् यांपैकीं साऱ्याच लेखकांनीं प्रत्यक्ष आपले लेख दिलेले नाहींत, कांहींच्या लेखांचीं भाषांतरें देण्यांत आलीं आहेत, ही गोष्ट वेगळी. या लेखकांपैकीं कित्येक नुसती वाङ्मयसेवा करणारे लोक आहेत, तर कित्येक विचारप्रचार करणारे आहेत. तिसरे कित्येक (व हे फारच थोडे आहेत) कार्यपरायण असल्यामुळें विचार–प्रचारांत एकरूपता पाहणारे आहेत; तथापि सर्वसाधारण प्रकाशित लेखांतील विषयांचा आढावा घेतल्यास असें दिसून येईल कीं, विचारांची व लेखनशैलीची भूमिका उच्च ठेवूनहि जें साहित्य 'नवभारतां'त आतांपर्यंत प्रकट झालें आहे त्यांत नवे शोध, नवे निर्णय, नवे वाद, नवे नमुने यांचाच उहापोह झाला आहे व बरेंचसें साहित्य विद्वानांचें व विद्वानांसाठींच आहे. उच्च शिक्षण न घेतलेल्या वाचकांना या मासिकांतील मजकूर पचविणें तर जड जातेंच, पण वाचतांना कळतहि नाहीं ! सारे लेखक उच्चासनावर बसून लिहीत आहेत असें वाटतें. मात्र एक उद्दिष्ट या मासिकानें सफल केलें आहे. आजकालच्या वैश्य– युगांत दुकानदारी करण्याची वृत्ति बऱ्याचशा नियतकालिकांतून चहूंकडे दिसून येते; गिऱ्हाइकांची गरज कोणती हें न पाहतां स्वतःजवळ पडून राहिलेला माल त्यांच्या पदरांत बांधण्याची दुकानदारांची धडपड गिऱ्हाइकांना दुकानदारांचें भक्ष्य बनवितें. सुशिक्षित वाचक हे अशा वैश्यवृत्ति पत्रकारांची 'शिकार' बनले असून आपली शुद्ध अभिरुचि व आपला आदर्श गमावून बसले आहेत. तरी देखील ही पद्धति शिष्टसंमत बनली आहे, हें आश्चर्य होय. या (न. भा.) मासिकानें वाचकांची दृष्टि शुद्ध करण्याचा समर्थ व सफल प्रयत्न केला आहे. लोकांचा सेवक व लोकांचा शिक्षक या दोन्ही नात्यांनीं या मासिकानें काम केलें आहे. आतां लोकांचा प्रतिनिधि व

लोकांचा नायक म्हणून पुढील कार्य त्यास करावयाचें आहे. तें कसें म्हणाल तर, समाजांत जेव्हां घर्षण सुरू होईल, तेव्हां सत्याचा प्रतिनिधि म्हणून लोकमत तयार करून सामाजिक अन्यायांविरुद्ध लोकशक्ति चेतविण्याचें कार्य या मासिकाला करावें लागेल. त्यासाठीं विशेषेंकरून ग्रामीण जीवनाचा सखोल अभ्यास करून त्याच्या समस्यांची चर्चा त्याला चिकाटीनें करावी लागेल.

ग्रामीण प्रतिनिधींना अधिकाधिक जवळ आणावें लागेल, त्यांच्या साहाय्यानें ग्रामीण जनतेला शिक्षण द्यावें लागेल, खेड्यांतून लोकमत तयार करून नवे आदर्श त्यांना शिकवावे लागतील, शेतकरी, विणकरी, कारागीर, मजूर, स्त्रिया, कारकून, शाळामास्तर वगैरे सर्वांच्या परिस्थितीचा अभ्यास करून त्यांचे प्रश्न हाताळावे लागतील. त्यांचा संसार व त्यांच्या धर्मविषयक कल्पना यांबाबत अद्याप फारसें विवेचन झालेलें नाहीं अथवा मुळींच झालेलें नाहीं म्हटलें तरी चालेल. मासिकाची दृष्टि मध्यम वर्गावरच खिळलेली आहे. वास्तविक पाहतां ग्रामीण अध्ययन व ग्रामीण समभाव यांचीच सध्यां अधिक जरूर आहे. त्या दृष्टीनें "आतां हा प्रश्न हातीं घ्या" (डिसेंबर १९४७) या लेखासारखे अनेक लेख या मासिकांत आले पाहिजेत. आपली भूमिका सांस्कृतिक राहील अशी घोषणा मासिकानें प्रथमपासूनच केली आहे; पण संस्कृति म्हणजे कांहीं मध्यम वर्गांतील साहित्यिकांचे अहंकारी झगडे नव्हेत. जीवन शुद्ध व समृद्ध करण्यासाठीं पुष्कळ तपश्चर्या केल्यावर जी पद्धति समाजांत मान्यता पावते तीच संस्कृति होय. तिचें सार्वभौम व्यापक तत्त्व 'समन्वय' हें आहे. भारतांत सर्व पंथांचा व सर्व धर्मांचा समन्वय करण्याचा प्रयत्न चालू असतांनाच भारतीय संस्कृति जन्मास आली. अर्थात् जीवन एकांगी असूं शकत नाहीं, म्हणूनच संस्कृति ही सर्वोदयकारी असली पाहिजे. त्या दृष्टीनें मासिकाचा प्रयत्न वरच्या थरावर सुरू झाला आहे. तो खालच्या--पायाच्या थरापर्यंत पोंचेल तेव्हांच त्याचें उद्दिष्ट सिद्ध होईल.

शिक्षण, इतिहास, राजकारण, अर्थशास्त्र, समाज—सुधारणा, धर्म, संप्रदाय, वगैरे अनेक समाजवादी विषयांची चर्चा या मासिकाच्या अंकांतून आली आहे. तथापि या वाङ्मयी सेवेचा उपयोग बहुतेक सारा बुद्धिजीवी लोकांच्याच कारणीं आला आहे, हें नाकबूल करतां यावयाचें नाहीं. प्रश्न येवढाच आहे कीं, सारी संस्कृति तात्त्विक चर्चेतून निर्माण होते का लाखों मानवांच्या सामाजिक जीवनमंथनांतून ती सहजपणें उद्भवते ? मानसशास्त्र व समाज—शास्त्र हीं शास्त्रें केवळ पुस्तकें व प्रवचनें यांतून उभारलीं गेलीं नाहींत, तर प्रत्यक्ष सामाजिक जीवनांतून त्यांची उत्पत्ति झाली आहे. ग्रंथपरायणतेपेक्षां जीवनपरायणतेची गरजच आज अधिक आहे. या जीवनपरायणतेंतूनच 'सत्याग्रह' हें लोकशिक्षणाचें उग्र साधन जन्मास आलें; त्याच्या व्यापक शक्तीचा अनुभव राष्ट्रानें घेतलाच आहे. त्याच्याचमुळें हिंदी जीवनांतील क्रांति सोपी झाली. थोडक्यांत म्हणजे प्रजेच्या पुरुषार्थाला त्यानेंच वाट करून दिली.

साहित्यांतून लोकशिक्षणाची कला अशा प्रकारें निर्माण झाली पाहिजे.

———

खाणींतील माती म्हणून मी मेलों व वनस्पति म्हणून जन्मलों. वनस्पति म्हणून मेलों प्राणी म्हणून जन्माला आलों. प्राणी असतांना मला मरण आलें पण मनुष्यजन्म मला मिळाला. भ्यायचें कशासाठीं ? मरण्यानें माझ्यांत कमी असें काय झालें आहे ? मनुष्य म्हणून मी मरेन खरा पण दिव्य रूप धारण करून देवदूतांबरोबर विहार करीन. देवदूतांच्या पुढेंहि मला जायचें आहे. परमेश्वराशिवाय बाकी सर्व नश्वर आहे. देवदूत म्हणून मी नष्ट झालों तर मी असें स्वरूप धारण करीन कीं ज्याची कोणालाही कल्पना येणार नाहीं. मला अभावाप्रत जाऊं द्या. कारण अभावच खरें परमेश्वराचें रूप प्रकट करतो.

—जलालुद्दिन रूमी










श्री. किशोरलाल मश्रूवाला

# पूर्वतयारी

गांधीजींच्या नांवाशीं माझी पहिल्यांदा ओळख झाली तेव्हां मी फक्त सुमारें तेरा वर्षांचा होतों. मुंबई-मधील एका शाळेंत इंग्रजी पांचव्या वर्गांत त्या वेळीं मी शिकत होतों. कै. श्री. हरिलाल गांधी—बापूंचा सर्वांत मोठा मुलगा—माझ्याच वर्गांत होता. त्या शाळेंत जाऊन मला थोडेच महिने झाले होते. एके दिवशीं दुपारीं संस्कृतचा धडा घंटा होण्यापूर्वींच थोडा वेळ आधीं संपला आणि मास्तरांना विद्यार्थ्यांशीं गप्पागोष्टी करण्यास वेळ मिळाला. हरिलालनें शिक्षकांस सांगितलें कीं त्याला दक्षिण आफ्रिकेस जावयाचें असल्यामुळें तो लवकरच शाळा सोडणार आहे. "तूं दक्षिण आफ्रिकेंत कशासाठीं जाणार आहेस?" शिक्षकांनीं विचारलें. त्यानें सांगितलें, "माझे वडील बॅरिस्टर असून ते तेथें प्रॅक्टीस करतात". गांधीजीं-विषयीं कांहीं माहिती शिक्षकांना असावी असें दिसलें. त्यांनीं हरिलालला विचारलें, "तूं मोहनलाल (त्या वेळीं "ह्या नांवाचा शेवटचा भाग 'दास' नसून 'लाल" आहे' अशी माझी समजूत झाली होती) करमचंद गांधींचा मुलगा आहेस का?". हरिलालनें 'होय' म्हटलें. पुढील प्रश्नांना उत्तरें देत असतां त्यानें सांगितलें कीं गांधीजी तेथें इंग्रजी, गुजराथी व तामील (आणि हिंदीहि?) अशा तीन (कीं चार?) भाषांत एक वृत्तपत्र चालवीत असतात. हा संवाद तेथेंच संपला; पण तो माझ्या आठवणींत मात्र, कसा, कोण जाणे, कायम राहिला.

दहा वर्षें गेलीं. ह्या मधल्या काळांत गांधीजीं-विषयीं मीं पुनः कांहीं ऐकलें नाहीं. अकोल्यास एक नवीन वकील म्हणून मी गेलों. दक्षिण आफ्रिकेंतील अखेरच्या सत्याग्रहाच्या मोहिमेचा काळ आणि हा काळ एकच होता. तेथील चळवळीच्या वर्णनांनीं वृत्तपत्रें भरलेलीं असत. कै. गोपाळ कृष्ण गोखले आणि त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज ह्यांनीं तेथें राहणाऱ्या हिंदी लोकांची बाजू उचलून धरली होती. प्रत्येक ठिकाणीं सभा भरविल्या जात होत्या आणि मोहिमेस मदत करण्यासाठीं निधि जमविण्यांत येत होता. एक उत्साही तरुण ह्या नात्यानें मींहि त्यांत भाग घेतला. गांधीजींशीं एकतर्फी ओळख होण्याचा हा माझा दुसरा प्रसंग.

**'दोन श्रद्धाळू'**

आणखी सुमारें चार वर्षें गेलीं; मी मुंबईस होतों. मुदतबंदीची मजुरी बंद करविण्यासाठीं एक सार्वजनिक सभा (मला वाटतें एक्सेल्सिअर थिएटरमध्यें) भरणार होती. अनेक वक्त्यांपैकीं एक म्हणून गांधीजींचें नांव जाहीर झालें होतें. मी आणि माझे वडील भाऊ यांना अशी सभा चुकविणें शक्य नव्हतें आणि म्हणून आम्ही दोघेहि सभेस गेलों. गांधीजींचें भाषण त्या वेळीं मीं प्रथमच ऐकलें. ते इंग्रजीमध्यें आणि गुजराथीमध्यें बोलले. त्यांचे त्या वेळचे गुजराथी उच्चार विशिष्ट काठेवाडी पद्धतीचे होते.

सभा संपल्यावर त्यांच्या पाठोपाठ जाण्याचें मीं आणि माझे बंधु यांनीं ठरविलें. गांधीजी आणि त्यांच्या बरोबर असलेले मि. पोलाक समुद्राच्या बाजूस वळले. ते जरा जलद चालत होते आणि वाटेनें सारखे बोलत होते. आम्हीहि जलद चालणारे नसतों तर त्यांचा आम्हांला टाळण्याचा विचार आहे, अशी शंका आम्हांला आली असती. मी आणि माझे बंधु त्यांच्या अगदीं मागोमाग जात होतों. आम्हीं त्या वेळीं श्री. रेवाशंकर जगजीवन झवेरी ह्यांच्या गांवदेवीच्या जवळपास कोठें तरी असलेल्या घराशीं पोहोंचलों. पण ते मणिभवन नव्हतें (जेथें








पुढें अनेक वर्षेपर्यंत गांधीजी मुंबईस आले कीं त्यांचा मुक्काम राहत असे). हें वेगळेंच घर होतें. आम्हांला घरीं जाण्यास उशीर होत होता; म्हणून जेव्हां गांधीजी त्या घराच्या पायऱ्या चढूं लागले, तेव्हां त्यांचा निरोप घेण्यावांचून आम्हांला गत्यंतर नव्हतें. त्यांनीं आमच्या प्रणामाचा स्वीकार केला तेव्हां मि. पोलाक उद्गारले, "The faithful two!" ("दोन श्रद्धाळू!").

घरीं पोहोंचून आमचें संध्याकाळचें जेवण संपलें असेल नसेल तोंच ठक्करबाप्पांचा निरोप आला कीं, त्याच दिवशीं रात्रीं ते गांधीजींना भेटावयास जाणार होते आणि आमची इच्छा असल्यास आम्हीं त्यांच्या बरोबर जावें. गांधीजींना पुनः भेटण्याची संधि मिळाल्यानें आम्हांला फारच आनंद झाला आणि आमच्या शेजारींच असलेल्या सोसायटीच्या इमारतींमध्यें ठक्करबाप्पा होते तेथें आम्ही तांतडीनें गेलों.

गांधीजी, ठक्करबाप्पा, श्री. शंकरलाल बँकर व कदाचित् आणखी एकदोघेजण एका टेबलाभोंवतीं बसले होतो. त्यांच्या मागें ठेवलेल्या खुर्च्यांवर आम्ही भाऊ बसलों. गांधीजींना स्वतःचा आश्रम बांधण्यासाठीं जागा मिळाली कीं कोणत्या तऱ्हेच्या इमारती त्या जागेवर बांधाव्या ह्याविषयीं चर्चा करण्यासाठीं ते एकत्र जमले असावे असें दिसलें. गांधीजींच्या आश्रमाबाबत मला त्या वेळेस विशेष रस वाटला नाहीं. गांधीजींचा एक आश्रम आधींपासूनच अहमदाबादेस होता हेंहि मला ठाऊक नव्हतें. पण त्या चर्चेंतला कांहीं भाग मला आठवतो. कारण, एका विशिष्ट मुद्द्यावरें श्री. बँकर आणि गांधीजी यांचा जोराचा वाद झाला. मला आठवतें कीं, गांधीजी म्हणत होते कीं त्यांना अगदीं स्वस्त, कच्चीं व गरीब माणसांच्या राहणीस झेंपतील अशीं झोंपडीवजा घरें हवीं होतीं. ठक्करबाप्पा जरी आधींच 'सर्व्हंट ऑफ इंडिया' (हिंदुस्थानचे सेवक) बनले होते तरी ते आपला सिव्हिल एंजिनिअरचा पेशा विसरले नव्हते आणि माझ्या आठवणीप्रमाणें ते म्हणत होते कीं इमारती पक्क्याच असाव्या. कारण, कच्च्या इमारती टिकाऊ नसतात आणि अखेरीस त्या अधिक महाग पडतात. मला वाटतें, गांधीजी म्हणत होते कीं स्वस्त इमारती जरी पांच–दहा वर्षांनीं पुनः बांधाव्या लागल्या तरी चालतील; पण त्याच हव्या. श्री. शंकरलाल बँकर ह्यांचा मुद्दा अगदींच निराळ्या भूमिकेवरून पुढें करण्यांत आला होता. ते म्हणत होते कीं, हिंदी लोकांनीं झोंपड्यांत राहणें त्यांना पसंत नव्हतें. प्रत्येक हिंदी माणूस नीटनेटक्या पक्क्या घरांत राहूं शकेल अशी परिस्थिति निर्माण करण्याची खटपट केली पाहिजे. गांधीजींनीं जनतेसमोर वाईट घराचें उदाहरण मांडावें, हें त्यांना अगदीं नापसंत होतें. ह्या मुद्द्यावर गांधीजी आणि बँकर ह्यांचा बराच वेळपर्यंत वाद झाला; पण तो सर्वच मला आठवत नाहीं. हा रात्रींचे साडेदहा वाजण्याचा सुमार होता. मला झोंप येत होती. त्यांचा विचार–विनिमय संपल्यावर आम्ही ठक्करबाप्पांबरोबर परतलों.

अखेरीस साबरमती येथील आश्रमाच्या इमारती गांधीजी किंवा ठक्करबाप्पा ह्यांच्याहि मतापेक्षां शंकरलाल बँकर ह्यांच्या आदर्शानुसारच बांधल्या गेल्या. आश्चर्याची गोष्ट ही कीं, बारा वर्षांनंतर झालोद (पंचमहाल जिल्ह्यांत) येथील ठक्करबाप्पांचा भिल्ल–आश्रम पाहण्यास मी गेलों होतों तेव्हां मला तेथील इमारती साबरमती येथील इमारतींपेक्षांहि कच्च्या व साध्यासुध्या आढळल्या. गांधीजी सेवाग्रामास राहण्यास येईपर्यंत त्यांना झोंपडीसारखीं घरें बांधतां आलीं नाहींत. ते सेवाग्रामास स्थायिक झाल्यावरच त्यांना झोंपडीसारख्या वसाहती बांधतां आल्या. तरीहि सेवाग्राम ही साबरमतीप्रमाणें एक आश्रमसंस्था आहे असें मुळींच मानलें जात नसे. आणि कांहीं काळपर्यंत, सेवाग्रामच्या वसाहतीस आश्रम म्हणून संबोधिलें जावें ह्यास गांधीजींचा विरोध होता.

पण आपण मुद्द्यावर येऊं या. बापूंशीं औपचारिक रीत्या देखील माझी ह्या वेळेपर्यंत ओळख करून दिलेली मला आठवत नाहीं. माझ्या बंधूंची गांधीजींशीं ओळख करून देण्याची जरूरीच नव्हती; कारण, माझ्या आठवणीप्रमाणें ते पूर्वीं एका कॉंग्रेसच्या अधिवेशनांत गांधीजींबरोबर होते आणि ते ज्या जागीं उतरले होते, तेथेंच तेहि उतरले होते. त्या कॉंग्रेसमध्यें गांधीजींचा चष्मा हरवला होता आणि माझ्या बंधूंचा चष्मा त्यांना लागला म्हणून त्यांनीं तो त्यांना दिला. चष्म्याबरोबरच जवळजवळ










# पूर्वतयारी

सर्व कुटुंबहि त्यांनीं गांधीजींच्या हवालीं केलें हें त्यांच्या लक्षांत क्वचित्च आलें असेल!

## एक नवीन अनुभव

पुनः मुद्द्यावर येऊं. एकदोन दिवसांनीं गांधीजीं-बरोबर अनौपचारिक चर्चा करण्यासाठीं मुंबईच्या कांहीं भंग्यांना ठक्करबाप्पांनीं सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटीच्या (भारतसेवक—समाजाच्या) इमारती-मध्यें बोलाविलें होतें. आम्हांला त्या कार्यक्रमासंबंधीं माहिती कळविण्याची कृपा बाप्पांनीं केली होती आणि म्हणून आम्ही सर्व भाऊ (माझे मधले भाऊहि ह्या वेळीं हजर होते) तेथें गेलों.

आम्ही भंग्यांच्या शेजारींशेजारींच बसलों होतों. हा किंचित् नवीन अनुभव होता. 'किंचित्' असें म्हणण्याचें कारण हें कीं, विशिष्ट मर्यादेपर्यंत ख्रिश्चन हरिजनांमार्फत एक प्रकारच्या अस्पृश्य लोकांशीं आमचा संबंध केव्हांच येऊन चुकला होता. अकोल्यास माझ्या वडिलांचे आणि मधल्या बंधूंचे तेथील मिशनऱ्यांशीं चांगले संबंध होते. त्यांच्या हरिजन कामगारांना माझे बंधु अनेक वेळां आपल्या कारखान्यांत नेमीत असत. आणि कोणत्याहि प्रकारचा अडथळा न होतां ते घरांत प्रवेश करूं शकत. आम्ही त्यांना मोकळेपणानें स्पर्श करीत असूं. हिंदू हरि-जनांना तसल्याच सवलती देण्यास आम्ही अजून तयार नव्हतों. ख्रिश्चन हरिजनांना घरांतील खोल्यां-तून जितक्या आंतपर्यंत प्रवेश मिळूं शकत होता, तितका हरिजनांना मिळत नव्हता आणि आम्हांला त्यांचा स्पर्श होण्याचा प्रसंग आला तर आम्ही मामुली वहिवाटीप्रमाणें स्नान करीत असूं.

त्यामुळें आम्ही घरीं आलों तेव्हां गांधीजींसम-वेत आमचा भंग्यांशीं संबंध आल्यामुळें आम्हीं 'शुद्ध' व्हावें कीं काय हा प्रश्न उपस्थित झाला आणि आम्हीं निर्णय घेतले ते आमच्या वयानुरूपच घेतले. माझ्या सर्वांत वडील बंधूंनीं ठरविलें कीं त्यांना अजून पूजा करावयाची असल्यामुळें स्नान करणें भाग होतें. माझे मधले बंधु म्हणाले कीं त्यांचें जेवण झालें असल्यामुळें आणि रात्रीं त्यांना पाण्याची किंवा अन्नाची जरूर नसल्यामुळें नुसते कपडे बदलणें त्यांना पुरेसें वाटत होतें. मला वाटतें, केवळ हातपाय धुऊनच मीं स्वतःचें समाधान करून घेतलें!

गांधीजींशीं गाढ संबंध येण्याची ही माझी पूर्व—तयारी आहे हें मला तेव्हां क्वचितच जाणवलें असेल. तो संबंध कांहीं महिन्यांनंतर त्याच मध्यस्थांच्या अर्थात् ठक्करबाप्पांच्या मार्फतच आला; पण मला येथें थांबलें पाहिजे.

११–७–४८.

---

'गांधीजींनीं धर्मशास्त्रांतील तत्त्वें जिवंत अशा व्यावहारिक कृतीच्या क्षेत्रांत उतरविलीं; धर्मांश आणि संसारांतील व्यवहाराला आवश्यक असा शहाणपणा यांमधील फरक त्यांनीं काढून टाकला. व्यक्ति म्हणून किंवा नागरिक म्हणून आपले व्यवहार करीत असतांना जर आपण त्या व्यवहारांतून गांधीजींनीं आपणांला शिकविलेली तत्त्वप्रणाली वगळली व आपल्या प्रत्यक्ष व्यवहाराला तदनुसार योग्य व इष्ट तें वळण देण्याऐवजीं, केवळ त्यांच्या स्मृतींचीं व वचनांचीं स्तुतिस्तोत्रें गात बसलों, गांधीजींनीं प्रतिपादिलेले संयमादि सद्गुण आणि राजकारण यांच्यामध्यें जर आपण एक भिंत उभारली, तर आपला त्यांच्याविषयींचा आदर-भाव नुसतें शुष्क ढोंग ठरेल! जसे पूर्वीं त्यांना विचारायला गेल्यावर त्यांच्या सल्ल्याप्रमाणें आपण वागत असूं तसें, संशयाच्या व अडचणींच्या प्रसंगीं आपण वागलें पाहिजे, आपणांमध्यें ते असून त्यांची आपणांवर नजर आहे, असें समजूनच आपण वागलें पाहिजे."

**—श्री. च. राजगोपालाचार्य** १५।८।४८












डॉ. अ. स. अळतेकर

# प्राचीन भारतीय शासनपद्धतींचें सिंहावलोकन

येत्या नोव्हेंबर महिन्यामध्यें हिंदुस्थानची विधान-परिषद् (कॉन्स्टिट्यूएंट् असेंब्ली) स्वतंत्र भारताच्या प्रजातंत्रीय घटनेचें स्वरूप निश्चित करण्यासाठीं संमीलित होणार आहे. भारताची घटना कशी असावी याबद्दल सध्यां बरीच चर्चा सुरू झालेली आहे. अशा वेळीं प्राचीन भरतखंडांत शासनपद्धति कशाप्रकारची होती, तिचे गुणदोष काय होते, त्यांपासून आज आपणांस काय धडे घेतां येणें शक्य आहे, याविषयींचा विचार करणें आवश्यक आहे. कारण, आपली संस्कृति फार जुनी आहे व तिच्यामध्यें प्राचीन काळीं अनेक प्रकारच्या शासनसंस्था प्रचारांत होत्या. प्राचीन भारताचा इतिहास साधारणतः इ. स.पू.३००० ते इ. स. १०००च्या वर्षापर्यंतच्या कालाचा आहे. इतक्या प्रदीर्घ कालामध्यें शासन-संस्थांमध्येंहि बरीच उत्क्रांति होत गेली होती. प्रस्तुतच्या पहिल्या लेखांत प्राचीन भारतीय शासन-पद्धति निरनिराळ्या कालखंडांत कशी व कितपत बदलत गेली तें दाखवण्यांत येईल. *दुसऱ्या लेखामध्यें तिच्या गुणदोषांचें विवेचन करून त्यांपासून आज काय बोध घेतां येईल तें सांगण्यांत येईल.

## वैदिक युग ते नंदयुग

### (इ. स. पू. ३००० ते इ. स. ३५०.)

प्राचीन ग्रीस देशाप्रमाणें प्राचीन भारतामध्यें वैदिक युगांत फार लहान लहान राज्यें असत. सामान्यतः प्रत्येक राज्याचा विस्तार आधुनिक जिल्ह्यापेक्षां अधिक मोठा नसे. यदु, पुरु, तुर्वशु इत्यादि जमातींचीं छोटीं छोटीं राज्यें होतीं व प्रत्येक राज्याचे रहिवासी प्रायः आपणांस यदु, पुरु, तुर्वशु यांसारख्या कोणा तरी ऐतिहासिक किंवा काल्पनिक पुरुषापासून उत्पन्न झालेले समजत. यांच्यांतील निरनिराळ्या कुटुंबांचे जे प्रमुख असत, त्यांना कुलपति म्हणून संबोधीत. अनेक कुलांच्या समुच्चयास 'विश्' म्हणत व त्यांच्या मुख्यास 'विश्पति' ही संज्ञा दिली जाई. अनेक 'विशां'चा एक 'जन' नामक गट बने व त्याच्या प्रमुखास 'जनपति' ही संज्ञा असे. जनपति म्हणजेच प्रायः राजा असे. जनपति किंवा राजा हा विश्पतींपैकींच एक असे व त्यावर विश्पतींच्या सभेचें प्रभावी नियंत्रण असे. या सभेस 'समिति' म्हणून संबोधीत व जर 'समिती'चें व राजाचें पटेनासें झालें, तर राजास राज्यत्याग करणें भाग पडे. राजास अथर्ववेदामध्यें सगळ्यांत मोठा शाप असा दिलेला आहे कीं त्याची समिति त्याच्याशीं सहमत होणार नाहीं:--

नास्मै समितिः कल्पते नामित्रं नयते वशम्।।

६-८८-३.

राजा म्हणजे देव किंवा देवांचा अवतार ही कल्पना रूढ नव्हती.

---

* डॉ. अळतेकरांचा 'प्राचीन भारतीय शासनपद्धतींतील गुणदोषविवेचन' हा लेख 'नवभारता'च्या पुढील अंकांत येईल.—का. सं.

# प्राचीन भारतीय शासनपद्धतीचें सिंहावलोकन

उत्तर-वैदिक युगामध्यें राज्य अधिकाधिक विस्तृत होऊं लागलें व राजांमध्यें राजा, अधिराट्, सम्राट्, असे भेद करण्यांत येऊं लागले. तरी देखील सम्राट् तीनचार जिल्ह्यांपेक्षां अधिक विस्तृत प्रदेशावर राज्य करीत नसे. समितीचें नियंत्रण राजावर असे; पण जसजसें राज्य अधिकाधिक विस्तृत होऊं लागलें, तसतसें हें नियंत्रण अधिकाधिक शिथिल होत गेलें. समितीमध्यें प्रायः विश्पति व गृहपति यांचाच अंतर्भाव होत असे. राज्यसंचालनाचें कार्य 'रत्नि'-सभेच्या साह्यानें राजा करीत असे; या सभेमध्यें राणी, युवराज, यांसारखे राजाचे नातेवाईक, अक्षावाप, पालागत, यांसारखे त्याचे मित्र व सेनापति, संग्रहीता, संनिधाता, यांसारखे विभागाध्यक्ष, यांचा अंतर्भाव होई. राज्यकारभाराचें कार्यक्षेत्र लहानच होतें; अंतर्गत शांतता राखणें व बाह्य आक्रमणापासून रक्षण करणें हीं मुख्य राज्याचीं कामें असत. त्यांकरितां लागणारें द्रव्य प्रजेपासून बलीच्या रूपांत प्रथम प्रथम ऐच्छिक देणगीच्या रूपानें व पुढें आवश्यक करांच्या स्वरूपांत जमा करण्यांत येत असे. बहुतेक कज्जे व तंटे ग्रामपंचायतीच निकालांत काढीत. पण गंभीर स्वरूपाचे गुन्हे पुढें पुढें राजनियुक्त न्यायाधीशांपुढें निवाड्याकरतां येऊं लागले.

राज्यें विस्तारानें लहान असल्यामुळें प्रांतिक सरकार, प्रादेशिक सरकार, अशा प्रकारचे भेद अद्याप उत्पन्नच झाले नव्हते. ग्रामाचा मुख्य जो ग्रामणी त्याचा संबंध थेट मुख्य सरकारशीं असे व ग्रामणीचा एक प्रतिनिधि रत्निसभा उर्फ मंत्रिमंडळ यांताहि असे. पुढें उत्तर-वैदिक काळांत राज्यें अधिक विस्तृत होऊं लागलीं, 'कुरु', 'पंचाल', यांसारख्या राज्यांचे संयुक्त संघहि बनूं लागले व मोठ्या राज्यांच्या प्रमुखांस सम्राट्, अधिराट् वगैरे उपाधींनीं संबोधण्यांत येऊं लागलें. आपणांस एकाच ऐतिहासिक किंवा काल्पनिक पुरुषाचे वंशज मानणाऱ्या लोकांचीं जीं जनराज्यें प्रथम कालखंडांत होतीं त्यांचा आतां अस्त झाला व सर्वत्र प्रादेशिक राज्यें अस्तित्वांत आलीं.

पूर्व-वैदिक किंवा उत्तर-वैदिक युगामध्यें केंद्रीय शासनालया( Secretariat )चा उल्लेख आढळत नाहीं. त्या वेळीं लेखनकलाहि नुकतीच अस्तित्वांत येत होती व लेखनसाधनेंहि दुर्मिळ असत. त्यामुळें केंद्रीय शासनालयासारखी शासनसंस्था अस्तित्वांत येणें शक्यच नव्हतें. राजे लोक आपापल्या छोट्या छोट्या राज्यांमध्यें दौरे काढून अगर दूत पाठवून परिस्थितीचें ज्ञान करून घेत असत.

राजाचें ध्येय काय असावें या बाबतींत विशेष चर्चा वैदिक वाङ्मयामध्यें आढळत नाहीं. राजानें वरुणासारखें 'धृतव्रत' असावें, म्हणजे सर्व नियमांचें पालन मनोभावानें करावें व संयमानें राहून प्रजेचें पालन करावें, अशीं विधानें वैदिक वाङ्मयांत आढळतात. प्रजेची नैतिक व भौतिक उन्नति करणें हेंहि त्याचें कर्तव्य समजलें जाई, हें अथर्ववेदामध्यें परीक्षित् राजाच्या राज्याचें जें वर्णन केलें आहे त्यावरून दिसून येतें.

वैदिक कालांतील बहुसंख्य राज्यें नृपतंत्रात्मक होतीं; पण कांहीं राज्यें प्रजातंत्रात्मकहि होतीं. व या राज्यांना वैराज्य म्हणजे नृपरहित राज्य (विगतो राजा यस्मात् तत्) असें संबोधीत. गृहपती व विश्पती यांची जी समिति तिच्या हातांत राज्यनियंत्रण असे हें वर दाखविलेंच आहे. ज्या वेळीं या सभेचा अध्यक्ष कांहीं कालाकरितांच निवडला जाई, त्या वेळीं वैराज्य किंवा प्रजातंत्र अस्तित्वांत येई. ज्या वेळीं हें अध्यक्षपद हळूहळू आनुवंशिक होई, त्या वेळीं नृपतंत्र अस्तित्वांत येत असे. वैदिक कालांतील प्रजातंत्रें उत्तरकुरु व उत्तरमद्र या देशांत होतीं.

## नंद युगांतील शासनपद्धति

इ. स. पू. ६०० ते ३५०पर्यंतच्या कालांत मगधा(बिहार)मध्यें एक प्रभावी साम्राज्य उदयास आलें व त्याच्या आधिपत्याखालीं संयुक्त प्रांतहि अंतर्भूत झाला होता. पण या साम्राज्याच्या शासनपद्धतीची माहिती आपणांस फारशी मिळत नाहीं. सर्व राज्याधिकार राजाचे हातींच असत व त्यास साहाय्य करण्यास एक मंत्रिमंडळ असे. पण या साम्राज्याचे प्रांत, जिल्हे, तालुके, असे विभाग आढळत नाहींत. मगध-राजा बिंबिसार यानें आपलें धोरण जाहीर करण्याकरतां एकदां ८०,००० ग्रामणींची म्हणजे पाटलांची सभा बोलावली होती असें वर्णन एके ठिकाणीं आढळतें, त्यावरून ग्रामणी व राजा यांच्या

दरम्यान हल्लींचे कलेक्टर व मामलेदार यांसारखे अधिकारी होते असें दिसत नाहीं. बिंबिसारानंतरच्या कालांत महामात्र यांसारखे मोठे अधिकारी प्रांतीय विभागांवर नेमण्यांत येऊं लागले व त्यांच्या हाताखालीं मामलेदारांसारखे अधिकारीहि नेमण्यांत येत असावे; पण याबद्दल प्रत्यक्ष पुरावा मिळत नाहीं.

## मौर्ययुगांतील राज्यतंत्र

(इ. स. ३३० ते १८५)

मौर्य–युगांतील शासनपद्धतीचें सम्यग्ज्ञान होण्यास आपणांस सुदैवानें भरपूर सामग्री उपलब्ध आहे. तिजवरून आपणांस असें दिसून येतें कीं त्या वेळीं साम्राज्य–शासन–व्यवस्थेची सर्व अंगें व उपांगें विकसित झालेलीं होतीं. मौर्य–साम्राज्य हल्लींच्या प्रांतांयेवढ्या मोठ्या अशा अनेक प्रांतांमध्यें विभागलें गेलें होतें व त्यांपैकीं प्रत्येक प्रांतावर एक प्रांताधिप किंवा गव्हर्नर नेमला जाई. जिल्हे, नगरें व ग्रामें असे प्रांतांचे विभाग केलेले असत व त्यांवर निरनिराळे अधिकारी नेमले जात. वैदिक कालामध्यें जी समिति उर्फ लोकसभा होती तिचा या कालांत लोप झाला होता व राजाच्या अधिकारांमध्यें पुष्कळच वाढ झाली होती. सैन्यावर राजाचीच सत्ता चाले आणि न्यायदान व राज्यसंचालन यांवरील अंतिम अधिकारहि राजाच्याच हातीं आले होते. विधिनियम (Laws) करण्याच्या अधिकारावरहि राजेलोक हक्क सांगूं लागले होते; कारण, समिति उर्फ लोकसभा अस्तंगत झाली होती.

वैदिक कालांतील रत्निसभेचें या कालांत मंत्रिमंडळांत रूपांतर झालें व त्यामध्यें राजाच्या नातेवाइकांना हक्कानें प्रवेश मिळेनासा झाला. समितीच अस्तित्वांत नसल्यामुळें मंत्रिमंडळ प्रजेस जबाबदार नव्हतें; तथापि लोकमताचा त्याच्यावर बराच दबाव असे.

मौर्य–युगामध्यें राज्याच्या कार्यक्षेत्रांत विलक्षण विकास झालेला आढळून येतो. अंतर्गत सुव्यवस्था राखून परचक्रापासून रक्षण करण्यानें राज्याचें कार्य संपतें हा समज आतां नष्ट झाला होता. राष्ट्र संपन्न होण्याकरितां सरकारनें जंगलांची वाढ करून खाणींचें खनन केलें पाहिजे, नवे उद्योगधंदे सुरू करून त्यांस उत्तेजन दिलें पाहिजे, कारागिरांस संरक्षण दिलें पाहिजे, कारखानदारांच्या व व्यापाऱ्यांच्या किंमती वाढविण्याच्या प्रवृत्तीस आळा घालून सामान्य ग्राहकांचें संरक्षण केलें पाहिजे, तोल व मापें यांचें मधून मधून निरीक्षण करून त्यांच्यामध्यें लबाडी दिसली तर गुन्हेगारांना शिक्षा दिली पाहिजे, मद्यपान व वेश्याव्यवसाय यांचें नियंत्रण केलें पाहिजे, निर्जन पण वस्तीला योग्य अशा प्रदेशांमध्यें नवीन वस्ती वसवून राष्ट्राची संपत्ति वाढविली पाहिजे, असें या वेळीं राज्यशास्त्रज्ञांचें मत होतें व त्याप्रमाणें मौर्य–साम्राज्याकडून व्यवस्थाहि होत असे. प्रजेच्या आध्यात्मिक उन्नतीकरितांहि राज्यास प्रयत्न करावयाचा असे; आणि त्याकरतां धर्ममहामात्र यांसारखे अधिकारी सरकारकडून नेमले जात. दीन व दरिद्री लोकांकरतां सरकार सत्रें उघडीत असे व आजारी लोकांना औषधोपचार करण्याकरतां हॉस्पिटलें काढीत असे आणि त्यांमध्यें गरीब लोकांना फुकट औषधेंहि मिळत. या सर्व कार्यांकरतां सरकारला फार मोठ्या संख्येंत अधिकारी नेमावे लागत व त्यांचीं नांवें व त्यांचे अधिकार कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत आढळतात. मौर्य–साम्राज्यामध्यें हे सर्व अधिकारी होते; इतर छोट्या छोट्या राज्यांमध्यें ते सारे नसले तरी त्यांतले बरेचसे असावे असें वाटतें.

राज्याचें कार्यक्षेत्र जेव्हां इतकें विस्तृत झालें तेव्हां स्वाभाविकच राजधानीमध्यें केंद्रीय शासनालयाचा चांगला विकास झाला. त्याच्या मार्फत प्रांतीय, प्रादेशिक व जिल्ह्यांतील शासकांचें नियंत्रण होत असे. मोठ्या साम्राज्याचीं सैन्येंहि मोठीं असत व त्यांकरतां राज्याच्या उत्पन्नाचा फार मोठा भाग खर्च करावा लागे. त्यामुळें करांमध्येंहि मोठी वाढ झाली होती.

या कालांमध्यें पंजाबमध्यें मालव, क्षुद्रक, मद्र, कुणिद इत्यादि प्रजातंत्र राज्यें अस्तित्वांत होतीं; राजपुतान्यामध्यें शिबि व बिहारकडे शाक्य, कोलिय, मल्ल, विदेह इत्यादि दुसरीं प्रजातंत्रें राज्य करीत होतीं. मौर्य–साम्राज्यापुढें या प्रजातंत्रांना आपली मान वांकवावी लागली. पण त्यांची अंतर्गत प्रजातंत्रीय शासनपद्धति मात्र तशीच चालू राहिली. मौर्य–राज्य जसें क्षीण झालें तशीं हीं प्रजातंत्रें पुनः पूर्ण स्वतंत्र झालीं.



अनुक्रमणिका






# प्राचीन भारतीय शासनपद्धतीचें सिंहावलोकन

## विदेशी राजांची शासनप्रणाली

( इ. स. पू. २०० ते इ. स. २०० )

इ. स.पू. २००च्या सुमारास पंजाबमध्यें ग्रीक लोकांचें राज्य प्रस्थापित झालें व तें सुमारें १०० वर्षें टिकलें. त्यानंतर शक, पार्थियन, कुशाण वगैरे परदेशी लोकांची राज्यें पंजाब व सिंध प्रांतांमध्यें इ. स. २००पर्यंत चालली होतीं. या विदेशी राजांची शासनप्रणाली देशी शासनपद्धतींपेक्षां फारशी विभिन्न नव्हती. विदेशी राजे आपणांस फार मोठमोठ्या पदव्या घेऊं लागले. सम्राट् अशोक हा आपणांस फक्त राजा म्हणवून घेई, तर डिमिट्रियस, युक्रेटाइडिस, गोंडोफार्नेस, कनिष्क इत्यादि परदेशी राजे आपणांस राजाधिराज, महाराजाधिराज यांसारख्या पदव्या घेऊं लागले. कुशाण राजे चिनी संस्कृतीनें प्रभावित झाले होते; ते आपण 'देवपुत्र' असल्याचा दावा मांडूं लागले व त्यामुळें राजाच्या देवतांशत्वाची कल्पना अधिक दृढमूल होत चालली. हे राजे मृत राजांचीं देवालयें बांधीत व तेथें त्यांची देव म्हणून पूजाअर्चा होत असे. विदेशी राज्यांमध्यें 'द्वैराज्यां'ची प्रथा फार रूढ होती व राजा आणि युवराज दोघे मिळून राज्यसंचालन करीत. स्पॅलिरायझेस व अझेस, ह्गान व ह्गामष, गोंडोफर्नेस व गुड इत्यादि युग्में हीं द्वैराज्याचीं उदाहरणें आहेत; पश्चिम हिंदुस्थानांतील शकराज्यामध्यें, तर युवराज आपल्या नांवानें नाणींहि पाडीत असत. यावरून असें दिसून येईल कीं द्वैराज्यामधील युवराजाचे अधिकार हिंदुशासनपद्धतींतील युवराजाच्या अधिकारांपेक्षां अधिक विस्तृत असत.

देशी राज्यांप्रमाणें विदेशी राजवटींतहि या वेळीं लोकसभा अस्तित्वांत नव्हती. राजा व मंत्रिमंडळ यांच्या हातांत राज्यसत्ता केंद्रीभूत असे व शासनालयांमार्फत प्रांतिक व प्रादेशिक सरकारांचें नियंत्रण तसेंच परीक्षण करण्यांत येई. विदेशी शासकांच्या राज्यामध्यें अधिकाऱ्यांचीं नांवें पुष्कळदां बदलत असत; शककुशाण राजवटींत प्रांतिक अधिकाऱ्यांना महाक्षत्रप किंवा क्षत्रप म्हणून संबोधीत आणि ग्रीक राजवटींत जिल्हाधिकाऱ्यांना मेरिडार्क व सेनानायकांना स्ट्रॅटेगॉस असे हुद्दे असत. पण त्यांचें कार्यक्षेत्र फारसें भिन्न नसे. विदेशी शासनप्रणाली फारशी भिन्न नसण्याचे मुख्य कारण हें होतें कीं विदेशी राजे एकदोन पिढ्यांतच पूर्ण हिंदू बनत व त्यांना हिंदु-संस्कृतीचा ज्वलंत अभिमान वाटूं लागे. शक महाक्षत्रप रुद्रदामा आपल्या शिलालेखामध्यें प्रौढीनें सांगतो कीं, त्यानें संस्कृत वाङ्मय, काव्यशास्त्र व अर्थविद्या यांचा साक्षेपानें अभ्यास केला होता.

या कालखंडांत शुंग, कण्व, सातवाहन वगैरे देशी राजवंशहि राज्य करीत होते; पण त्यांच्या राज्य-प्रणालींचें फारसें ज्ञान उपलब्ध नाहीं.

## गुप्तकालीन व गुप्तोत्तरकालीन शासनपद्धति

( इ. स. ३०० ते १२०० )

गुप्त-युगांत व गुप्तोत्तर युगांत भारतीय शासन-पद्धतींत फारसा फरक पडला नाहीं. राजपद पूर्वीसारखें आनुवंशिकच होतें व राजाच्या हातामध्यें राज्यसंचालनाचे सर्व अधिकार केंद्रीभूत झालेले असत. राजाला देवतांश समजण्याची प्रथा अधिक दृढमूल होत चालली; पण राजा जरी देवतांश असला तरी तो इतर मनुष्यांप्रमाणेंच चुकाहि करूं शकतो व त्या होऊं नयेत म्हणून त्यानें योग्य शिक्षण घेऊन संयमानें राहिलें पाहिजे असें राज्यशास्त्रज्ञ प्रतिपादन करीत. आपणांस खरोखरच दैवी समजणारे राजे कसे उपहासास्पद होत याचें बाणभट्टानें फार मजेचें वर्णन केलेलें आहे. राजास साहाय्य करण्यास मंत्रिपरिषद् असे व राजेलोक सामान्यतः तिच्या सल्ल्यानें चालत असत. या काळांत केंद्रीय शासनालयाचा अधिक विकास झाला व प्रांताधिप, जिल्हाधिप वगैरेंचें नियंत्रण करण्याची पद्धति अधिक कार्यक्षम होऊं लागली. वरील व इतर अधिकाऱ्यांचीं नांवें प्रांतपरत्वें व कालपरत्वें बदलत असत; पण त्यांचे अधिकार पूर्वीचेच असत. सेनाविभागाचें प्रस्थ फार असे व सैन्यावर जवळजवळ निम्में उत्पन्न खर्च करण्यांत येई. बरेचसे मंत्री, प्रांताधिकारी व जिल्हाधिप सैन्यांतले उच्चाधिकारी असत. मौर्यकालाप्रमाणें या कालांतहि मोठमोठ्या राज्यांमध्यें प्रजेची भौतिक प्रगति व खाणी, जंगलें, व्यापार, उद्योगधंदे वगैरेंची उन्नति करण्याकरितां सरकार प्रयत्न करीत असे व आध्यात्मिक उन्नति करण्याकरतां धर्मांकुश, धर्माध्यक्ष, पंडित वगैरेंसारखे अधिकारी नेमण्यांत येत.

जनतेच्या नैतिक आचरणावर देखरेख ठेवणें, धार्मिक संस्था, मठ, मंदिरें, यांना मदत करणें, परंपरागत धर्मामध्यें जरूर त्या सुधारणा ब्राह्मणादिकांच्या सल्ल्यानें घडवून आणणें वगैरे कामें धर्मखात्यामार्फत होत असत. सरकारकडून सढळ हातानें मदत होत असल्यामुळें पुष्कळ शिक्षणसंस्था फार नांवारूपास येत व त्यांपैकीं नालंदासारखीं कांहीं विद्यालयें तर आंतराष्ट्रीय ख्याति पावलीं होतीं. मंदिरें बांधण्यास जें साहाय्य मिळे त्यामुळें स्थापत्य, तक्षण (sculpture), चित्रकला, गायनकला इत्यादिकांसहि पुष्कळ उत्तेजन मिळे.

या कालखंडाच्या प्रारंभीं प्रजातंत्रें भारतांतून नष्ट झालीं. इ. स.च्या चवथ्या शतकानंतर कोणत्याच शिलालेखांत अगर ग्रंथांत त्यांचा उल्लेख आढळत नाहीं. वंशपरंपरागत राजपदाचा अधिकाधिक बोलबाला होऊं लागल्यामुळें प्रजातंत्रांतील अध्यक्ष व मंत्री यांचीं पदेंहि आनुवंशिक होऊं लागलीं व त्यांना 'महाराज'—आदि पदव्याहि देण्यांत येऊं लागल्या. त्यामुळें नृपतंत्र व प्रजातंत्र यांमध्यें फारसा फरकच राहिला नाहीं. प्रजातंत्रें नृपतंत्रांपेक्षां फार लहान असत, म्हणूनहि त्यांचा हळूहळू विनाश होत गेला. पंजाबांतील छोट्या प्रजातंत्रांना पांचव्या शतकांतील हूण टोळ्यांच्या हल्ल्यापुढें टिकाव धरतां आला नाहीं व त्यांचें अस्तित्व लवकरच नष्ट झालें.

प्रजातंत्रीय राज्यें जरी या कालांत नष्ट झालीं तरी ग्रामपंचायती व नगरसभा यांच्यामध्यें लोकांचे अधिकार अधिक विस्तृत झाले होते. गुप्तपूर्व कालांतहि या संस्था अस्तित्वांत होत्या; पण त्यांचे अधिकार या कालखंडांत फार विस्तृत झाले. तह किंवा लढाई करण्याचा अधिकार सोडला तर सार्वभौम सरकारचे जवळजवळ सर्व अधिकार या वेळीं ग्रामसंस्थांकडे होते. मध्यवर्ती लोकसभा नष्ट झाल्यामुळें राजसत्तेचें क्षेत्र एकीकडून अधिकाधिक विस्तीर्ण होत चाललें होतें खरें, पण ग्रामपंचायतींच्या अधिकार—वृद्धीमुळें त्याचें बरेंचसें आकुंचन होऊं लागलें होतें यांतहि शंका नाहीं. जनतेकडून वसूल करण्याचे बहुतेक कर ग्रामपंचायतींच्या द्वाराच वसूल होत. जर त्यांपैकीं कांहीं कर जुलुमी असले, तर ग्रामपंचायती ते वसूल करण्याचेंच नाकारीत. गंभीर अपराधांचे गुन्हे सोडले, तर बाकीच्या सर्व खात्यांचे निवाडे पंचायतींमार्फतच होत. पंचायतींमध्यें ग्राम—निवासीयांचें मत प्रभावी ठरे. त्यामुळें राजसत्तेच्या अधिकारातिक्रमणापासून लोकांचें संरक्षण करण्याचें काम त्या फार चांगल्या तऱ्हेनें करीत.

———

'कसलें तरी देशी राज्य म्हणजे स्वराज्य नव्हे. स्वराज्य म्हणजे सर्वांचें राज्य, म्हणजेच दरएकाचें राज्य. 'हें माझें राज्य आहे' असें दरएकाला वाटलें पाहिजे तेव्हांच तें स्वराज्य होतें. यालाच गांधीजी 'रामराज्य' म्हणत. रामराज्याचें वर्णन तुलसीदासजींनीं अशा प्रकारें केलें आहे:—

बैर न कर काहू सन कोआी
राम--प्रताप विषमता खोआी

वैराचा अभाव आणि विषमता नसणें हीं दोन रामराज्याचीं लक्षणें होत. हीच व्याख्या गांधीजींनीं केली होती. पण त्यांनीं पाहिलें कीं स्वराज्याचें दर्शन झालें नाहीं तोंच, वैराचें शमन होणें तर दूरच राहिलें, पण उलट वैराची आग अशी कांहीं भडकली कीं तिला क्वचित्‌च तुलना आढळेल. हें पाहून ते स्वाभाविकच दुःखी राहत.

**आचार्य विनोबा**, राजघाट, दिल्ली, ३०।५।४८च्या 'सेवक'वरून.








आचार्य शं. द. जावडेकर

# महात्मा गांधींचें राष्ट्रीय नेतृत्व

महात्मा गांधींनीं हिंदी राष्ट्रांचें राजकीय नेतृत्व यशस्वी रीतीनें सुमारें तीस वर्षे केलें. या तीस वर्षांत त्यांनीं हिंदी राष्ट्राची जी सेवा केली ती केवळ राजकीय स्वरूपाची नसून हिंदी राष्ट्राच्या अन्तःकरणांत एक अन्तर्बाह्य क्रांति घडवून आणण्याचें श्रेय त्यांनीं संपादन केलें आहे. हिंदुस्थान आज राजकीय दृष्टीनें स्वतंत्र झाला आहे आणि या राजकीय स्वातंत्र्याचा उपयोग करून त्याला एक नवें राष्ट्र निर्माण करून जगाला मानवसंस्कृतीचा आदर्श मूर्त स्वरूपास आणून दाखवावयाचा आहे. महात्मा गांधी दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी जनतेचा लढा सत्याग्रहानें यशस्वी करून १९१५ सालीं हिंदुस्थानांत आले. त्यानंतर सुमारें दोन वर्षे या देशाची पाहणी करण्यांत आणि त्याच्या परिस्थितीचें आकलन करण्यांत त्यांनीं घालविलीं. यानंतर १९१७ सालीं त्यांनीं चंपारण्यांत सत्याग्रहाचा एक अगदीं छोटासा प्रयोग करून सर्व हिंदुस्थानचें लक्ष आपल्या नेतृत्वाकडे आकर्षून घेतलें. त्यांनीं १९१७ सालीं हिंदी राजकारणांत सत्याग्रहाची शक्ति निर्माण करून ती प्रभावी करण्याचा हा जो उपक्रम केला, तो १९४७ सालीं हिंदुस्थानला राजकीय स्वातंत्र्य मिळेपर्यंत ब्रिटिशांविरुद्ध व त्यानंतर आपलें संपूर्ण बलिदान होईपर्यंत स्वतंत्र हिंदुस्थानच्या राष्ट्रीय सरकारवर आलेलें संकटांचें वादळ शांत करण्याच्या कामीं राष्ट्र-शुद्धीसाठीं अखंड चालू ठेवला होता. इ. स. १८९३ सालीं दक्षिण आफ्रिकेंत गेल्यापासून, महात्मा गांधी यांनीं तेथील हिन्दी लोकांचे निरनिराळे प्रश्न आपल्या हातीं घेऊन आपल्या सार्वजनिक राजकीय नेतृत्वास प्रारंभ केला. त्या वेळेपासून १९४८च्या जानेवारीच्या तिसाव्या तारखेस त्यांचें बलिदान होईपर्यंत सुमारें पंचावन्न वर्षांचा काळ गेला. या पंचावन्न वर्षांत त्यांनीं निरनिराळ्या रूपांनीं आपल्या देशबांधवांची राजकीय आणि सामाजिक उन्नति करण्याचे अनेक प्रयोग केले. हें जें त्यांचें स्वदेशभक्तीचें बाह्य जीवनचरित्र त्याच्या बुडाशीं त्यांच्या अन्तःकरणांत एकसारखी वृद्धिंगत होणारी एक धर्मप्रवृत्ति तशीच मुमुक्षावृत्ति होती. आपल्या जीवनांतील खासगी आणि सार्वजनिक असे सर्व व्यापार धर्मनिष्ठेनें आणि मुमुक्षुवृत्तीनें चाललेले आहेत, असें ते वारंवार लिहीत आणि त्याच दृष्टीनें त्यांचें वर्तन घडत असल्याचा साक्षात्कार जगाला होत असे. ही त्यांची मोक्षसाधना अखंड चालू होती. या पंचावन्न वर्षांत त्यांनीं हें धर्मनिष्ठेचें व मोक्षप्राप्तीचें स्वीकारलेलें ध्येय एक क्षणभरहि आपल्या दृष्टीआड होऊं दिलें नाहीं. तथापि आपल्या या मोक्षसाधनेसंबंधीं ते फारशी वाच्यता न करतां सतत सार्वजनिक जीवनांत, राजकारणांत वा समाजसेवेंत निमग्न झालेले दिसत. त्यांच्या निधनापूर्वीं फारच थोडे दिवस म्हणजे १५ ऑगस्ट १९४७ रोजीं हिन्दुस्थानचा स्वातंत्र्यदिन साजरा झाल्यानंतर थोड्याच दिवसांनीं ते कलकत्त्यांत असतांना एका ब्रिटिश वृत्तपत्रकाराशीं त्यांचें लोकसेवा आणि मोक्षसाधन यासंबंधीं संभाषण झालें. त्या ब्रिटिश वृत्तपत्रकारानें गांधीजींना विचारलें, 'आपण सामाजिक आणि राजकीय क्षेत्रांत इतके सतत निमग्न असतांना अशा विलक्षण प्रकारची अनासक्त वृत्ति कशी धारण करूं शकतां ?'

यावर गांधीजी म्हणाले, 'माझी समतोल वृत्ति केव्हांच ढळत नाहीं असें समजूं नका; तथापि असे प्रसंग फार क्वचित् येतात. अनेक वर्षांच्या अभ्यासानें व संयमानें आणि परमेश्वराच्या प्रसादानें मी








माझ्या मनोवृत्तींचा क्षोभ फारसा न होऊं देण्यांत यश संपादन केलें आहे. '

यानंतर त्या गृहस्थानें अधिक खोल असा एक प्रश्न उपस्थित केला : 'आपल्या सर्व व्यवहारांच्या बुडाशीं मोक्षप्राप्तीची—आत्मदर्शनाची इच्छा आहे असें आपल्या लेखनावरून दिसून येतें. पण आपल्या जीवनाच्या या अंगावर आपण बाह्यतः विशेषसा भर कां देत नाहीं ? '

यावर गांधीजींनीं थोडेंसें हंसून उत्तर दिलें,

"मोक्षाची इच्छा ही तर माझी आद्य प्रेरणा आहेच; पण तिचा संबंध माझ्या आत्मोद्धाराशीं आहे. जगाची दृष्टि वृक्षाच्या बाह्य फळावर असते; त्या वृक्षाचें मूळ लोकांच्या निदर्शनास येत नाहीं. पण वृक्षाच्या दृष्टीनें त्याचें जीवन फळापेक्षां मुळावरच अधिक अवलंबून असतें. व्यक्तीनें आपल्या अन्तः-करणांतील या जीवनवृक्षाच्या मुळाकडे खोल दृष्टि दिली पाहिजे. सर्व कष्ट करून व क्लेश भोगून त्यानें त्याच्यावर जलसिंचन केलें पाहिजे. मुळाचें संगोपन हें त्यानें आपलें कर्तव्य मानलें पाहिजे. पण समाजाचा संबंध त्याच्या जीवनवृक्षास लागणाऱ्या फळाशीं येत असतो. त्या फळावरूनच जग त्याच्या जीवनाची परीक्षा करीत असतें. कारण तेवढाच पुरावा जगाला उपलब्ध असतो. म्हणून मी नेहमीं फळाविषयीं अनासक्त राहून मुळावरच माझें स्वतःचें सर्व लक्ष केंद्रित करून त्याचें संगोपन करीत असतों. आपणाला माझ्या ठिकाणीं जी अनासक्तवृत्ति दिसत आहे तिचें हेंच रहस्य आहे. पण माझ्या स्वतःच्या दृष्टीनें विचाराल तर मी अद्यापि पूर्ण साक्षात्कारी अवस्थे-पासून फारच दूर आहें. मी म्हणजे पूर्ण मुक्त होण्यासाठीं सतत यत्नशील असा एक आत्मा आहें. माझा आदर्श सत्य आहे हें मी जाणतों; पण त्या आदर्शाप्रत मी अद्यापि पोंहोचूं शकलों नाहीं."

महात्मा गांधींनीं आपल्या जीवनाच्या अन्तरंगाकडे आणि बाह्यांगाकडे पाहण्याची ही जी विशिष्ट दृष्टि या इंग्रज गृहस्थापुढें मांडली, तींतच त्यांच्या जीव-नाचें सर्व रहस्य सांठविलेलें आहे, असें मला वाटतें. समाजसेवा आणि राजकारण हें त्यांच्या जीवनाचें बाह्यांग होतें आणि आत्मदर्शन हें त्यांच्या जीवनाचें अंतरंग होतें. त्यांना समाजसेवा आणि राजकारण करण्याचें सामर्थ्य ज्या आत्मप्रेरणेंतून प्राप्त होत होतें ती आत्मप्रेरणा शुद्ध स्वरूपांत प्रकट करण्यासाठीं त्यांनीं आपल्या सर्व जीवनाचा यज्ञ सुरू केला होता आणि त्या यज्ञांत त्यांनीं अखेरीस आपल्या सर्व-स्वाची पुर्णाहुति देऊन त्याची समाप्ति केली ! अशा प्रकारचा राष्ट्रीय नेता भरतखंडास लाभला नसता तर हिंदी राष्ट्र राजकीय दृष्टीनें आज स्वतंत्र झालें असतें किंवा नाहीं हा प्रश्न क्षणभर विवाद्य समजून बाजूस ठेवला, तरी आज या हिन्दी राष्ट्रास जगामध्यें जें बहुमानाचें स्थान प्राप्त झालेलें आहे आणि सर्व जग किंवा त्यांतील सामान्य जनता ज्या आशेनें आणि आदरानें हिन्दुस्थानकडे आज पाहत आहे, तें जगांतील स्थान अथवा तो जगाचा आदर त्याला संपादन करतां आला नसता याबद्दल कोणाचाहि मतभेद होऊं शकणार नाहीं. महात्मा गांधींनीं हिन्दी राष्ट्राचें नेतृत्व पत्करून त्याला राजकीय स्वातंत्र्य प्राप्त करून दिलें येवढ्यानें त्यांच्या कर्तृत्वाची सर्व माहिती आपणांस समजूं शकणार नाहीं. त्यांनीं आधुनिक भारतांत अेक अपूर्व असा आत्मविश्वास निर्माण केला आणि कशा तऱ्हेनें जगावें यासंबंधीं एक नवी दृष्टि सर्व मानवजातीला प्राप्त करून दिली. जगांतील सर्व राष्ट्रांनीं आपलें चरित्र हिंदी राष्ट्राच्या पुढाऱ्याकडे पाहून बनविण्याचा प्रयत्न करावा आणि आपला उद्धार करीत असतांना जगाच्या उद्धाराचा हेतु ध्रुवताऱ्याप्रमाणें आपल्या डोळ्यांपुढें अविचल ठेवावा, हें महात्मा गांधींनीं जगाला दाखवून दिलें. त्यांनीं आत्मोद्धारासाठीं अथवा आत्मोद्धाराच्या वृत्तीनें आपल्या राष्ट्राचा उद्धार केला आणि आपल्या स्वातंत्र्याचा उपयोग तुम्ही जगाच्या उद्धारासाठीं कराल तरच तुमच्या राष्ट्राचा खरा उद्धार होईल, ही निष्ठा या राष्ट्रांत निर्माण केली. त्यांची राष्ट्रभक्ति ही अशा प्रकारें आत्मोद्धार आणि जगदुद्धार यांच्याशीं निगडित झाली होती. ते राष्ट्राच्या प्रत्येक व्यवहारांत क्रांति घडवून आणण्याचा प्रयत्न करीत होते आणि ही राष्ट्रीय जीवनांतील सर्वांगीण क्रांति अहिंसेच्या साधनानें घडवून आणणें व ती घडवून आणण्याचा मार्ग दाखवून देणें हा त्यांच्या जीवनाचा संदेश होता. यामुळें त्यांनीं जगाला राजकारणाकडे, समाज—








कारणाकडे, अर्थकारणाकडे व धर्मकारणाकडे पाहण्याची एक नवी दृष्टि आणून दिली.

## क्रांतिकारक राजकीय दृष्टि

१९२० सालीं महात्मा गांधींनीं हिंदी राष्ट्रसभेचें नेतृत्व पूर्णपणें आपल्या हातीं घेतलें. ता. १ ऑगस्ट १९२० रोजीं लोकमान्य टिळक निधन पावले आणि महात्मा गांधींनीं त्याच दिवशीं अनत्याचारी असहकाराची पहिली राष्ट्रीय चळवळ सुरू केली. ऑगस्ट महिना हा आधुनिक भारताच्या राष्ट्रीय जीवनांत फार महत्त्वाचा गणला जाईल. १ ऑगस्ट १९२० रोजीं असहकाराचा जन्म झाला, ८ ऑगस्ट १९४२ रोजीं महात्मा गांधींनीं 'चले जाव!'ची घोषणा करून भारतीय जनतेला संपूर्ण स्वातंत्र्य प्राप्त करण्यासाठीं अखेरचें क्रांतिकारक आन्दोलन करण्याचा आदेश दिला आणि १५ ऑगस्ट १९४७ रोजीं ब्रिटिश साम्राज्यानें या देशांतून आपली सत्ता काढून घेऊन सर्व हिंदुस्थान ब्रिटिश साम्राज्याच्या सार्वभौमत्वांतून मुक्त झाल्याचें जाहीर केलें व हिंदी संघराज्य व पाकिस्तान अशीं दोन सार्वभौम राज्यें स्थापन करून त्यांच्या हातीं आपलीं राज्यसूत्रें सुपूर्द केलीं. या सर्व घडामोडी ऑगस्ट महिन्याच्या पूर्वार्धांत घडलेल्या आहेत, हा एक योगायोगच म्हटला पाहिजे. हिंदुस्थानचें राजकीय नेतृत्व ज्या वेळीं महात्मा गांधींकडे आलें त्या वेळीं संपूर्ण स्वातंत्र्य हें या राष्ट्रानें आपलें ध्येय बनविलेलें नव्हतें. निदान राष्ट्रसभेनें तरी त्याला मान्यता दिलेली नव्हती. राष्ट्रसभा ही केवळ राजकीय तत्त्वज्ञानाची संस्था नव्हती, ती राजकीय घडामोडी करणारी, राजकीय व्यवहार करणारी संस्था होती. जें राजकीय ध्येय साध्य करून घेण्याचें साधन आपणास उपलब्ध नाहीं, अशा राजकीय ध्येयाची घोषणा करणें तिला पसंत नव्हतें. आपण स्वतंत्र राष्ट्र बनूं शकूं, असा आत्मविश्वास वाटल्यावांचून ती संस्था हें ध्येय मान्य करूं शकणार नव्हती. महात्मा गांधींनीं अनत्याचारी असहकाराचें साधन तिच्यापुढें ठेवून तिच्यामध्यें व हिंदी जनतेमध्यें हा आत्मविश्वास निर्माण केला आणि म्हणून १९२० सालीं तिनें आपलें पूर्वीचें वासाहतिक स्वराज्याचें ध्येय बदलून 'शांततेच्या व न्याय्य मार्गांनीं स्वराज्याची प्राप्ति' हें नवें ध्येय स्वीकारलें.

यानन्तर दहा वर्षांनीं म्हणजे १९३० सालीं १ जानेवारीस या स्वराज्याचा अर्थ संपूर्ण स्वातंत्र्य असा जाहीर करण्यांत आला आणि त्यानंतर सतरा वर्षांनीं हें संपूर्ण स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याचें सामर्थ्य या राष्ट्रानें संपादन केलें! आज आपण स्वतंत्र राष्ट्राचा दर्जा प्राप्त करून घेतला आहे त्याचें श्रेय म. गांधींचें अनत्याचारी असहकाराचें तत्त्व आणि साधन यांसच दिलें पाहिजे. या स्वातंत्र्याच्या प्राप्तीसाठीं म. गांधींनीं तीन मोहिमा केल्या, असें स्थूल मानानें म्हणतां येईल. त्यांनीं १९२० सालीं जी अनत्याचारी असहकाराची चळवळ सुरू केली ती पहिली मोहीम. ही मोहीम १९२४ सालीं स्थगित करून राष्ट्रसभेंतील स्वराज्य–पक्षाला कौन्सिलांत जाऊन अडवणुकीच्या साधनानें स्वराज्य प्राप्त करून घेतां येईल कीं काय, तें पाहण्याचा प्रयोग करण्यास गांधींनीं संधि दिली. हा प्रयोग १९२९अखेर केल्यानन्तर स्वराज्य–पक्ष हताश झाला आणि १९३० सालीं सत्याग्रह–संग्रामाच्या रूपानें म. गांधींनीं दुसऱ्या मोहिमेस प्रारंभ केला. १९३० सालची मोहीम बऱ्याच प्रमाणांत यशस्वी होऊन ब्रिटिश सरकारनें राष्ट्रसभेशीं बरोबरीच्या नात्यानें सत्याग्रहतहकुबीचा करार केला आणि विलायतेंत गोलमेज–परिषदेच्या शिष्टाईसाठीं महात्मा गांधी राष्ट्रसभेच्या वतीनें गेले. पण ही शिष्टाई यशस्वी न होतां त्यांना परत येऊन पुनः सत्याग्रह–संग्रामाचा आदेश राष्ट्रास द्यावा लागला. हा सत्याग्रह–संग्राम १९३२ सालापासून १९३४ सालापर्यंत प्रथम सामुदायिक व नंतर वैयक्तिक स्वरूपांत चालू होता. यानंतर गांधीजींनीं ही दुसरी मोहीम पुनः स्थगित केली. या मोहिमेचा परिणाम संपूर्ण प्रांतिक स्वराज्याची प्राप्ति होण्यांत झाला; पण मध्य–सरकारचा प्रश्न तसाच अनिर्णीत स्वरूपांत राहिला. यानंतर म. गांधींनीं राष्ट्रसभेचें सभासदत्व सोडलें आणि आपण बाहेर राहूनच तिचें मार्गदर्शन करूं अशी वृत्ति धारण केली. तथापि पुनः एक स्वातंत्र्याचा निर्वाणीचा संग्राम केल्यावांचून आपला देश मुक्त होऊं शकत नाहीं हें ते जाणून होते. १९३७ सालीं राष्ट्रसभा प्रांतिक स्वराज्यावर आरूढ झाली; पण १९३९ सालीं दुसरें महायुद्ध सुरू होतांच ती अधिकार–












पदांचा त्याग करून पुनः असहकाराकडे वळली आणि १९४० सालीं म. गांधींच्या नेतृत्वाखालीं पुनः वैयक्तिक स्वरूपांत सत्याग्रह–संग्रामास सुरुवात झाली. ही तिसरी मोहिम. हा वैयक्तिक सत्याग्रह एक वर्षभर चालल्यानंतर ब्रिटिश सरकारनें क्रिप्स–शिष्टाई सुरू केली आणि हिन्दुस्थानचा संपूर्ण स्वातंत्र्याचा, स्वयंनिर्णयाचा तसाच घटना–परिषदेचाहि हक्क मान्य केला. पण त्या वेळीं या स्वयंनिर्णयाच्या हक्काचें दान त्यांनीं प्रत्येक प्रांताला व प्रत्येक संस्थानाला देऊं केलें आणि युद्ध चालू असेपर्यंत हे सर्व हक्क स्थगित करून युद्ध–साह्य करण्याची मागणी राष्ट्रीय पुढाऱ्यांपाशीं केली. अर्थात् ही शिष्टाई विफल झाली आणि सामुदायिक सार्वत्रिक सत्याग्रह करून स्वातंत्र्याचा निर्वाणीचा संग्राम करण्याचें गांधींनीं ठरविलें. हें प्रचंड आंदोलन दोन वर्षें चालल्यावर १९४५ सालीं म. गांधी बंधमुक्त झाले. यानन्तर हें आंदोलन स्थगित होऊन शिष्टाईचे अनेक प्रयत्न झाल्यानन्तर १९४७ सालीं हिंदी स्वातंत्र्याचा प्रश्न फाळणीच्या रूपानें कायमचा निकालांत निघाला! हिंदुस्थान द्विखंड झाला असला तरी तो स्वतंत्र झाला आहे आणि ब्रिटिश साम्राज्याखालीं तो अखंड असला तरी गुलाम होता, यांतील भेद ज्यांना समजत नाहीं किंवा समजला तरी तो मान्य करण्याचें व त्याची महती ओळखण्याचें मनोधैर्य ज्यांना होत नाहीं, त्यांना म. गांधींच्या क्रांतिकारक नेतृत्वाचें महत्त्व पटवून देणें प्रत्यक्ष विधात्यासहि शक्य नाहीं. परंतु असे दुर्दैवी प्राणी आतां या देशांत फारसे उरलेले नाहींत. गांधीजींचें राजकारण यशस्वी झालें, ही गोष्ट आतां इतिहास–नमूद झाली आहे. त्यांनीं हें जें राजकीय यश संपादन केलें आणि कोणत्याहि प्रकारची शस्त्रसामग्री उपलब्ध नसतांना येवढ्या प्रचण्ड राष्ट्राला दास्यमुक्त केलें त्याच्या बुडाशीं कोणती आत्मप्रेरणा किंवा कोणता आत्मविश्वास त्यांच्या अंतःकरणांत वसत होता?

## प्रजेचें स्वयंभू प्रभुत्व

त्यांनीं राजकीय घडामोडींकडे पाहण्याची एक नवीनच दृष्टि आपणांस दिलेली आहे. ही नवी दृष्टि म. गांधींच्या शब्दांत पुढीलप्रमाणें सांगतां येईल. ते म्हणतात :

"A superficial study of British history has made us think that all power percolates to the people from Parliaments. The truth is that power resides in the people and it is entrusted for the time being to those whom they may choose as their representatives. Parliaments have no power or even existence independently of the people. It has been my effort for the last twentyfive years to convince the people of this simple truth. Civil disobedience is the store--house of power. Imagine a whole people unwilling to conform to the laws of the legislature and prepared to suffer the consequences of non-compliance! They will bring the whole legislative and executive machinery to a stand-still. The police and the military are of use to coerce minorities, however powerful they may be. But no police or military coercion can bend the resolule will of a people who are out for suffering to the uttermost."

(Constructive Programme, page 8-9-1945)

ब्रिटिश लोकांनीं आपणांस असें भासविलें होतें कीं प्रजेला पार्लमेंटच्या कायद्यांनीं प्रभुत्वाची सत्ता प्राप्त होत असते. महात्मा गांधींनीं हिंदी जनतेला हा राजकीय धडा दिला कीं पार्लमेन्टकडून प्रजेला प्रभुत्वरूपी सत्ता प्राप्त होत नसून प्रजेचें प्रभुत्व हें तिच्या अंगीं स्वयंभूच असतें. प्रजेनें पार्लमेंटें निर्माण केलेलीं असतात आणि या पार्लमेंटांच्या सत्तेचा उगम प्रजेच्या प्रभुत्वांतूनच झालेला असतो. हें प्रजेचें प्रभुत्व सत्याग्रहांत सांठविलेलें आहे. 'कोणत्याहि राज्याचें प्रभुत्व हें त्यांतील प्रजेंतच असतें', हा सिद्धांत युरोपीय राज्यशास्त्रांत रूसोनें प्रथम मांडला आणि त्याच आधारानें अठराव्या शतकाच्या अखेरीस फ्रेंच लोकांनीं आपल्या देशांत राज्यक्रांति केली; पण त्या वेळीं त्या राज्यक्रांतींतून खरी लोकशाही निर्माण झाली नाहीं. फ्रेंच प्रजेचें प्रभुत्व पायांखालीं तुडवून नेपोलियननें लष्करी साम्राज्यशाही स्थापन केली. या लष्करी सत्तेपुढें आपलें प्रभुत्व कसें प्रकट करावें हें












युरोपीय जनतेला न समजल्यानें तेथील लोकशाही धनिकशाहीच्या आहारीं गेली. महात्मा गांधींनीं सत्याग्रहाच्या रूपानें हिन्दी प्रजेला आपलें प्रभुत्व प्रस्थापित करण्याचा एक शांततेचा मार्ग दाखवून दिला असून एक पार्लमेंटहि निर्माण करून दिलेलें आहे. या पार्लमेंटांतून प्रजेच्या प्रभुत्वाचा उगम होत नसून प्रजेनें आपलें प्रभुत्व सत्याग्रहाच्या रूपानें प्रकट केल्यास तिला पार्लमेंट निर्माण करतां येतें हा राजकीय क्रांतीचा प्रयोग म० गांधींनीं गेल्या तीस वर्षांत हिंदुस्थानांत कमी-अधिक प्रमाणांत यशस्वी करून दाखविलाच आहे व यापुढेंहि हिन्दी प्रजा जर आपल्या सत्याग्रही प्रभुत्वाचा हा सिद्धान्त विसरली नाहीं, तर तिला या देशांत राजकीय क्रांतीनन्तर अवश्य असणारी सामाजिक तशीच आर्थिक क्रांति करण्यांतहि लवकरच यश प्राप्त झाल्यावांचून राहणार नाहीं. यापुढें हेंच सामाजिक तसेंच आर्थिक क्रांतीचें कार्य सत्याग्रहाला करावयाचें आहे.

## लोकशाहीच्या सूर्यास धनिकशाहीचें ग्रहण

म. गांधी यांनीं जो सत्याग्रहाचा प्रयोग हिन्दुस्थानांत केला, त्यापासून केवळ राजकीय स्वातंत्र्याचा लाभ येवढीच प्राप्ति आपणास झालेली नाहीं. या राजकीय लोकशाहीचें रूपांतर आतां सामाजिक व आर्थिक लोकशाहींत झालें पाहिजे, असेंहि त्यांनीं आपणांस सांगितलेलें आहे. रूसोनें युरोपियन लोकांना ज्या लोकशाहीचा संदेश दिला ती लोकशाही आज धनिकशाहीनें पूर्णपणें ग्रासून टाकलेली आहे याची पूर्ण जाणीव महात्मा गांधींना होती. जोंपर्यंत या धनिकशाहीच्या खग्रास ग्रहणांतून लोकशाहीची मुक्तता झालेली नाहीं, तोंपर्यंत जनतेचें रक्तशोषण बंद होणार नाहीं हें महात्मा गांधींनीं बरोबर ओळखलें होतें; म्हणून केवळ राजकीय लोकशाही हें त्यांचें ध्येय नव्हतें. केवळ राजकीय लोकशाहीसंबंधीं त्यांचें मत पुढील उताऱ्यावरून दिसून येईल:

"Democracy which at one time, it was hoped, would serve as a panacea for all social evils, has proved to be far worse than the senseless feudal regime of the middle ages. It has simply replaced the erratic plundering raids of the "crag barons" of the medieval times, with silent universal process of organized robbery of the modern capitalist state, all the more dangerons, because it lulls the people into a false sense of security while, vampire-like, it sucks their life-blood, all the more deadly because whereas the "crag barons" of the past times could only enslave the body, the modern "bag baron" with far bitter poison of his purse infects and destroys the soul as well."

याचा सारांश थोडक्यांत पुढीलप्रमाणें सांगतां येईल:—जी लोकशाही सर्व सामाजिक आपत्तींवर रामबाण उपाय ठरेल अशी आशा एके काळीं वाटत होती, ती मध्ययुगीन सरंजामशाहीच्या अडाणी आमदानीपेक्षांहि फार हीन ठरलेली आहे. डोंगरी किल्ल्यांत राहणारे मध्ययुगीन सरदार जनतेवर मधून-मधून धाडी घालून तिच्या संपत्तीचा अपहार करीत असत, त्याऐवजीं आज भांडवलशाहीची सर्वव्यापक संघटित लूट सतत मुकाट्यानें चालू असते. लोकांचें जळूप्रमाणें रक्तशोषण करणारे हे आधुनिक 'थैलीवाले सरदार' लोकांत शाश्वतीचा भ्रम निर्माण करतात. पूर्वींच्या 'डोंगरी किल्ल्यांतील सरदारां'ची सत्ता केवळ शरीरांवरच चालत असे, तर हे आधुनिक 'थैलीवाले सरदार' जनतेच्या आत्म्यावरहि विषाचा प्रयोग करून त्याचा नाश करीत असल्यानें ही अवस्था अधिक भयानक आणि मारक बनलेली आहे.

महात्मा गांधींनीं हे विचार पहिली असहकाराची मोहीम सुरू केली त्याच्या पूर्वींच यंग इंडिया पत्रांत लिहून ठेवलेले आहेत. भांडवलदार लोकशाही आणि तिच्यामुळें निर्माण होणारी आर्थिक विषमता यासंबंधींचें त्यांचें हें मत पंचवीस वर्षांच्या अनुभवानंतर अधिकच दृढ झालेलें होतें. या आर्थिक विषमतेंतून हिंदुस्थानांत निर्माण होणाऱ्या लोकशाहीला रक्तपाती क्रांतीचा धोका निर्माण होणार आहे व म्हणून धनिकांनीं आपल्या संपत्तीचें स्वामित्व सोडून देण्यास तयार व्हावें, असा स्पष्ट इषारा त्यांनीं १९४५ सालीं लिहिलेल्या Constructive Programme (विधायक कार्यक्रम) या पत्रकांत










निःसंदिग्धपणें दिला आहे. त्यांत आर्थिक समतेच्या मुद्द्यावर ते लिहितातः —

"13. ECONOMIC EQUALITY—This last is the master-key to nonviolent independence. Working for economic equality means abolishing the eternal conflict between capital and labour. It means the levelling down of the few rich, in whose hands is concentrated the bulk of the nation's wealth on the one hand and the levelling up of the semi-starved naked millions on the other. A nonviolent system of government is clearly an impossibility so long as the wide gulf between the rich and the hungry millions persists. The contrast between the palaces of New Delhi and the miserable hovels of the poor labouring class nearby, cannot last one day in a free India in which the poor will enjoy the same power as the richest in the land. A violent and bloody revolution is a certainty one day, unless there is a voluntary abdication of riches and the power that riches give and sharing them for the common good."

आपल्या देशांत श्रीमंत आणि गरीब या दोघांनाहि सारखीच सत्ता देणारी लोकशाही स्थापन झाल्यास एक दिवसभरहि 'नव्या दिल्ली'तील श्रीमंतांचे मोठमोठे बंगले आणि त्यांच्याच शेजारीं असणारीं गरीबांचीं खोपटीं यांत व्यक्त होणारी आर्थिक विषमता टिकूं शकणार नाहीं, असें गांधीजी म्हणतात. ही विषमता नष्ट करण्यासाठीं आपली संपत्ति आणि त्या संपत्तीमुळें प्राप्त होणारी सत्ता या दोहोंचा त्याग करण्यास धनिक वर्ग जर स्वेच्छेनें तयार झाला नाहीं, तर या विषमतेंतून एक भीषण रक्तपाती क्रांति निर्माण होईल, असा इषारा देऊन गांधीजींनीं धनिक वर्गाला आपल्या कर्तव्याची जाणीव करून दिलेली आहे. ही विषमता कायम ठेवून अहिंसक राज्य निर्माण करतां येणें शक्य नाहीं आणि म्हणून सर्व विधायक कार्यक्रमाचा मूळ आधार आर्थिक समता हाच होय असें त्यांनीं सिद्ध केलें आहे. ही आर्थिक समता स्थापन करण्यासाठींच त्यांनीं 'श्रीमंतांनीं आपल्यापाशीं असणाऱ्या संपत्तीचे आपण मालक नसून निधिधारक आहों असें मानूं लागावें' हा सिद्धांत मांडला होता. हा निधिधारकत्वाचा सिद्धांत विशद करतांना ते लिहितात,

"The rich man will be left in possession of his wealth, of which he will use what he reasonably requires for his personal needs and will act as a trustee for the remainder to be used for the society. In this argument honesty on the part of the trustee is assumed."

याचा अर्थ असा कीं श्रीमंतांनीं आपल्या संपत्ती-पैकीं आपल्या वैयक्तिक गरजा भागण्याइतक्या संपत्तीचा उपभोग घेऊन उरणारी सर्व संपत्ति समाजाची आहे असें समजून समाजाचे निधिधारक या नात्यानें तिचा उपयोग समाजासाठीं करावा. या युक्तिवादांत हे निधिधारक प्रामाणिक राहतील असें मीं गृहीत धरलें आहे असें ते लिहितात. पण सर्व उपाय केल्यानंतरहि जर धनिक वर्ग गरिबांच्या हितरक्षणाचें कार्य करीनासा झाला आणि गरीब लोक दडपून जाऊन भुकेनें मरूं लागले तर काय करावें याचेंहि उत्तर त्यांनीं 'अनत्याचारी असहकार' या शब्दांनींच दिलेलें आहे. ते म्हणतात,

"If, however, the rich do not become guardians of the poor in the true sense of the term and the latter are more and more crushed and die of hunger, what is to be done? In trying to find out the solution of this riddle I have lighted on nonviolent noncooperation and civil disobedience as the right and infallible means. The rich cannot accumulate wealth without the cooperation of the poor in society. If this knowledge were to penetrate to and spread amongst the poor, they would become strong and would learn how to free themselves by means of nonviolence from the crushing inequalities








which have brought them to the verge of starvation."

( Harijan, 25—8—'40.)

तात्पर्य, ज्या अनत्याचारी असहकाराच्या आणि सत्याग्रहाच्या मार्गानें प्रजेला आपल्या राजकीय दास्यांतून मुक्त होतां येतें व आपलें प्रभुत्व राज्यसंस्थेवर प्रस्थापित करतां येतें त्याच अनत्याचारी असहकाराच्या मार्गानें व सत्याग्रहानें धनिकशाहीच्या आर्थिक दास्यांतूनहि जनतेला आपली मुक्तता करून घेतां येईल असा गांधीजींचा दृढ विश्वास होता. हा अनत्याचारी असहकाराचा व सत्याग्रहाचा संदेश दरिद्री जनतेला पोहोंचवून तिला आपल्या आर्थिक दास्यांतून आणि विषमतेंतून मुक्त केल्यावांचून आपल्या देशांत खरें स्वातंत्र्य प्रस्थापित झालें असें म्हणतां येणार नाहीं. विधायक राष्ट्रसंघटनेचा आणि अहिंसक राज्य निर्माण करण्याचा गांधीजींचा संदेश पुरा करण्याचा हाच एक मार्ग आहे.

## राष्ट्रसभेला अंतिम आदेश

म. गांधींनी १९२० सालीं राष्ट्रसभेचें नेतृत्व स्वीकारल्यापासून चौदा वर्षेंपर्यंत ते तिच्या कार्यकारिणीचे सभासद राहून तिचें प्रत्यक्ष नेतृत्व करीत असत. यानन्तर १९३४ सालीं त्यांनीं तिच्या सभासदत्वाचा त्याग केला. गांधीजींचें सत्याग्रही तत्त्व ज्या शुद्ध साधनांच्या सिद्धांताचा प्रचार करतें, तीं शुद्ध साधनें राज्यतंत्र चालविणाऱ्या मंत्रिमंडळांना तंतोतंत अंमलांत आणणें शक्य नाहीं. राजसत्ता हातीं घेतल्यानन्तर लोकरक्षणासाठीं हिंसेचा उपयोग करावा लागतो आणि त्यामुळें सत्यनिष्ठेलाहि बाध येतो. यामुळें गांधीजींचा सत्याग्रह केव्हांहि राजधर्म बनूं शकणार नाहीं असें माझें स्वतःचें मत आहे. तथापि, प्रजाधर्म या नात्यानें सत्याग्रहाला राज्यसंस्थेंत फार महत्त्वाचें स्थान आहे. राज्यसंस्थेचा लोप करण्याचा आदर्श जिवंत ठेवण्यास प्रजाधर्मांत सत्याग्रहवृत्तीचें स्थान दाखवून देऊन गांधीजींनीं राज्यशास्त्रांत फार महत्त्वाची भर टाकलेली आहे. रूसोचें प्रजाप्रभुत्वाचें तत्त्व जसें गांधीजींनीं सत्याग्रहाच्या उपदेशानें मूर्त स्वरूपास आणून दाखविलें, त्याचप्रमाणें लोकशाहीवर धनिकशाहीचें होणारें आक्रमण नष्ट करून मार्क्सप्रभृति समाजवाद्यांना जी एकवर्ग समाजघटना निर्माण करावयाची आहे, ती सुद्धां रक्तपाती वर्गविग्रह टाळून कशी स्थापन करतां येईल हें गांधीजींच्या सत्याग्रहापासून समाजवाद्यांना शिकतां येण्यासारखें आहे. भांडवलदार वर्गाचें आर्थिक प्रभुत्व अनत्याचारी असहकाराच्या मार्गानें व सत्याग्रहानें नष्ट करून लोकशाहीचें शुद्धीकरण करणें, हें आपल्या राष्ट्राचें यापुढील आद्य राजकारण आहे. गांधीजींनीं या सर्व गोष्टी आपल्या प्रज्ञाचक्षूनें पाहिलेल्या होत्या. त्यांचा सत्याग्रहाच्या सामर्थ्यावर येवढा प्रचंड विश्वास होता कीं, राजकीय, सामाजिक व आर्थिक अशा सर्व प्रकारच्या अन्यायांपासून बहुजनसमाजाची मुक्तता करण्याचें सामर्थ्य आपल्या सत्याग्रहांत आहे आणि म्हणून यापुढें सशस्त्र क्रांतीची गरजच पडणार नाहीं, असें ते मानीत असत. सत्याग्रहाचें हें सामर्थ्य ओळखून प्रजेवरील सर्वांगीण अन्यायाचें निराकरण करण्याचें साधन राष्ट्रसभेनें बनावें आणि आपल्या स्वतंत्र देशांत निर्माण झालेली लोकशाही या आध्यात्मिक साधनाच्या योगानें धनिकसत्तेच्या आक्रमणांतून मुक्त करावी, असा त्यांचा राष्ट्रसभेला अखेरचा आदेश होता. लोकशाही ही शुद्ध आणि वर्गभेदरहित व्हावयाची, तर तिच्या मतदारांना सत्यनिष्ठ, निर्भय आणि सुज्ञ बनविण्याचें कार्य कोणीं तरी सतत केलें पाहिजे. लोकशाही राज्यांत अनेक राजकीय पक्ष निर्माण होतात आणि ते बहुमताचा पाठिंबा सूक्तासूक्त मार्गांनीं मिळवून राज्ययंत्रावर आपला कबजा स्थापन करण्याचा प्रयत्न करतात. असे अनेक पक्ष निर्माण होणें हें लोकशाहीचे एक शाश्वत चिन्ह आहे असेंच महात्मा गांधींचें मत होतें. समाजघटनेच्या व राजकीय धोरणांच्या निरनिराळ्या तत्त्वांवर उभारलेले अनेक पक्ष देशांत निर्माण होणें हें नैसर्गिक आणि उन्नतिकारकहि आहे. बुद्धिस्वातंत्र्य, व्यक्तिस्वातंत्र्य आणि लोकशाही यांचा तो स्वाभाविक परिणाम आहे. एकच पक्ष सर्वंकष सत्ताधारी बनेल, तर तो लोकशाहीचा अन्तच समजला जाईल. अशा सर्वंकष एकपक्षसत्ताक राज्यांत लोकशाही जिवंत राहूं शकत नाहीं; म्हणून निरनिराळ्या पक्षांच्या संघटनेपासून अलिप्त राहून व स्वतः केव्हांहि सत्तारूढ होण्याचा










अभिलाष न धरतां, केवळ निष्कामबुद्धीनें जनतेची सेवा करणारे आणि आपल्या संपत्तीचा त्याग करून सत्ता व संपत्ति यांना वश न होतां सत्यनिष्ठ राहण्याचा धडा जनतेला घालून देणारे लोकसेवक महात्मा गांधींना हवे होते. हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यानंतर राष्ट्रसभेनें लोकशाहीच्या शुद्धीकरणाचें हें आध्यात्मिक कार्य अंगीकारावें आणि राज्ययंत्र हस्तगत करण्याचा प्रयत्न करणारे जे अनेक पक्ष या देशांत निर्माण होतील, त्यांच्यापैकीं कोणत्याहि पक्षाचें वर्चस्व आपणावर राहूं नये यासाठीं राष्ट्रसभेनें स्वतः अधिकारसंन्यास करावा येवढेंच नव्हे तर आपल्यांपैकीं ज्या कोणास अधिकारस्वीकार करण्याची इच्छा असेल, त्यानें राष्ट्रसभेच्या सभासदत्वाचा राजीनामा दिला पाहिजे, असा नियम घटनेंत घालावा असा आदेश म. गांधींनीं स्वातंत्र्यप्राप्तीनंतर राष्ट्रसभेला दिला होता. राष्ट्रसभेच्या संघटनेनें स्वतः अधिकारस्वीकार न करतां केवळ लोकसेवक-संघांत आपलें रूपान्तर करून घेतलें असतें, तर निवडणुकीस उभें राहणाऱ्या कोणत्याहि पक्षास तिच्या नांवाचा उपयोग करतां आला नसता, सत्ताभिलाषी व संधिसाधू अशा व्यक्तींचा भरणा राष्ट्रसभेंत झाला नसता आणि कोणत्याहि पक्षानें बहुमतास वश करून देशांतील राज्ययंत्र हस्तगत केलें असतें तरी त्याला या देशांतील लोकशाही राज्याचा अंत करून एकपक्षीय अनियंत्रित सत्ता स्थापन करतां आली नसती; व तसा प्रयत्न कोणत्याहि पक्षानें केला असता तर जनतेच्या संघटित आत्मबलानें किंवा सत्याग्रहानें त्याचा तो प्रयत्न विफल करून प्रजेचें प्रभुत्व शाबूत ठेवण्याचें कार्य राष्ट्रसभेला करतां आलें असतें. राष्ट्रसभेला स्वतः अशा प्रकारचा लोकसेवकांचा संघ बनल्यावांचून आपल्या देशांत निर्माण झालेली लोकशाही शुद्ध ठेवून तिच्या पाठीमागें आध्यात्मिक अधिष्ठान निर्माण करतां येणार नाहीं. राष्ट्रसभेचें यंत्र पक्ष-विशिष्ट बनून तें भ्रष्ट बनूं लागल्याचें महात्मा गांधींना दिसत होतें. ता. २७ जानेवारी १९४८ रोजीं त्यांनीं यासंबंधीं व राष्ट्रसभेच्या भवितव्यासंबंधीं लिहिलेला लेख नवजीवन-प्रकाशन-संस्थेच्या 'विधायक कार्यक्रम' या पत्रकाला परिशिष्ट-रूपानें जोडण्यांत आलेला आहे. त्यांत ते म्हणतात,

" The Congress has got the preliminary and necessary part of her freedom. The hardest has yet to come. In its hardest ascent to democracy, it has inevitably created rotten boroughs, leading to corruption and creation of institutions, popular and democratic only in name. How to get out of the weedy and unwieldy growth?

" The Congress must do away with its special register of members at no time exceeding one crore, not even then easily identifiable. It had an unknown register of millions who could never be wanted. Its register should now be coextensive with all the men and women on the voters' roll in the country.... ... On its own register it will have a body of servants of the nation, who would be workers doing the work allotted to them from time to time. ......These servants will be expected to operate upon and serve the voters registered according to law in their own surroundings. Many persons and parties will woo them. The very best will win. Thus and in no other way can the Congress regain its fast ebbing unique position in the country. But yesterday the Congress was unwittingly the servant of the nation; it was Khudai Khidmatgar—'God's servant', Let it now proclain to itself and the world that it is only God's servant,—nothing more, nothing less. If it engages in the ungainly skirmish for power, it will find one fine morning that it is no more. Thank God, it is now no longer in sole possession of the field !"

( New Delhi, 27—1—'48. )

हा उतारा लक्षपूर्वक वाचल्यास राज्ययंत्र काबीज करण्याच्या अथवा आपल्या हातांत ठेवण्याच्या म्हणजेच सत्तास्पर्धेच्या राजकारणांतून राष्ट्रसभेनें आपलें










अंग काढून घ्यावें आणि यापुढें केवळ विधायक लोकसेवेनें जनतेचें आत्मबल जागृत व प्रभावी करण्याचें राजकारण तेवढेंच करावें म्हणजेच आपल्या देशांत स्थापन झालेली लोकशाही शुद्ध राहील व मतदारांना सत्यनिष्ठ, निर्भय आणि सुज्ञ ठेवण्याचें कार्य करीत राहण्यानेंच राष्ट्रसभा त्या लोकशाहीं-तील प्रजेचें खरें प्रभुत्व अबाधित ठेवूं शकेल, अशी गांधीजींची अपेक्षा होती, हें उघड दिसून येईल. कायदेमंडळांत व पार्लमेंटांत निवडून येणाऱ्या एकाद्या पक्षाचें प्रचारयंत्राचें स्वरूप राष्ट्रसभेला कधींहि प्राप्त होऊं नये, अशी त्यांची सतत इच्छा होती. सत्ताधारी संघटित एकपक्ष संस्था अशी राष्ट्रसभा बनल्यास तिला पूर्वीचें राष्ट्रीय संस्थेचें सर्वपक्षीय स्वरूप उरणार नाहीं व तिनें एकपक्षीय स्वरूप स्वीकारणें ही तिची एक प्रकारें आत्महत्याच होईल, असें गांधीजींना वाटत होतें. यासंबंधीं ३ ऑगस्ट १९४७ रोजीं हरिजनांत प्रसिद्ध झालेल्या एका लेखांत ते म्हणतातः

"The Congress has been national from its very birth in 1885. It has never represented a party; but by it have been represented all parties and all Indians. Of course, it is open to this great national organization any day to commit suicide by becoming a party machine. The calamity may overtake it, if God's wrath descends upon it; never-the-less, many will be praying that such a misfortune may never befall it."

या उताऱ्यावरून राष्ट्रसभेला एकपक्षीय संघटना बनविण्याविरुद्ध महात्मा गांधींच्या भावना किती तीव्र होत्या हें दिसून येईल. दादाभाई नौरोजी, लोकमान्य टिळक आणि महात्मा गांधी या तीनहि राष्ट्रपुरुषांनीं आपल्या काळांत राष्ट्रसभेला एकपक्षीय संघटना बनविण्याविरुद्ध जोराचे प्रयत्न केले. राष्ट्रसभा ही ब्रिटिश पार्लमेंटप्रमाणें आपल्या देशाची सर्व-पक्षीय प्रातिनिधिक संघटना असावी आणि तिच्या-मध्यें पोटपक्षहि स्थापन करण्याची मुभा असावी असा या तिघांचाहि आग्रह असे. हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यानंतर राष्ट्रसभेचें भवितव्य काय होणार, हा प्रश्न दादाभाई किंवा टिळक यांच्यापुढें निर्माण झालेला नव्हता. म. गांधी आणि पंडित जवाहरलाल नेहरू यांच्यापुढें हा प्रश्न अनेक वर्षें उभा असावा. १९३१ सालीं 'गांधी–आयर्विन'–करार झाल्यावर स्वातंत्र्यप्राप्तीनंतर राष्ट्रसभेचें काय होणार याबद्दल सिमल्यास महात्मा गांधी व पं. जवाहरलाल नेहरू यांच्या दरम्यान पुढीलप्रमाणें खासगी संभाषण झाल्याचें पंडितजींनीं आपल्या आत्मचरित्रांत नमूद केलेलें आहे. ते लिहितात—

"भविष्यकाळच्या कॉंग्रेसविषयीं गांधीजींची कल्पना ऐकून मी चाकितच झालों. माझी समजूत अशी कीं स्वातंत्र्य मिळाल्यावर कॉंग्रेससंस्था आपोआपच नष्ट होईल. त्यांचें मत असें कीं कॉंग्रेस पुढेंहि चालू राहावी; मात्र एका अटीवर : तिच्या कोणत्याहि सभासदानें सरकारी अधिकार स्वीकारूं नये व कोणालाहि अधिकार स्वीकारावयाचा असेल तर त्यानें कॉंग्रेसमधून अंग काढून घ्यावें, अशी शिस्त कॉंग्रेसनें सभासदांवर जारी करावी. त्यांची योजना सगळीच्या सगळी मला आठवत नाहीं; परंतु तिच्यांतील आधारभूत कल्पना अशी होती कीं आपल्या वैराग्यानें व निःस्वार्थीपणानें शासन–संस्थे-च्या कार्यकारी व इतर अंगांवर आपली नैतिक छाप कॉंग्रेसला पाडतां येईल व त्यांना योग्य मार्गावर राखतां येईल. ......आधीं ठरविलेल्या आपापल्या योजनांप्रमाणें राजकीय व आर्थिक व्यवस्थेची पुनर्घटना करण्यासाठीं राजसत्तेचा कबजा घेऊं पाह-णाऱ्या आधुनिक पक्षसंघटना गांधीजींना मान्य नव्हत्या. आर. एस्. टॉने यांच्या शब्दांत सांगा-वयाचें तर अधिकांत अधिक खेचरांना अधिकांत अधिक गाजरें चारण्यासाठीं ('to offer the largest number of carrots to the largest number of donkeys') आजचे पक्ष अस्तित्वांत आलेले दिसतात! तसें त्यांना नको होतें."

राष्ट्रसभेवर फॅसिस्टांप्रमाणें किंवा कम्युनिस्टांप्रमाणें एकपक्षी आणि अनियंत्रित सत्ता स्थापन करण्याचा आरोप गेल्या महायुद्धकाळांत लॉर्ड सॅम्युअल यांनीं केला होता. त्या वेळीं म. गांधींनीं या आरोपाचें खंडन करण्यासाठीं एक पत्र येरवडाजेलमधून








ता. १५ मे १९४३ रोजीं लिहिलें होतें. त्यांत एकपक्षीय सर्वंकष सत्ता स्थापन करण्याचा आरोप खोडून काढतांना गांधींनीं दोन मुद्द्यांवर विशेष भर दिला असल्याचें दिसून येतें : एक, राष्ट्रसभेमध्यें अनेक पक्ष नांदूं शकतात हा; आणि दुसरा, राष्ट्रसभा ही हिंसावादाचा आश्रय करीत नाहीं हा. त्यांचें यासंबंधींचें विवेचन पुढीलप्रमाणें आहे:—

"Totalitarian state means a state with only one governing party. It must have violence for its sanction for keeping control. A Congress member on the contrary enjoys the same freedom, as the Congress president or any member of the Working Committee. There are parties within the Congress itself. Above all Congress eschews violence."

जर कॉंग्रेस—संस्थेमधील पोटपक्षांना घटनेनें बंदी केली आणि तिनें राज्यसंस्था हस्तगत केली व तेवढा एकच पक्ष आपल्या राज्यांत उरला, तर कॉंग्रेस—पक्षाचें राजकारण फॅसिस्टांप्रमाणें एकपक्षीय अनियंत्रित सत्तेचें बनूं शकेल असा स्पष्ट निष्कर्ष गांधीजींच्या वरील विवेचनावरून निघूं शकतो. कोणताहि सत्ताधारी पक्ष लोकसंग्रहार्थ करावी लागणारी अपरिहार्य हिंसा टाळूं शकत नाहीं; आणि जर त्या एका पक्षाहून अधिक पक्ष त्या राज्यांत नसतील, तर तें राज्य अनियंत्रित पक्षसत्तेखालीं असून तेथें लोकशाही नांदत नाहीं असें म्हणावें लागेल. राष्ट्रसभेनें सत्तास्पर्धेच्या क्षेत्रांतून आपलें अंग काढून घ्यावें आणि नव्या राज्यघटनेप्रमाणें निर्माण होणाऱ्या सार्वत्रिक मतदारांची सेवा करणाऱ्या लोकसेवकसंघांत आपलें रूपांतर करावें, असें सुचवीत असतांनाहि गांधीजींनीं हें गृहीत धरलें आहे कीं, आपल्या लोकशाही राज्यांत मतदारांचीं मतें मागून राज्यसत्तेवर आरूढ होऊं इच्छिणारे अनेक पक्ष मतदारांपुढें येतील व त्यांतील जो पक्ष सर्वश्रेष्ठ असेल त्यालाच मतदार आपलीं मतें देतील. अशा परिस्थितींत आपल्या विश्वासांतील खऱ्या पक्षास मत देण्याइतकें नीतिधैर्य व इतकी सुज्ञता मतदारांच्या अंगीं आणण्याचें कर्तव्य करावयाचें तर तें लोकसेवकसंघानें स्वतः सत्तास्पर्धेपासून अलिप्त राहून व कोणत्याहि पक्षाचें बंधन न स्वीकारतांच केलें पाहिजे अशी गांधीजींची स्पष्ट कल्पना आहे व म्हणूनच त्यांनीं म्हटलें आहे कीं,

"These servants will be expected to operate upon and serve the voters registered according to law in their own surroundings. Many persons and parties will woo them. The very best will win. Thus and in no other way can the Congress regain its ebbing unique position in the country. ......... If it engages in the ungainly skirmish for power, it will find one fine morning that it is no more. Thank God, it is now no longer in sole possession of the field!"

यावरून आपल्या देशांत कॉंग्रेस नांवाचा एकच राजकीय पक्ष असावा व तोच सत्ताधारी असावा, अशी कल्पना गांधीजींच्या मनास शिवलीहि नव्हती हें उघड होतें.

### लोकशाही राज्याचें आध्यात्मिक अधिष्ठान

लोकशाही राज्यांत मतदारांची अखंड सेवा करणारे आणि सत्ता व संपत्ति यांच्यापासून सदैव अलिप्त राहणारे असे लोकसेवक निघाले पाहिजेत आणि त्यांनीं कोणत्याहि पक्षाचें बंधन न स्वीकारतां केवळ आपल्या शुद्ध बुद्धीप्रमाणें लोकांना सत्यनिष्ठेनें मार्गदर्शन करीत राहिलें पाहिजे. ज्या वेळीं लोकशाही राज्याला आधारभूत अशा राष्ट्रीय स्वातंत्र्यावर कोणताहि सत्ताधारी पक्ष कायदेशीर अगर बेकायदेशीर आक्रमण करील, त्या वेळीं अशा अन्यायाविरुद्ध प्रजेला अनत्याचारी मार्गानें झगडण्याचें शिक्षण देणारे आणि सामान्य जनतेवर होणाऱ्या आर्थिक, सामाजिक व राजकीय अन्यायांचें निवारण सत्याग्रहाच्या साधनानें करण्याचे वस्तुपाठ देणारे सत्याग्रही लोकसेवक ज्या राज्यांत असतील त्याच राज्याला आध्यात्मिक अधिष्ठान प्राप्त होईल असें म० गांधीजींचें मत होतें. हें कार्य लोकशाहीच्या संरक्षणास व शुद्धीस अत्यंत आवश्यक असून केवळ नैतिक बलानें राज्यसत्तेला आपला प्रभाव मान्य करावयास लावण्याचें सामर्थ्य अशा लोकसेवक—








# महात्मा गांधींचें राष्ट्रीय नेतृत्व

संघाच्या अंगीं यावयास हवें असेल तर, ज्या राष्ट्र-सभेनें सत्याग्रहानें आपला देश स्वतंत्र बनवून आपलें सिंहासन प्रजेच्या अन्तःकरणावर स्थापन केलें, त्या राष्ट्रसभेनेंच स्वतः या लोकसेवकसंघांत आपलें परिवर्तन केलें पाहिजे असा म. गांधींचा अंतिम आदेश होता. ही राष्ट्रीय संस्था सर्व पक्षांना पूज्य आणि आदरणीय व्हावयास हवी असेल तर तिनें सत्तास्पर्धेच्या क्षेत्रांतून आपलें अंग काढून घेतलें पाहिजे आणि केवळ लोकशाहीच्या आधारभूत तत्त्वाचें संरक्षण करण्यासाठींच आपलें राजकीय कार्य चालू ठेवलें पाहिजे; स्वतः सत्ताधारी एकपक्षीय स्वरूप स्वीकारल्यानंतर इतर पक्षांना किंवा जनतेला मात्र 'सत्ताविरहित व केवळ सेवेचें राजकारण करा' असें सांगण्याचा नैतिक अधिकार तिला प्राप्त होऊं शकणार नाहीं. हें थोर कार्य तिनें स्वतःच केलें पाहिजे व ती तें करूं लागेल तर आपल्या देशांतील लोकशाहीला सत्याग्रहाचें आध्यात्मिक अधिष्ठान लाभून 'प्रजेचें प्रभुत्व' हा रूसोचा सिद्धांत तिला मूर्त स्वरूपास आणतां येईल इतकेंच नव्हे, तर कार्ल मार्क्सला अभिप्रेत असणारी एकवर्ग समाजरचना निर्माण करून अखेरीस हिंसामूलक राज्यसंस्थेचा क्रमाक्रमानें लोप करण्याचा मार्गहि ती मानवाला दाखवून देऊं शकेल. सत्याग्रहानें सत्य-युगाच्या संस्थापनेपर्यंतचा मार्ग सामान्य जनतेला दाखवून देऊन महात्मा गांधींनीं केवळ आपल्या राष्ट्राचाच नव्हे तर अखिल मानवजातीचा उद्धार केलेला आहे व रूसो आणि मार्क्स या दोघांनाहि अभिप्रेत असणारें ध्येय प्रजेला आत्मबलानें प्राप्त करून घेतां येईल आणि जगांतून अन्याय, हिंसा आणि विषमता यांचा आत्यंतिक लोप करतां येईल अशी आशा मानवाच्या अन्तःकरणांत पुनः अंकुरित केलेली आहे. ज्या काळांत सर्वंकष एकपक्षीय अनियंत्रित सत्तेच्या राजकीय विचारांचा उद्भव युरोपीय राजकारणांत होऊं लागला आणि फॅसिझम आणि कम्युनिझम या दोहोंच्या टकरींत युरोपीय लोकशाही नामशेष होऊं लागली, त्या काळांत महात्मा गांधींनीं भारतीय जनतेच्या अंतःकरणांत लोकशाहीवरील निष्ठा दृढमूल बनविली, सत्याग्रहाच्या रूपानें त्या लोकशाहीला प्रभावी असें आध्यात्मिक अधिष्ठान निर्माण केलें व आपल्या देशांत व जगांत जीं लोकशाही राज्यें आहेत, त्यांच्यावर होत असलेली व होणारी धनिकशाहीची कुरघोडी फेंकून देण्याचें प्रभावी साधन सामान्य जनतेच्या हातीं दिलें. गांधीजींनीं हें एक नवेंच राजकारण जगापुढें मांडलें असून त्यायोगें राजकीय कर्मयोगांत अपरिहार्य गणली गेलेली हिंसा नष्ट करण्याचा नवा मार्ग लोकांना दाखवून दिला आहे. महात्मा गांधींना जगांतील सर्व राष्ट्रांकडून आज जो मान मिळत आहे, त्याचें हें आद्य कारण आहे. महायुद्धें आणि रक्तपाती क्रांत्या यांनीं जर्जर झालेल्या मानवी संस्कृतीची मुक्तता करण्याचा मार्ग दाखवून देणाऱ्या महात्म्याला सामान्य जनतेनें अवतारी पुरुष म्हटलें तर त्याबद्दल आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. सर्व धर्मांतल्या अवतारी पुरुषांचा संदेश एकच आहे. आणि तो आजच्या परिस्थितींत कसा आचरावा हें दाखवून देऊन मानवजातीवर ओढवलेलीं अरिष्टें दूर करण्याचा मार्ग दाखवून देणारा क्रांतिकारक धर्मपुरुष अशी गांधींची ख्याति आज जगभर झालेली आहे. भगवद्गीतेंत म्हटल्याप्रमाणें गांधीजींनीं दाखवून दिलेल्या सत्याग्रह-धर्मासंबंधींहि आपणांस असें म्हणतां येईल कीं,

**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्।**

---

'अहिंसेवर माझी श्रद्धा आहे. ह्या श्रद्धेमुळें ऐहिक भूमिकेपेक्षां किती तरी उंच अशा भूमिकेवर माझें मन आरूढ होतें. एखादा मनुष्य आपणांस शत्रु म्हणून मानीत असेल, तरी त्याच्याविषयीं अनुदार विचार मनांत येऊं न देणें शक्य आहे. अशी ज्याची विचारसरणि आहे, त्याला शत्रु असा कोणी नाहीं. मला तरी कोणी शत्रु नाहीं. जर कोणता एकमेव सद्गुण अंगीं बाणवावासा मला वाटत असेल तर तो म्हणजे सत्य आणि अहिंसा हा होय.'

**—म. गांधी**

श्री. वा. मु. लिमये

# भारतीय संघराज्याची रचना

भारताचें नवें 'राज्यवंधारण (Constitution) संघराज्यात्मक आहे ही गोष्ट सर्वांच्या परिचयाची आहे. संघराज्य ही एक वैशिष्ट्यपूर्ण राज्यघटना आहे; परंतु याचा अर्थ संघराज्यात्मक राज्यघटनेचा एकादा ठरीव सांचा आहे असा नाहीं. घटकांना स्वत्व (identity) राखूनहि ऐक्य साधतां येईल अशी सोय संघराज्यत्मक राज्यघटनेंत केलेली असते. संघराज्य अस्तित्वांत येण्यास खालील गोष्टी कारणीभूत होतात : घटकांची भौगोलिक संलग्नता, संरक्षणाचे प्रश्न, आर्थिक हितसंबंध, मानववंशात्मक व सांस्कृतिक भावना आणि राजकीय हितसंबंध. घटकांच्या वैशिष्ट्यांचा परामर्श घ्यावयाचा हें संघ–राज्यात्मक राज्यव्यवस्थेचें एक प्रधान सूत्र आहे. राष्ट्रामध्यें वैशिष्ट्यपूर्ण घटक नसल्यास संघराज्यात्मक राज्यव्यवस्थेची जरूरी पडणार नाहीं.

## संघराज्याच्या घटनेंत आवश्यक अशा गोष्टी

संघराज्य म्हटलें कीं ज्या गोष्टी संघराज्याच्या घटनेंत घटनाशास्त्रज्ञाच्या दृष्टीनें असावयास पाहिजेत त्या अशा : लिखित राज्यघटना, सत्ताविभजन (Distribution of powers), घटकांची स्वायत्तता, द्विमंडळपद्धति, दोन सरकारांचें अस्तित्व (दोन पातळ्यां(Levels)वर कार्य करणारीं सरकारें : घटक-सरकार व मध्यसरकार) आणि न्यायालयाचें वर्चस्व. या बाबींपैकीं कित्येक बाबींचें मूळ उगमस्थान घटकांच्या वैशिष्ट्यांचा परामर्श घ्यावयाचा या सूत्रांत आहे. कांहींचा उगम राज्यघटनेच्या लिखित स्वरूपांत असून कांहींचा सत्ताविभजनाच्या कल्पनेंत आहे असें दिसेल. परंतु वैशिष्ट्याचें उगमस्थान अगदीं एकच आहे असें कांहीं म्हणतां येणार नाहीं. उदाहरणार्थ, न्यायालयाच्या वर्चस्वास घटनेचें लिखित स्वरूप व सत्तेचें विभजन या गोष्टी कारणीभूत असलेल्या दिसतील. उलट, सत्ताविभजनाच्या प्रथेमुळें लिखित स्वरूपाची आवश्यकता निर्माण होते. आणि सत्ताविभजन अवश्य होतें तें घटकांच्या वैशिष्ट्यामुळें. दोन सरकारांचें अस्तित्व सत्ताविभजन आणि घटकांच्या वैशिष्ट्यांची जपणूक यांमुळें आहे असें म्हटलें तरी, सत्ताविभजनाची जरूरीच घटकांच्या वैशिष्ट्यामुळें निर्माण झाली आहे असें दिसून येतें आणि म्हणूनच संघराज्यात्मक राज्यव्यवस्थेच्या वैशिष्ट्याचें मूळ उगमस्थान घटकांचें वैशिष्ट्य हें होय, अशा निर्णयास यावें लागतें. संघराज्यांत द्विमंडळपद्धतीनुसार Federal Legislatureच्या वरिष्ठ विधिमंडळांत घटकांना समान प्रतिनिधित्व देण्याची प्रथा आहे. कनिष्ठ सभागृहांत मात्र लोकसंख्येच्या प्रमाणांत जागा देतात. लोकसंख्येच्या व आर्थिक अथवा औद्योगिक दृष्टींनीं घटकांचें महत्व सारखें नसणारच; पण घटकांची अधिकार–कक्षा समान असल्यामुळें त्यांचा राजकीय दर्जा समान असतो व त्या दर्ज्याला समान प्रतिनिधित्व देऊन मान्यता देतात. द्विमंडळपद्धति ही घटकांच्या समान राजकीय दर्जाची निदर्शक मानली, तरीहि ह्या समान दर्ज्याच्या कल्पनेचा उगम घटकांच्या वैशिष्ट्यांतच आहे हें मान्य करावेंच लागेल. तेव्हां संघराज्यात्मक राज्यघटनेंत इतर तरतुदी कांहीं का असेनात, पण घटकांना स्वत्व लाभलेलें आहे आणि त्यांच्या वैशिष्ट्यांचा परामर्श घेण्यांत आला आहे, असें दृश्य कोणत्याहि संघराज्याच्या घटनेचें निरीक्षण केलें तरी त्यांत दिसलें पाहिजे.

## भारतीय संघराज्याचे घटक

भारतीय संघराज्याचे घटक तीन प्रकारचे आहेत:



अनुक्रमणिका






आजचे गव्हर्नरांचे प्रांत, पूर्वीचे व तीन नवे हाय-कमिशनरांचे प्रांत आणि देशी संस्थानें व संस्थानसंघ-राज्यें हे ते तीन प्रकारचे घटक होत. संस्थानांचें विलीनीकरण व संस्थानांचीं संघराज्यें यांमुळें घटकांची संख्या कमी झाली आहे. घटकांची संख्या आटोपशीर असणेंच इष्ट आहे. संरक्षणात्मक-दृष्ट्या विचार करतां जेसलमीर, कच्छ व हिमाचलप्रदेश हे तीन नवे हायकमिशनरांचे प्रांत निर्माण करण्यांत आले हें योग्यच झालें; परंतु अद्यापि भाषावार व सांस्कृतिक अधिष्ठान असलेले मूलभूत संघराज्यीय घटक (Primary federating units) निर्माण करण्याचें काम धडाडीनें सुरू करण्यांत आलेलें नाहीं. बिहारचे दोन जिल्हे पश्चिम बंगालला जोडले जाणें इष्ट आहे; त्याचप्रमाणें विलीन झालेल्या ओरिसा संस्थानांचा मुलूख ओरिसा व बिहार यामध्यें कसा वांटला जावा, छत्तीसगड संस्थानच्या मुलुखाची वांटणी कशी व्हावी आणि मुंबईप्रांतांतील कांहीं संस्थानें गुजराती जिल्ह्यांत सामील केलीं गेलीं तें कसें तर्कदुष्ट आहे, या बाबींचा तर्कशुद्ध निर्णय एकदां स्वतंत्र समितीमार्फत लागणें इष्ट आहे. कसेबसे घेतलेले निर्णय (arbitrary decisions) सोइस्कर वाटले, तरी अंतिम दृष्ट्या अहितकर असून त्यामुळें घटकांत वैमनस्याचें बीजारोपण केलें जाईल. घटनासमितीच्या अध्यक्षानें चार नवे प्रांत निर्माण करण्याच्या प्रश्नाची चौकशी व त्यांच्या निर्मितीमुळें होणाऱ्या संभाव्य आर्थिक परिणामांची छाननी करण्यासाठीं एक समिति नेमली आहे. या समितीवर मुंबई, मद्रास, मध्यप्रांत आणि वऱ्हाड या प्रांतांचे जे प्रतिनिधी घेतले आहेत ते (ceremonial trappings) झालरीसारखे आहेत; त्यांच्या मतांना निर्णायक महत्त्व नाहीं. मुंबईसकट संयुक्त महाराष्ट्र निर्माण केल्यास त्याचे गुजरातवर काय आर्थिक परिणाम होतील याच्या अनुरोधानें ही समिति महाराष्ट्राच्या निर्मितीचा विचार करील; म्हणजे मग महाराष्ट्राच्या निर्मितीची मागणी डावललीहि जाईल अशी साधार भीति अनेकांना वाटते. वस्तुतः विलीनीकरण झाल्यानंतर आजच्या गव्हर्नरांच्या प्रांतांची भाषावार व सांस्कृतिक बैठकीवर पुनर्रचना करणें सुलभ आणि अवश्यहि झालें आहे. आज जी समिति नेमली आहे तशी समिति नेमून तुकड्यां-तुकड्यांनीं (Piecemeal) हें काम करण्यापेक्षां सामग्र्यानेंच हें कार्य करील अशी समिति नेमावी. आजचे गंगाजमनी प्रांत संघराज्याच्या मूलभूत कल्पनेशीं विसंगत आहेत. ते आहेत तसेच ठेवून खरेंखुरें संघराज्य निर्माण होणार नाहीं. सुदैवानें एकभाषी समाज सलग अशा विभागांत केंद्रीभूत झालेले आहेत. प्रादेशिक भाषांना आपल्या विभागांत राजभाषेचें ऐश्वर्य प्राप्त होईल तेव्हांच जनतेच्या सांस्कृतिक अभ्युदयाला सुरवात होईल. आर्थिक परिणामांचा विचार करतां हे चार प्रांत निर्माण केल्याचा एक परिणाम म्हणून जे आणखी कांहीं प्रांत निर्माण होतील तेहि स्वयंपूर्ण होण्याची शक्यता आहे. याच गोष्टीला या समितीनें महत्त्व द्यावें व नफा-नुकसानीच्या इतर बाबींचें स्तोम माजवून हे चार नवे प्रांत सामोपचारानें निर्माण होण्याची शक्यता नाहींशी करूं नये. संस्थानांच्या संघराज्यांना घटकांचा दर्जा दिल्यानें उपसंघराज्यांच्या (म्हणजेच Sub-federations अथवा federations within the federationच्या) कल्पनेस मान्यता दिली गेली आहेच. तेव्हां एकभाषी प्रांतांनाहि जरूरी पडल्यास उपप्रांत निर्माण करतां येतील अशी खास तरतूद घटनेंत करावी. आज तावडतोब नव-घटक-निर्मिति करणें जड वाटल्यास तूर्त 'Weimar' राज्यघटनेच्या अठराव्या कलमासारखी कांहीं तरतूद तरी घटनेंत करावी. नवीन घटक निर्माण करण्याच्या आजच्या योजनेंत दोन दोष आहेतः—(१) तींत नव-घटक-निर्मितीचें मार्गदर्शक तत्त्व (Directive Principle) नमूद केलेलें नाहीं; (२) नवघटकनिर्मिति जनतेच्या प्रत्यक्ष मतावर अवलंबून ठेवलेली नाहीं.

### घटकांना राज्यें (States) ही संज्ञा यथोचित

भारतीय संघराज्याच्या घटकांना, एकसारखेपणा-(Uniformity)साठीं घटक 'राज्यें' (States) असें संबोधिण्यांत येणार असून परिशिष्टांत त्यांचें त्रिसूत्री वर्गीकरण नमूद केलें आहे. 'राज्यें' (States) असें संबोधल्यानें घटकांचें सार्वभौमत्व मान्य केल्यासारखें होईल, त्यामुळें त्यांच्या पृथगात्मकतेला मान्यता दिल्यासारखें होईल व 'राष्ट्रीय संस्कृति समान आहे' या भूमिकेची पायमल्ली केल्यासारखें होऊन फुटीर वृत्ति बळावेल अशी गैरवाजवी टीका कांहीं










लोक करीत असतात. 'घटक–राज्य' (State) ही संज्ञा फाजील गौरवास्पद वाटते ही गोष्ट सत्य आहे; परंतु एकसारखेपणासाठीं ही संज्ञाच यथोचित आहे हें सहज समजण्यासारखें आहे. येथें 'घटक–राज्य' या संज्ञेचा अर्थ 'आंतरराष्ट्रीय व्यक्तिमत्त्वा( International personality)नें विभूषित राज्य' असा नाहीं; आंतरराष्ट्रीय व्यवहार मध्यसत्तेमार्फतच चालणार आहेत व मध्यसत्ता खूपच बलिष्ठ राहणार आहे. घटक कोठेंहि झालें तरी आपापल्या अधिकार–कक्षेपुरते सार्वभौम असतातच; मग राज्य (State) ही जरा अधिक गौरवास्पद संज्ञा त्यांना दिली म्हणून बिघडलें कोठें? संघराज्यांत घटक अनेक असले तरी राज्य (State) एकच असतें. राज्य–शास्त्रांत State या शब्दाला जो विशिष्ट अर्थ आहे तो अर्थ त्याला घटकांच्या संदर्भांत नसतो. अमेरिकेला 'United States of America' म्हणतात ही गोष्ट सर्वांच्याच परिचयाची आहे. या नांवामध्यें अमेरिकेच्या घटनात्मक इतिहासाचा भाग आहे ही गोष्ट मला मान्य आहे. माझा रोख फक्त 'State' ही संज्ञा घटकांना लावणें संघराज्य–कल्पनेशीं विसंगत नाहीं येवढेंच दाखविण्याकडे आहे. घटक अनेक असले तरी राज्य (State) एकच असल्यानें मध्यसत्तेशींच संघराज्यांतील व्यक्तींनीं एकनिष्ठ राहिलें पाहिजे. कांहीं घटनापंडित म्हणतात त्याप्रमाणें, मध्यसत्ता म्हणजे मर्यादित अधिकारांचें एकमुखी सरकारच (Unitary State) होय आणि ही मध्यसत्ता तर आपल्याकडे सामर्थ्यसंपन्न राहणारच आहे; शिवाय संरक्षणासाठीं व आर्थिक उन्नति आणि नियोजन यांसाठीं घटकांना मध्यसत्तेचें साहाय्य सतत घ्यावेंच लागणार असल्यामुळें घटकांना संस्थानें म्हटल्यानें कांहीं नुकसान पोहोंचेल ही भीति अस्थानीं आहे.

## संघराज्यांतील घटकांच्या दर्ज्यात फरक

भारतीय संघराज्याच्या घटकांचा दर्जा असमान आहे. डॉ. अंबेडकरांनीं घटनासमितीच्या अध्यक्षास लिहिलेल्या पत्रांत म्हटल्याप्रमाणें "नव्या राज्यघटनेंत सुद्धां घटकांघटकांत कांहीं फरक हा राहणारच" आणि म्हणूनच तर हा फरक सूचित करण्यासाठीं घटकांना 'राज्यें' संबोधूनहि त्यांचें त्रिसूत्री वर्गीकरण केलें आहे. संस्थानें व संस्थानसंघराज्यें दोहोंहिमध्यें जबाबदार राज्यपद्धति सुरू झाल्यामुळें लोकशाहीचा अंमल सर्वच घटकांतून होणार आहे; परंतु घटकांचा दर्जा मात्र असमानच राहणार आहे. पहिल्या परिशिष्टाच्या तिसऱ्या विभागांतील घटकराज्यांबाबत म्हणजे आजच्या देशी संस्थानांबाबत व संस्थानसंघ–राज्यांबाबत पार्लमेंटचा कायदे करण्याचा अधिकार करारांनीं नियमित व्हावयाचा आहे. मात्र नव्या सामील–नाम्यामुळें गव्हर्नरांचे प्रांत व हीं तिसऱ्या विभागांतील संस्थानें जवळजवळ एका पायरीवर आलीं आहेत. संघराज्यें तडजोडींतून निर्माण होत असल्यामुळें तडजोडीसाठीं कांहीं फरक ठेवणें भाग पडतें. शेषाधिकारांच्या बाबतींत हल्लींचीं देशी संस्थानें व संस्थानसंघराज्यें आणि गव्हर्नरांचे प्रांत यांच्यामध्यें तफावत राहणार आहे. अमेरिका, ऑस्ट्रेलिया व स्वित्झरलंड येथें शेषाधिकार घटकांकडे आहेत, तर कॅनडा व आफ्रिका येथें ते मध्यसरकारकडे आहेत; पण कांहीं घटकांना शेषाधिकार आहेत व कांहींना नाहींत असा प्रकार अन्यत्र कोठेंहि नाहीं. हल्लींच्या गव्हर्नरांच्या प्रांतांना शेषाधिकार नाहींत; परंतु देशी संस्थानांना व संस्थानसंघराज्यांना मात्र ते मिळणार आहेत. शेषाधिकार म्हणजे काय याची तेवढीशी स्पष्ट कल्पना कित्येकांना नसते म्हणून थोड्या स्पष्टीकरणाची आवश्यकता आहे. संघराज्यांत घटक आणि केंद्र यांत सत्तेचें वांटप केलेलें असतें. परंतु सत्तेची कितीहि कांटेकोर वांटणी केली तरी, अधिकारकक्षेंत अंतर्भूत न झालेल्या बाबी भविष्य काळीं निर्माण होणें शक्य असतें व त्या बाबींसंबंधीं कायदे कोणीं करावयाचे हा प्रश्न निर्माण होतो. हे कायदे करण्याचा जो अधिकार त्यास शेषाधिकार असें म्हणतात; वर उल्लेखिलेल्या बाबींत करांच्या बाबी सुद्धां येतात. शेषाधिकाराला 'सार्वभौमत्वाचा अविशिष्ट भाग' (undefined portion of Sovereignty) किंवा 'उर्वरित सार्वभौमत्व' (Residuary Sovereignty) असेंहि म्हणतात. आपल्याकडे कॅनडा प्रमाणेंच चालू एकमुखी सरकार (Unitary State) आपलें रूपांतर संघराज्यांत करून घेत असल्यानें घटकांना सार्वभौमत्वाचा विशिष्ट भाग मिळून केंद्रसरकारला शेषाधिकार राहतील ही गोष्ट क्रम–










प्राप्तच आहे. त्याचप्रमाणें ब्रिटिशांनीं सत्तात्याग केल्यावर देशी संस्थानें स्वतंत्र व सार्वभौम झाल्यामुळें सामीलनाम्यानें दिलेल्या बाबी सोडून इतर सर्व बाबी संस्थानांकडे राहाव्या ही गोष्ट ओघानेंच आली. सत्तात्यागानंतर अधिराज्यसत्ता ( Paramountcy ) केंद्रसरकारला मिळाली असती तर घटकांघटकांतलें अंतर बुजविणें सहज शक्य झालें असतें. पण तसें नसल्यामुळें, प्राप्त परिस्थितींत सरदार वल्लभभाईंच्या संस्थानी खात्यानें केलेलें कार्य गौरवास्पदच म्हटलें पाहिजे. कारण, त्यांनीं देशी संस्थानें व गव्हर्नरांचे प्रांत यांना जवळजवळ एकाच पातळीवर आणण्यांत अल्पकालांतच अनपेक्षित यश संपादन केलें आहे.

सामाजिक व आर्थिक नियोजन समानहितसंबंध-यादी(Concurrent List)मध्यें समाविष्ट केलेलें असून केंद्रसरकारला या अतिमहत्त्वाच्या प्रश्नाबाबत व्यापक अधिकार प्राप्त होतील; पण समानहित-संबंधांच्या बाबींची अंमलबजावणी घटकांनीं करावयाची असल्यानें अंमलबजावणींत परिस्थितिसापेक्ष वैचित्र्य राहून घटकांचा कोंडमारा होणार नाहीं.

## अंतर्भूत अधिकारांचें तत्त्व

अंतर्भूत अधिकारांचें तत्त्व (the doctrine of implied powers) म्हणजे काय याचें स्पष्टीकरण करण्यापूर्वी एक गोष्ट सांगून टाकतों. सर्वश्रेष्ठ न्यायालयाला, आपल्या घटनेंतील तरतुदींच्या अनुरोधानें ओघानेंच येणारी गोष्ट म्हणून, हें तत्त्व वापरतां यावयाचें नाहीं. संघराज्यात्मक राज्यघटनेंत अधिकारक्षेत्रें विभजन केलेलें असतें. म्हणून केंद्रसत्तेनें किंवा घटकांनीं कायदे करतांना 'लक्ष्मणरेषे'च्या बाहेर जाऊन चालणार नाहीं. 'लक्ष्मणरेषे'चें अतिक्रमण झाल्यास न्यायालय ते कायदे अधिकारबाह्य ठरवील. समजा, उद्यां अशी परिस्थिति निर्माण झाली कीं मध्यसत्तेकडे जे अधिकार आहेत त्या अधिकारांच्या अंमलबजावणीसाठीं मध्यसत्तेला कांहीं कायदे करणें जरूर वाटल्यामुळें तिनें कांहीं कायदे केले आणि ते नियमबाह्य ठरले, तर मोठाच अनवस्थाप्रसंग यावयाचा! अशा वेळीं वर उल्लेखिलेलें तत्त्व विचारांत घेतलें जाणें जरूर असतें. प्रख्यात न्यायाधीश मार्शल यानें अमेरिकेंतील राज्यघटनेमधल्या तरतुदींतूनच हें तत्त्व शोधून काढलें. अमेरिकन राज्य-घटनेच्या आठव्या कलमांत केंद्रसत्तेची अधिकार-कक्षा कथन केली आहे. या कलमाचीं अठरा पोट-कलमें आहेत. सतरा पोट-कलमांमध्यें मध्यसरकारचे अधिकार सांगितले आहेत व अठराव्यांत खालील तरतूद केली आहे:—

"The Congress shall have power to make all laws which shall be necessary for carrying into execution the foregoing powers and all other powers vested by this constitution in the government of the United States, or in any department or officer thereof."

मध्य-सरकारकडे संरक्षण हें खातें असलें म्हणजे त्याकरतां अवश्य असलेल्या बाबींसंबंधीं कायदे करण्याचा अधिकार मध्यसरकारला असलाच पाहिजे असें आपण जेव्हां म्हणतों, तेव्हां वर उल्लेखिलेलें तत्त्व आपण नकळत उपयोगांत आणीत असतों; तरी पण घटना म्हणजे मूलभूत कायदा ( Fundamental law ) असल्यामुळें या तत्त्वाचा प्रश्न विवादातीत करून टाकला पाहिजे. अमेरिकन राज्यघटनेंतील वर उद्धृत केलेली तरतूद आपल्या घटनेंत सुद्धां करावयास हवी. ती केली म्हणजे त्या तरतुदीमुळें निर्माण झालेलें तत्त्व घटनेंत अनुस्यूत असलेलें तत्त्व म्हणूनच सर्वश्रेष्ठ न्यायालय उपयोगांत आणील. अर्थात्च अशी तरतूद न केली तर सर्वश्रेष्ठ न्यायालय हें तत्त्व न्यायपरीक्षणांमध्यें (Judicial Reviewत) विचारांत घेणारच नाहीं असें कांहीं म्हणतां येणार नाहीं; पण मग तें बाहेरून आणलेलें उपरें तत्त्व ( externally given principle ) ठरेल, ओघाओघानेंच येणारें तत्त्व असें त्याचें स्वरूप राहणार नाहीं.

## घटना एकमुखी सरकारकडे झुकणारी नाहीं

मध्यसत्ता आजच्या देशी संस्थानांतील किंवा संस्थानसंघराज्यांतील विधिनिर्मिति, अंमलबजावणी व न्यायदान यांबाबतची सत्ता कराराअन्वयें आपल्या हातांत घेऊं शकेल अशी तरतूद घटनेच्या २३६व्या परिच्छेदांत केली आहे व २३७व्या परिच्छेदांत सध्यांच्या प्रांतांनाहि तसें करतां येईल अशी तरतूद आहे.








'घटक–राज्य'–यादींत(State—Listमध्यें)नमूद केलेल्या बाबी मध्यसत्ता फेंटाळून लावूं शकणार नसल्यानें प्रांतिक स्वायत्तता अबाधित राहील असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. घटक–राज्य–यादीमध्यें (State—Listमध्यें ) संघराज्यांत सत्तेचें वांटप करून विधिनिर्मितीचे अधिकार याद्यांत नमूद करतात. ( यादी हवीच असें मात्र नाहीं. उदाहरणार्थ, अमेरिका, स्वित्झरलंड ) ते अधिकार कलमांत देण्यापेक्षां स्वतंत्र परिशिष्टांत देणें संदर्भाच्या दृष्टीनें चांगलें. घटकांचे विधिनिर्मितीचे अधिकार (अंमलबजावणीचे अधिकार धरून) राज्य–यादींत दिलेले आहेत. या यादींत ज्या बाबी नमूद केल्या आहेत त्या बाबींसंबंधीं कायदे करण्याचा पूर्ण अधिकार घटकांना आहे. त्या बाबींसंबंधीं कायदे करून त्यांनीं त्यांची अंमलबजावणी करावी. हे कायदे मध्य–सरकारच्या मान्यतेसाठीं पाठविण्याचीहि जरूरी नाहीं. कॅनडामध्यें मध्यसरकार घटकांचे कायदे फेंटाळतें (vetoes), तसें आपल्याकडे होणार नाहीं. म्हणून घटकांची या बाबींपुरती तरी स्वायत्तता अबाधित राहणार आहे. घटना बदलण्याचे अधिकार(Constituent Powers) घटक–राज्य–यादींत समाविष्ट नाहींत. अर्थातच या अधिकारांवर मध्यसत्तेचें दडपण पडेल व ते अधिकार वापरून घटकांनीं हवा असलेला कायदा केला तर मध्यसत्ता तो फेंटाळील; तथापि उपरि–निर्दिष्ट योजनेंत स्वायत्ततेवर अतिक्रमण नाहीं.शुद्ध अशा शासनशास्त्र दृष्टीनें (purely juristic point of viewनें), घटना बदलावयाचे अधिकार वापरून घटकांनीं केलेला कायदा त्याला संघराज्याच्या अध्यक्षाची अनुमति मिळाल्याखेरीज कायदाच (Law) होत नसल्यानें विधि–निर्मितीच्या सत्तेवरील अतिक्रमणाचें ( encroachment on legislative powersचें ) स्वरूप त्याला मुळींच नाहीं. अर्थात् घटकांना स्थानिक प्रश्नांसंबंधीं घटना बदलण्याचे व्यापक अधिकार हवे, ह्या विचाराशीं मी सहमत आहें हें सांगावयास नकोच. अमेरिकेंत राज्यघटनेच्या मूलभूत तत्त्वाशीं घटना सुसंवादी असावी व घटकांवर 'तिचें लोकसत्ताकस्वरूप ( Republican nature ) संभाळलें जावें' असें जें बंधन आहे तेवढें पाळलें तर घटकांना आपली घटना आपल्याला हवी तशी बनवितां येते.

भारतीय संघराज्याच्या रचनेचें सामग्र्यानें निरीक्षण केलें कीं भारताची राज्यघटना तात्त्विक दृष्ट्या व व्यावहारिक दृष्ट्या संघराज्यात्मक स्वरूपाची राहील असें म्हणतां येईल. संघराज्याचे सर्व उल्लेखनीय विशेष या घटनेंत आहेतच व केंद्रसत्ता फार सामर्थ्यवान् असल्यामुळें घटना 'एकमुखी सरकार'कडे (Uuitary Stateकडे) झुकते आहे असें सकृद्दर्शनीं वाटलें तरी तें खरें नाहीं. कारण, स्थानिक प्रश्नांत घटकांना भरपूर व्यापक अधिकार आहेत.

---

हिंदी संस्कृति ही केवळ हिंदु, केवळ इस्लामी किंवा केवळ एक अमकी अशी नाहीं. ती सर्वांचेंच मिश्रण असून तिचा आत्मा मात्र पौर्वात्य आहे...... जो कोणी स्वतःला हिंदी म्हणवीत असेल, त्या प्रत्येकानें हिंदी संस्कृतीचे विश्वस्त बनून तिचें जतन केलें पाहिजे, तिच्यावर होणारे हल्ले परतवून लाविले पाहिजेत....... माझी तर अशी इच्छा आहे कीं मी जेथें राहत असेन त्या ठिकाणचें वातावरण देशोदेशींहून वाहत आलेल्या संस्कृतींच्या वाऱ्यांनीं भरून जावें. पण त्याबरोबरच मला अशी काळजी घेतली पाहिजे कीं त्यापैकीं एखाद्या वाऱ्याबरोबर मीहि वाहवला जाऊं नये. एखादा उपटसुंभ, भिकारी किंवा गुलाम यांच्याप्रमाणें दुसऱ्यांच्या घरांत घुसायची माझी इच्छा नाहीं.

—महात्मा गांधी



अनुक्रमणिका






श्री. ह. कृ. मो ह नी

# अध्यात्म व नीति यांच्या सीमेवर

सुमारें सहा महिन्यांपूर्वी महात्मा गांधीजींचें भौतिक जीवन समाप्त झालें. हा जगद्वंद्य थोर पुरुष हिंदुस्थानांत—आपल्या देशांत—जन्मला ह्याबद्दल हिंदुस्थानांतील पुढील पिढ्या आजच्या पिढीपेक्षांहि ईश्वराच्या अधिक ऋणी राहतील व ही हिंदुस्थानवर विश्वशक्तीची दैवी कृपा आहे असें समजतील, अशी अपेक्षा करतां येते. महात्मा गांधीजींचें आयुष्य महानदीप्रमाणें अथांग पाण्यानें भरलेलें होतें. महानदी समुद्रास जाऊन मिळेपर्यंत किती वळणें घेईल, किती नद्या तिला येऊन मिळतील, तिच्या जीवनानें किती जीव तरतील, किती प्राण्यांचें आयुष्य त्या पवित्र प्रवाहानें समृद्ध होईल, ह्याचा अंदाज करणें फार कठिण असतें. गांधीजींच्या आयुष्याची महानदी आतां तीर्थराज सागरास जाऊन मिळाली आहे आणि म्हणून महात्मा गांधींच्या अद्वितीय जीवनाचा आरंभ व त्याचा शेवट यांकडे आतां साकल्यानें पाहणें शक्य झालें आहे.

## मानवी प्रयत्नांच्या परिसीमेचें प्रतीक

धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे भारतीय संस्कृतींत चतुर्विध पुरुषार्थ समजले जातात. ह्या चतुर्विध पुरुषार्थांचें सम्यक् मीलन महात्मा गांधीजींच्या जीवनांत झालेलें होतें. महात्माजींच्या राजकीय क्षेत्रांतील अलौकिक कामगिरीनें जागतिक राजकीय इतिहासांत नवीन भर घातलेली आहे. महात्मा गांधींचा यशोदुंदुभि त्यांच्या नीतिमय किंवा धर्ममय राजकारणामुळें अखिल जगतीतलावर गाजत आहे! ही एक जगद्वंद्य विभूति होऊन गेली हें मित्र व उदासीन अशा सर्वांसच मान्य आहे. अखिल जगतास त्यांच्याबद्दल कुतूहल, आश्चर्य, आदर व प्रेम ह्यांपैकीं कोणती तरी एक भावना आज वाटत आहे ह्यांत शंका नाहीं.

हिंदुस्थानांतील केवळ लोकविलक्षण राजकारणामुळेंच ते येवढ्या लोकादरास पात्र झाले असें नाहीं. अनेक गुणांचें संमिश्रण त्यांच्या स्वभावांत उत्कटत्वानें दृग्गोचर होत असे. त्यांपैकीं एकेक गुणहि अनन्यसाधारण आहे; मग असे अनेक अनन्यसाधारण गुण एकत्रित झाले असल्यावर त्यांच्या व्यक्तित्वांत अलौकिकत्वाची मानवी परिसीमा दिसून येईल ह्यांत नवल काय?

ह्या अलौकिक विभूतीमधील गुणसमुच्चयाचें विहंगमावलोकन केल्यास त्यांत अत्यंत उच्च प्रतीचें राजकारण किंवा मुत्सद्देगिरी, धर्म अथवा नीति आणि आध्यात्मिक किंवा पारलौकिक धारणा ह्यांचा मनोहर मिलाफ झालेला होता असें दिसून येतें. जगामध्यें वीरता आणि मुत्सद्देगिरी या गुणांमुळें दिग्विजय केलेले अनेक रणधुरंधर किंवा राजकारणी थोर पुरुष मशहूर आहेत. ते दिवंगत असोत किंवा विद्यमान असोत, आकाशांतील तेजस्वी तारकांप्रमाणें ते आपलें सर्वांचें चित्त आकर्षण करून घेतात. हरिश्चंद्र, शिबि, कर्ण, दधीचि, भीष्म इत्यादि महाभागांच्या दिव्य व्रतधारित्वामुळें त्यांचें यशोगान आपण नेहमीं करीत आहों. बुद्ध, खिस्त, पैगंबर, नानक, चैतन्य, तुकाराम इत्यादि अध्यात्मवादी आम्हांस शिरोधार्य आहेत. केवळ अध्यात्मवादी वा धर्मशील अगर केवळ राजकारणपटु असे अनेक महात्मे जगतीतलावर देदीप्यमान तेजोगोलांप्रमाणें चमकून गेले आहेत व सध्यांहि चमकत आहेत; परंतु महात्मा गांधींनीं राजकारणी, धर्मशील व अध्यात्मपर अशा तिन्ही प्रकारच्या विभूतींच्या श्रेष्ठतेचा समावेश शिकस्तीच्या मानवी प्रयत्नानें स्वतःच्या आयुष्यांत करून घेतला होता. मुंग्यांच्या निरलसतेनें व मधुकरांच्या काव्यमय वृत्तीनें ह्या








तिन्ही कोटींतील अलौकिक गुण एकत्रित करून त्यांनीं आपल्या हृदयांत सांठविले होते. असा हा महापुरुष होता. महात्मा गांधींचें अलौकिकत्व प्रतिभासंपन्न श्रेष्ठ कवींच्या दिव्य गायनासारखें बहुतांशीं ईश्वरी देणगीमुळें उत्पन्न झालेलें नव्हतें. त्यांच्या गुणांची भव्यता वा दिव्यता आकस्मिक ईश्वरी प्रसादाची द्योतक नाहीं. त्यांचें मोठेपण विद्युल्लतेप्रमाणें डोळे दिपवून टाकणारें नाहीं, तें शांतपणानें, चौकसबुद्धीनें व असीम निष्ठेनें केलेल्या दीर्घकालीन घोर कष्टांचा परिपाक आहे. ही तपश्चर्या इतकी कडक होती कीं केवळ तीच विचारांत घेतली तरी महात्मा गांधींचा अलौकिकपणा प्रत्येकास कबूल करावा लागेल. कष्ट करण्याच्या अलौकिक आवडीमुळें किंवा खडतर तपश्चर्या–प्रवृत्तीमुळें महात्मा गांधींना आपल्या स्वभावांत अनेक असाधारण गुणांचा सांठा करतां आला. मानवी प्रयत्नांस काय साध्य होऊं शकेल ह्याचे महात्मा गांधी हे चालतेबोलते आदर्श होते.

त्यांच्या चरित्राचें साकल्यानें निरीक्षण केल्यास त्यांच्या विभूतिमत्त्वाचें एक अद्भुतरम्य चित्र आपल्या मनश्चक्षूंसमोर उभें राहतें. नैतिक उन्नतीच्या दुर्गम पर्वताची चढण हळूहळू चढून मानवी विचारांस गोचर व अत्यंत उत्तुंग अशा अंतिम शिखरावर ते जाऊन पोहोंचलेले दिसतात. पारलौकिक विचाराचा किंवा आध्यात्मिकतेचा अथांग सागर या दुर्गम नैतिक गिरीच्या आसपास खेळत आहे. महात्मा गांधींचा एक नेत्र नेहमीं या सागराची शोभा पाहण्यांत गुंतलेला आहे तर दुसऱ्या नेत्राचें लक्ष ध्येयपरतेनें धर्मसाधनेच्या जागतिक व्यापाराकडे सारखें लागलेलें आहे. अध्यात्म आणि नीति ( Metaphysics and Morality ) ह्यांच्या मानवी प्रकर्षाच्या सीमाप्रांतावर त्यांचें जीवन नित्य विलसत होतें.

## गांधीजींच्या अहिंसेच्या मर्यादा

महात्मा गांधींच्या हृदयांत अध्यात्माचें ( Metaphysicsचें ) चिंतन सदैव सुरू असे. सत्य आणि अहिंसा हे गांधीजींच्या अध्यात्मपर आयुष्याचे दोन ध्रुव तारे होते. त्यांची अहिंसा अध्यात्मविचारपरतेमुळें उत्पन्न झालेली होती. अहिंसा किंवा प्रेम ही मानवी उन्नतीची शेवटची परिसीमा आहे. तथापि महात्मा गांधींच्या अहिंसेचें स्वरूप अभावात्मक ( negative ) होतें असें म्हणावें लागतें. अहिंसेचें भावात्मक स्वरूप प्रेम हें आहे. गांधीजींची अहिंसा ही अध्यात्मपर प्रेमाची पूर्वसाधना होती. अध्यात्म–विचारसागरांत किंवा आत्मानुचिंतनांत डुंबल्याशिवाय विश्वावरील गाढ, अथांग, खोल प्रेम प्रतीत होत नाहीं. महात्मा गांधी हे नैतिक उन्नतीच्या दुर्गम खडकावर बसून या अध्यात्मप्रेम–सागराच्या सीमेवरील वीचींशीं खेळत असत. सागराच्या शोभेनें व वीचींच्या विहारानें त्यांचें हृदय आनंदित होत असे. परंतु तो महात्मा या अथांग सागरांत पोहत राहणारा नव्हता; म्हणूनच त्याच्या अहिंसेंत अगाधतेची किंवा गूढतेची ( Mystic ) संवेदना प्राप्त झाली आहे असें म्हणवत नाहीं. चैतन्य, मीरा, तुकाराम इत्यादि अध्यात्मपर व्यक्तींचा पृथ्वीचा तोल सपशेल नाहींसा झाला होता असा आपला समज आहे. त्यांचें विश्वप्रेम ते अध्यात्मसागरांत पोहत असल्याचें निदर्शक आहे अशी आपली श्रद्धा आहे. त्यांचें तें प्रेम अतिभौतिक ( Transcendental ) आहे, आधिभौतिक ( Mundane ) नाहीं. गांधींची अहिंसा ही स्वर्गीय, अलौकिक किंवा दिव्य वस्तु नाहीं; ती पृथ्वीवरील अमूल्य रत्न आहे. अहिंसेवर आपला असा कांहीं अढळ विश्वास आहे कीं, त्याची फोड शब्दांनीं करतां येत नाहीं, असें महात्मा गांधी निष्ठापूर्वक म्हणत हें खरें व महात्माजींच्या अहिंसेच्या दिव्य धारणेमुळें हिंदुस्थानचें स्वातंत्र्य त्यांना कितीहि प्रिय व पवित्र असलें तरी, ''हिंसेनें हिंदुस्थानास स्वातंत्र्य मिळेल असें जरी मान्य केलें तरी तें स्वातंत्र्य मला आल्हाददायक वाटत नाहीं '' अशीहि कबुली त्यांनीं दिलेली होती. पण हीं विधानें त्यांची प्रवृत्ति अध्यात्मरत आहे येवढेंच सिद्ध करतात, त्यांच्या अहिंसेची अथांग खोली दाखवूं शकत नाहींत.

महात्मा गांधींच्या अहिंसेस मानवी विचारांची किंवा भौतिकतेची मर्यादा होती. महात्मा गांधी तारतम्याच्या विचारानें अहिंसाव्रत पाळीत आणि म्हणूनच जैन किंवा अहिंसाव्रताची पारलौकिक परंपरा चालविणारे इतर त्यांच्या अहिंसाविचारांतील








# अध्यात्म व नीति यांच्या सीमेवर

तारतम्यामुळें त्यांच्यावर प्रसंगविशेषीं तुटून पडत! महात्माजींची अहिंसा वेडी नाहीं; ती दिव्य नसली तरी जगाच्या दृष्टीनें शहाणी व डोळस आहे. त्यांचा बकरीचें दूध पिण्याबद्दलचा कटाक्ष, वांसरूं मारण्याबद्दल त्यांनीं दाखविलेला निश्चय, त्यांचें देवी टोंचण्याविरुद्ध असलेलें धोरण, वानरांनीं उपद्रव दिल्या वेळीं त्यांनीं प्रदर्शित केलेले विचार किंवा नुकत्याच झालेल्या महायुद्धाच्या प्रसंगीं युद्धाविरुद्ध त्यांनीं केलेला अहिंसातत्त्वमूलक प्रचार, हे सर्व प्रसंग त्यांच्या अहिंसाव्रताच्या निरनिराळ्या मर्यादा दाखवितात. विशेषतः राजकीय क्षेत्रांत जेव्हां धोरण (Policy) म्हणूनच अहिंसा मान्य करणाऱ्या क्षत्रिय वृत्तीच्या तीव्र व तल्लख स्वभावाच्या लोकांस ते आपल्या कार्यांत सामील करून घेतात, त्या वेळीं त्यांची अहिंसा एकांगी, जगाचा तोल सुटलेली वा मोक्षाचें वेड लागलेली अशी भासत नाहीं; उलट पक्षीं ती व्यवहारचतुर, कार्यकुशल व जगाचें तारतम्य पूर्णपणानें ओळखणारीच दिसते. दंगेधोपे, हिंदुमुसलमानांच्या मारामाऱ्या, क्रांतिकारकांचे शस्त्राचारी प्रयत्न व चौरीचौरा–नौखाली–बिहार येथल्यांसारखे अत्याचार पाहून त्यांचें अंतःकरण प्रक्षुब्ध होई. 'हिंदुस्थानांत जर शस्त्रक्रांति झाली तर मी हिमालयांत जाईन, किंवा निराशेनें प्रायोपवेशन करीन' असेहि उद्गार कधींकधीं त्यांच्या तोंडून निघत. त्यांना अशा प्रसंगीं दुःखाचे आवेग येत व ह्या वेळीं क्वचित् त्यांचें अहिंसापर मन अध्यात्म–विवश होई व अध्यात्माच्या अथांग सागरांत ते आतां बुडी मारणार कीं काय अशी शंकाहि वाटूं लागे. तथापि गोपीनाथ–भगतसिंगादि वीरांच्या अंतःकरणांतील नीतिप्रकर्ष पाहून ते वीर गांधींच्या अहिंसाव्रताच्या दृष्टीनें अत्याचारी ठरले असले तरी महात्माजींच्या मनांतील त्यांच्याविषयींचा आदर किंचित्हि कमी होत नसे. प्रतापसिंह, शिवाजी, ह्यांसारख्या थोर विभूतींच्या देशोद्धाराच्या प्रचंड व निःस्वार्थी प्रयत्नानें त्यांचें अंतःकरण विनम्र होई. ह्या विनम्रतेवरून अहिंसाव्रताच्या भावनेमुळें गांधीजींनीं जगाचा विचार सोडला नाहीं हेंच दिग्दर्शित होत नाहीं काय? अहिंसाव्रत हा त्यांनीं आपला धर्म बनविल्यामुळें अहिंसाव्रताच्या दृष्टीनें यापेक्षांहि अधिक प्रेममय शौर्याची अपेक्षा त्यांच्या हृदयांत जागृत होत नव्हती असें नाहीं; पण या थोर विभूतींच्या बद्दल आदर दाखवून मुक्त कंठानें ते त्यांच्या माहात्म्याची प्रशंसाहि करीत. त्यांची ही स्तुति अहिंसाव्रताबद्दलचा त्यांचा तरतमभाव दिग्दर्शित करते. 'अहिंसाव्रत भीरु व कातर लोकांकरतां नाहीं, तें शूरांचें शस्त्र आहे, वीरांचें ब्रीद आहे,' हीं वाक्यें त्यांच्या उपदेशांत नेहमीं येणारीं असलीं तरी, गांधीजींची अहिंसा मानवी मोजमापापलीकडे, पार्थिवतेपलीकडे गेलेली नव्हती. 'आपण अव्यवहारी ध्येयवादी नाहीं, तर Practical Idealist आहों' असें महात्मा गांधी नेहमीं म्हणत. गांधींनीं योजिलेल्या '(Practical) व्यवहारी' ह्या विशेषणावरून गांधीजींचे पाय पृथ्वीवरच रोंवलेले होते, त्यांचें उड्डाण आकाशांत नव्हतें हेंच दिसतें.

महात्मा गांधींचा स्वभाव अधिक भावनामय असता तर त्यांचा पृथ्वीचा तोल कदाचित् सुटला असता व मग मीराबाई, तुकाराम, चैतन्य इत्यादि साधू ज्या अध्यात्मपर वर्गांत मोडतात त्याच वर्गांत त्यांचीहि गणना झाली असती व त्यांचा सत्याग्रहाश्रम कदाचित् बाणभट्टाच्या कादंबरींतील जाबालीच्या आश्रमासारखा वर्णिला गेला असता. गांधीजींचा स्वभाव बुद्धिप्रधान आणि नीतिप्रधान होता म्हणूनच उच्च प्रकारची मुत्सद्देगिरी किंवा नीतिकुशलता त्यांच्या ठायीं दिसून येते. 'आपण बनिये आहों' असें ते नेहमीं सांगत असत. बनियावृत्तिमध्यें तारतम्यभाव, विचारप्रधानता व मोजकेपणा यांचाच प्राधान्येंकरून समावेश होतो. त्यांची बनियेगिरी हा उदात्त गुण आहे. पृथ्वी आणि स्वर्ग यांचें मनोहर मिश्रण त्या 'बनियेगिरीं'त झालें होतें.

### अहिंसाव्रत आणि हिंदुस्थानचें राजकारण

अहिंसाव्रताच्या पवित्र व धवल प्रकाशांत निश्चेष्ट व परतंत्र हिंदुस्थानकडे जेव्हां ते पाहत, त्या वेळीं त्यांच्या अपूर्व राजकारणाचा उद्गम होई आणि त्यांची राजकारणाची दिशा ठरे. हिंदुस्थान ही त्यांची जन्मभूमि होती व अहिंसा हें त्यांचें व्रत होतें. हिंदुस्थान परतंत्र असल्यामुळें हिंदुस्थानच्या दुर्गतीस तर पारावार नव्हता! त्यांच्या देशाभिमानाचा उद्गम अहिंसाव्रतांत होता किंवा त्यांची








देशभक्ति अहिंसाव्रतानें प्रेरित होती. अहिंसाव्रत व दरिद्री हिंदुस्थानचा उद्धार ह्या दोन घटनांच्या सन्निकर्षापासून निःशस्त्र प्रतिकार, असहयोग व सविनय कायदेभंग ह्या प्रचंड चळवळी उत्पन्न झाल्या. आपलें भांडण केवळ इंग्रज व्यक्तींशीं नसून त्यांच्या राज्यपद्धतीशीं आहे अशी भाषा ह्या सन्निकर्षामुळें निर्माण होत असे. अहिंसेच्या शीतल प्रकाशांत इंग्रज, मुसलमान, खिश्चन, हिंदू, किंवा श्वेत, पीत, काळे असे जातिगत, धर्मगत किंवा वंशगत भेद राहूं शकत नाहींत. फक्त गुलामी व सैतानी हाच भेद राहूं शकतो. गुलामांचा उद्धार व सैतानांचा पाडाव या प्रत्येक अहिंसाव्रतधारी मनुष्याच्या उन्नतीच्या अत्यावश्यक पायऱ्या आहेत.

सविनय कायदेभंग किंवा निःशस्त्र प्रतिकार हें अहिंसामय देशभक्तीचें आक्रमणशील (Offensive) स्वरूप आहे. खादीची चळवळ किंवा स्वदेशी हें अहिंसाव्रताचें आत्मरक्षणात्मक (Defensive) किंवा विधायक स्वरूप आहे. अहिंसामय देशभक्ति व परतंत्र भारत ह्या दोन घटनांमुळेंच निशस्त्र प्रतिकार व स्वदेशी व्रत ह्यांची निर्मिति झालेली आहे. गांधीजींचें हिंदुस्थानांतील जनतेवरील प्रेम खादीच्या रूपानें अवतीर्ण झालें होतें आणि इंग्रजांवरील प्रेम कायदेभंगाच्या रूपानें प्रकट झालें होतें. दारूनें तर्र झालेल्या मनुष्याला जेव्हां डॉक्टर उलटीचें औषध देतो व त्या औषधानें जेव्हां त्याची कालवाकालव होते असें दिसतें, त्या वेळीं डॉक्टर त्या रोग्याचें कल्याणच करतो असें म्हणावयास नको काय? तसाच गांधींचा असहकार वा कायदेभंग हा देखील इंग्रजांवरील प्रेमाचाच परिणाम होता.

गरीब हिंदुस्थानशीं समरस होण्यासाठीं गांधीजींचा प्रयत्न उत्कटत्वानें चालू होता. विणकरी व शेतकरी म्हणवून घेण्यांतच त्यांना सार्थकता वाटे; येवढेंच नव्हे, तर ते आपण भंग्यांचे राजे आहों अशीहि ग्वाही देत असत. वस्त्रप्रावरणाबद्दलची त्यांची बेपर्वाई, भंग्यांचें काम स्वतः करण्याबद्दलचा त्यांचा आग्रह, खाण्यापिण्याच्या बाबतींतील त्यांचे नाना प्रयोग, त्यांचें मन सौंदर्यलोलुप असतांहि बाह्य सौंदर्याबद्दलची त्यांची पराकाष्ठेची बेपर्वाई, इतर लहानसहान गोष्टींतहि त्यांची अत्यंत बारकाईची काटकसर, हे सर्व वागणुकीचे प्रकार अहिंसाव्रताच्या प्रामाणिक परिपालनामुळें व हिंदुस्थान त्यांची जन्मभूमि असल्यामुळें हळूहळू परिवर्तन पावून बनले होते. एकंदरींत अहिंसा हें मानवी उन्नतीचें प्रधान तत्त्व समजून मानवी मनास जें कांहीं कष्टसाध्य आहे, तें साध्य करून घेणारा जगाच्या इतिहासांत हा पहिलाच महापुरुष असून अध्यात्म व नीति यांच्या सीमाप्रांतावर जगाचें लक्ष सहज वेधून टाकील अशा मूर्तिमती महत्तमतेनें तो उभा ठाकला आहे, असें म्हणण्यांत मुळींच अतिशयोक्ति नाहीं.

## संयमी व अहिंसामय सत्योपासना

सत्य हें महात्मा गांधींचें दुसरें ब्रीदवाक्य आहे. सत्याच्या या व्रतास निरंतर साक्षी ठेवून गांधीजींचें जीवन व्यतीत झालें होतें. गांधीजींची सत्याबद्दलची धारणा देखील अपार्थिव, दिव्य किंवा आध्यात्मिक आहे. 'पूर्णपणें सत्य बोलणाऱ्या मनुष्यास जगांत अशक्य कांहींच नाहीं; तो प्रति–ईश्वरस्वरूपच बनून जाईल' अशीं त्यांचीं विधानें आहेत. 'अपूर्णता म्हणजे असत्य व पूर्णता म्हणजे सत्य! व (Truth is God) सत्य म्हणजेच ईश्वर!' अशी त्यांची सत्याबद्दलची धारणा होती. अशा सत्याकडे दृष्टि रोखून ते जगाचे व्यापार करीत असत. परंतु या ध्येयाच्या तराजूवर आपलें वर्तन कसोशीनें जोखून घेत असतांना देखील त्यांच्या व्यवहारकौशल्याची पदोपदीं जाणीव झाल्याशिवाय राहत नाहीं. सामान्य लोक ज्याला गुप्त समजतात, असे व्यवहार त्यांनीं उघडकीस आणले आहेत. आपल्याजवळ लपवाछपवी कांहीं नाहीं, असें ते नेहमीं सांगत. आपलीं व्यंगें बाहेर काढतांना लोकलज्जेची भीति त्यांनीं दूर झुगारून दिल्यासारखें दिसतें. परंतु याहि बाबतींत त्यांनीं तारतम्य पाळलें नाहीं, असें मात्र कोणासहि म्हणतां यावयाचें नाहीं. आणि म्हणून त्यांचें स्वतःच्या दोषांचें दिग्दर्शन देखील कलाविहीन नसे. तो भाबडेपणानें, बावळटपणानें किंवा मूर्खपणानें केलेला आविष्कार नसे! देशकालपरिस्थिति संभाळून सत्याची जोपासना करणाऱ्या या महात्म्यानें अप्रिय अशा सत्याची आपल्या आयुष्यांत अनेक वेळां निर्भीडपणें कांस धरलेली आहे. अशा वेळीं "गांधी हे मूर्ख आहेत, ते








बालक आहेत, त्यांना काळवेळ समजत नाहीं, '' अशी टीका त्यांच्यावर अनेकदां झालेली आहे. परंतु ती दुष्टाचार्यांची टीका आहे व ती त्यांच्याच प्रतिनिविष्टतेची साक्ष देत आहे. प्रसंगीं सार्वजनिक कल्याण साधण्यास अप्रिय बोलण्यावांचून गत्यंतर नाहीं, अशी त्यांची खात्री असल्याखेरीज सत्याचा आविष्कार त्यांनीं केलेला नाहीं, हें शुद्धान्तःकरणानें विचार केल्यास कबूल करावें लागतें.

काशीचें विश्वविद्यालय उघडतांना त्यांनीं केलेलें भाषण सर्वांच्या परिचयाचें आहे. स्वतंत्र हिंदुस्थानांतील क्रांतिकारकांच्या धैर्याची मनमोकळेपणानें स्तुति करणारा हाच पहिला थोर पुरुष ! संस्थानिकांच्या तोंडासमोर त्यांच्या दागिन्यांवर खरमरीत कठोर टीका करणारा हाच पहिला महात्मा ! अशी टीका भरसभेंत करण्यास दुसरा एखादा क्वचित्च धजला असता. 'राजद्रोह हा माझा धर्म आहे,' असें छातीठोकपणानें सरसहा सांगणारा दुसरा नेता हिंदुस्थानांत निपजला नाहीं. इंग्रजांच्या देशांत जाऊन सौम्यपणानें का होईना, पण त्यांच्या तोंडासमोर त्यांचे वाभाडे काढण्याची छाती गांधीजींशिवाय दुसऱ्यास होणें कठिण होतें.

पुण्याचें अहर्निश चिंतन चालवून आपल्या पापांचा डांगोरा पिटणारा हा एकमेवाद्वितीय महात्मा होता ! स्वतःची, स्वकीयांची तशीच अंतेवासियांची उन्नति व्हावी म्हणून त्यांची गय न करणारा, त्यांचे दोष न कचरतां चव्हाट्यावर आणणारा हा कठोर न्यायाधीश होता. आपलीं मतें निर्भीडपणें शत्रुमित्रांच्या द्वेषलोभांची पर्वा न करतां जाहीर करणारा हा अद्वितीय राजकारणी पुरुष होऊन गेला ! तथापि सत्य सांगणें इष्ट कीं अनिष्ट हें न अजमावतां सत्याच्याच मोहानें गांधी विवश झाले आहेत असें बहुधा कधींहि दिसून यावयाचें नाहीं. सत्य हें आपलें कर्तव्य आहे आणि म्हणूनच तें अहिंसामय असावें अशी त्यांची कसोशीची जपणूक असे.

गांधींजवळ अनेकांनीं आपलीं रहस्यें सांगितलीं होतीं; तीं रहस्यें बाहेर पडतील अशी भीति त्या लोकांना कधीं तरी वाटली असेल काय ? ह्याचें कारण गांधींचें हृदय अथांग सागरासारखें होतें. दीर्घकालीन वाक्–संयम आणि अहिंसामय स्वभाव ह्या दोन्ही प्रकारच्या कोंदणांत महात्मा गांधींचें सत्य विराजमान झालें होतें. तें 'अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत्' असें होतें. कित्येक प्रसंग असे घडले आहेत कीं त्या वेळीं गांधी सत्य सांगत नाहींत म्हणून टीकाकार त्यांच्यावर रागावले ! उलट, कित्येक प्रसंगीं ते सत्य सांगतात म्हणून टीकाकार त्यांच्यावर चरफडत असत ! याचें खरें कारण असें आहे कीं टीकाकार स्वतःचा रंगीबेरंगी चष्मा लावून ह्या कोंदणाकडे पाहत. त्यामुळें कोंदणाचें मूळचें स्वरूप त्यांच्या लक्षांत येत नसे. पूर्व–ग्रहदूषित दृष्टीनें गांधीजींच्या सत्यप्रियतेकडे पाहिल्यानें गांधींचें संयमी, अहिंसामय सत्य टीकाकारांस विकृत स्वरूपांत दिसत असे, ह्यांत नवल नाहीं.

### अभ्युदय–निःश्रेयसांचा संगम

एकंदरींत महात्मा गांधी यांच्या सत्यनिष्ठतेच्या गुणप्रकर्षाची आणि त्यांच्या अहिंसाव्रताच्या दिव्यतेची शोभा पाहिल्यास अभ्युदय आणि निःश्रेयस यांच्या संगमावर त्यांची प्रतिष्ठापना झाली आहे असें दिसून येण्यासारखें आहे. गांधीजींच्या ठिकाणीं पार्थिव व अपार्थिव अशा गुणसंपत्तींचा संगम दिसत असतांना महाकवि गटे याच्या

"Wouldst thou......
...all by which the soul is charmed,
enraptured, feasted, fed ?
Wouldst thou the earth and heaven itself
in one sole name combine ?
I name thee...... and all at once is said."

ह्या निराळ्या संदर्भातील सुप्रसिद्ध अवतरणाची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं.

खुद्द महात्मा गांधीजींचेच असे शब्द आहेतः—

"जो बात मैं कहना चाहता हूँ और जो करके मरना चाहता हूँ वह यह है कि सत्य और अहिंसाको संगठित करूँ। अगर वह सब क्षेत्रों के लिये उपयुक्त नहीं है, तो वह झूठ है। याद रहे कि सत्य और अहिंसामठवासी संन्यासियों के लिये ही नहीं हैं। अदालतों, धारासभाओं और इतर व्यवहारों में भी ये सनातन सिद्धांत लागू होते हैं।"

# 'झेलम्'चे अश्रू

सुन्दर किति गिरिकन्दर हिमराजाचे
सृष्टिसतीच्या घरचे कलश रुप्याचे
भरलें त्यांतुन निर्मळ शीतळ पाणी
दंवबिन्दू हे संचित नन्दनवनिंचे १
माया रविची येतां कधिं सौवर्ण
हिमालयाचा होई दिव्य सुपर्ण
विशाल अपुल्या पंखांच्या छायेंत
रक्षित जणुं तो अमृतघटां परिपूर्ण ! २
उदार झाले परी एकदां देव
कृपणाऐशी नको म्हणाले ठेव
सुधा मिळूं दे अपुल्या सत्पुत्रांना
हृदयामध्यें उदया ये हा भाव ३
आणि म्हणाले पाहुनि अंवतींभंवतीं,
"तिलोत्तमे ! ये; येइं मेनके ! पुढतीं
चला उर्वशी, अलंबुषे ! चल रम्भे !
अमृतकुंभ हे घ्या कटिखांद्यांवरतीं... ४
"फुलवाया नवजीवन धरणीवरती
उभवाया नववैभवशाली धरती
जगवायाला जगांत मानवजाती
जा उधळा ही दौलत तुमच्या हातीं.... ५
"रूपें नामें दुसरीं आतां घ्यावीं
सिंधू–सतलज–चिनाब–झेलम्–रावी !
देवांना प्रिय भारतभूचे पुत्र
संजीवनि ही सदा तयांना द्यावी !" ६
देवेन्द्राची आज्ञा वन्द्य तयांना
लगबग उठुनी झाल्या सज्ज प्रयाणा
'मानस–सर'हा विशाल दर्पण त्यांचा
त्यांत पाहती त्या वेळावुनि माना ! ७
अहा ! निघाल्या ठुमकत मुरकत नारी
हिमाचलाची कायम थिजली स्वारी !
अवघ्या अवखळ खळखळ खेळत जातां
हंसती कंदर, खुदखुदतात कपारी. ८
मार्गामध्यें माळति सुमनें कोणी
नादामध्यें गुणगुणती वा गाणीं
होत्या सिंधू–चिनाब–सतलज–रावी;
झेलम् भासे परि सर्वांची राणी ! ९
मार्गामध्यें दुर्गम दुर्गमहर्षी
सहर्ष त्यांना खुशाल झेलम् स्पर्शी !
स्वभाव कैसा जाइल मूळ तियेचा
विश्वामित्रा पूर्वीं ती आकर्षी !! १०
चालावें किति झेलमनें डौलांत
नाचावें किति लहरींच्या तालांत
तिनें हंसावें कमळांच्या नयनांनीं
अन् बोलावें पक्ष्यांच्या बोलांत ! ११
अपुल्या गंधें कस्तुरिमृग हो धुंद
वेडावुनि तो फिरतो गरगर अंध !
बाहुंत त्याला झेलम् झेलुनि घेई
आवर्तातुनि भरतो कस्तुरिगंध ! ! १२
सर्वच असुनी हिमवंताच्या पोरी
झेलम् होती त्यांतहि निस्तुल गोरी
नटण्याची परि पुरवायातें हौस
काश्मिरदेशीं केली केशर–चोरी ! ! १३
कधीं प्रपातांतुनि झोंकुनि दे अंग
कडे दुतर्फा करी उभे उत्तुंग



अनुक्रमणिका






## 'झेलम्'चे अश्रू

कधींकधीं ती मुग्धेपरि हो स्तब्ध
तारुण्याचे कधीं करावे रंग ! १४
श्रीनगराची श्री झेलम्‌वर लुब्ध
जहांगिराची गिरा जहाली मुग्ध
आणि म्हणाला अकबर, " या झेलम्‌च्या
वक्षावरि बरि कबर मला विश्रब्ध ! " १५
न तो हिमालय—गोकुळ तें दुसरें हो !—
घटांघटांतुनि दुग्ध जयांत भरे हो !
न त्या नद्या—त्या गौळणि हरिच्या साऱ्या
मधेंच झेलम् राधेपरि विचरे हो ! १६
आली देखा, झेलम् गौळण आली
कटि—खांद्यांवर घट होती वर—खालीं
निळसर शालू सोनसळी कांठांचा
लेउनि आली गौळण ही मतवाली १७
जाइल तिकडे तृषार्त झाले शांत
आणि भुकेले थांबविती आकांत
शिंपित शिंपित संजीवन जातां ही
' शान्तिस्तुष्टिः पुष्टिः ' पंजाबांत १८
ती ही झेलम्—पंजाबाची राणी
ती ही झेलम्—सौंदर्याची खाणी
कामदुहा ही दूती देवेन्द्राची
दिसते देखा आतां केंविलवाणी १९
युगानुयुग ही होती तैशी होती
ऋग्वेदांतिल हिनें ऐकिल्या गीती
धम्मपदांतिल वचनें येती पाठ !
अशोक दावित होता इजवर प्रीती २०
उतरे तीरीं शिकंदराची सेना
हिनें पाहिली शकहूणांची दैना
हिच्या घटांतिल दुग्ध पिऊनी मात्र
संस्कृति लाभे अवघ्यां संस्कृतिहीनां ! २१
या झेलम्‌चें एकच शाश्वत गीत—
"करा करा रे परस्परांवर प्रीत
धर्मांच्या वा वंशांच्या अभिमानें
झगडायाची रीत किती विपरीत ! २२

" शीख असूं दे, असुं दे मुस्लिम—हिंदू
एकच आहे मानव्याचा सिंधू !
या सिंधूस्तव आहे जीवन माझें ....
एकवटा रे ! जैसे बिन्दुंत बिन्दू ! " २३
आणि खरोखर झेलम्‌च्या हृदयाला
भिन्नत्वाचा स्पर्शहि नाहीं झाला
कुणी असूं दे भारतभूचा पुत्र—
देवेन्द्राची आज्ञा वंद्य तियेला २४
कुणी असावी दोन जुळ्यांची आई
दोघांनाही दूध पिण्याची घाई....
माउलिच्या मग मायेनें दोघांना
घेउनि अंकीं स्तन्य जशी ती देई ! २५
तैशी देखा—आली झेलम् आली
कटि—खांद्यांवर घट होती वर—खालीं
हिन्दकळोनी दूध अहो ! ओसंडे
दो तीरांवर पुष्टि--तुष्टिही झाली ! २६
ती ही झेलम्—औदार्याची मूर्ती
ती ही झेलम्—ऋग्वेदाची स्फूर्ती
दिसते देखा आतां केंविलवाणी
कामदुहा ती देवेन्द्राची दूती २७
किती लढाया झाल्या हो इजपुढतीं !
चेंगिझ—नादिर अनेक येती जाती !
आज मला परि दिसते झेलम् जैशी
उदास, तैशी कधींच दिसली नव्हती. २८
तीरांवरतीं सैन्यें लढलीं, मेलीं
परस्परांची हानी भलती झाली !
शांत अशा परि साध्या नागरिकांचीं
अशीं न फिरलीं माथीं कुठल्या कालीं....२९
आज ! अरेरे ! झेलम् हो शरमिंदी
तिच्या तरंगीं रक्त मिळे जास्वंदी !
कीं स्तन्यावर झेलम्‌च्या जे पुष्ट
त्या पुत्रांतच व्हावी अंदाधुंदी ! ! ३०
थंडपणानें भाऊ मारिति भावां,
दोस्ती दावुनि साधुनि घेती दावा !

या आईच्या उघड्या डोळ्यांपुढतीं
त्या पुत्रानें याचा प्राणच घ्यावा ! ३१
जिला असावें फालच म्हटलें 'बेटी',
तिला धरावें खुशाल भरल्या हाटीं !
आणि अखेरिस झाल्यावर निर्माल्य
फेंकुनि द्यावें या झेलम्च्या कांठीं ! ३२
शेजाऱ्यांचीं पेटवुनी घरदारें
चिमणीं बाळें फेंकिति आंत अरेरे !
झेलानि त्यांच्या अस्फुटश्या किंकाळ्या
झेलम्‌जवळी येउनि रडती वारे ! ३३
त्या वाऱ्यांची ऐकुनि करुण कहाणी
कोमेजुनि ती गेली ' झेलम् ' राणी
आणि म्हणाली, " पाहुनि पशुता यांची
मम हृदयाचें झालें पाणी पाणी ! ३४
" पुष्कळ पूर्वी पाहियला संहार
युद्धांमधुनी कोटी सैनिक ठार !
अक्षौहिणि त्या मेल्या कौरवसेना
वेड परी हे सर्वांहुनि अनिवार ! ३५
" सिंहव्याघ्रां म्हणतो मानव हिंस्र,
अजगर म्हणती असतो फार अजस्र,
वेडा मानव या सर्वांहुनि दुष्ट
मारुनि टाकी बांधव कैक सहस्र ! ३६
" व्यर्थचि गेली उपनिषदांची वाणी !
मानव शिकला नाहीं कांहि कुराणीं !
व्यर्थ तयाच्या पुढतीं ठरली गीता !
बुद्ध नि येशू, सर्वांवरतीं पाणी ! ३७
" कशी अचानक गेली यांची शुद्ध ?
पाजियली मीं मदिरा किंवा दुग्ध ?
फालच होते भासत देवांऐसे
आज तयांचे बनले राक्षस शुद्ध ! " ३८
खूपच केला मग झेलम्नें शोक
नको म्हणाली मजला मानवलोक
परतुनि गेली झेलम् हिमवंतांत
आणि म्हणाली एकच तेथें श्लोक— ३९
" सर्वज्ञ न हे देव—असे तो दंभ
मनुजांपुढतीं ठरले केवळ शुंभ
देवापेक्षां मानव आहे थोर,
अमृतघटांचे क्षणिं करितो विषकुंभ." ४०

—वसंत बापट
२४–७–१९४८

———

भूतकाळ आणि भविष्यकाळ यांच्या पडद्याआड परमेश्वर आपणांस दिसेनासा झाला आहे. हे दोन्हीहि पडदे ाळून टाकले पाहिजेत. बांबूची काठी ज्याप्रमाणें अनेक गांठींनीं विभागलेली असते, त्याप्रमाणें तुमचें जीवन म्ही किती वेळ असें विभागूं देणार ? जोंपर्यंत बांबू गांठींनीं विभागलेला असतो तोंपर्यंत तो बिचारा किती का असतो ? पण एकदां त्यांतील गांठी काढून टाकल्या कीं, त्यांतून नुसत्या ओंठांच्या आणि श्वासाच्या र्शानें किती मंजुळ वेणुनाद स्रवूं लागतो, किती गूढ सौन्दर्यें त्यांतून प्रकट होतात !

—जलालुद्दिन रुमी.

प्रा. प्र. रा. दामले

# महात्मा गांधी : व्यक्ति व कार्य

"Plato is dear to us, but truth is dearer."—Aristotle.

"I, on the other hand, am a religious man under the garb of a politician."—Gandhi.

'महात्मा गांधींचें व्यक्तिमत्त्व व त्यांचें जीवनकार्य' या विषयावर साहजिकच अनेक ठिकाणीं विचार प्रदर्शित केले गेले आहेत. गत वर्षी त्यांची जीवन–यात्रा अत्यंत विस्मयजनक व घोर रीतीनें संपली त्या वेळीं सर्व सुधारलेल्या राष्ट्रांतून त्यांचेबद्दल नितान्त आदरबुद्धि व्यक्त करण्यांत आली. हिंदुस्थानांत तर कांहीं क्षुद्र अपवाद सोडल्यास, अशी एकहि लहानथोर व्यक्ति नसेल कीं जिनें त्या वेळीं आदर, कौतुक व कृतज्ञता या भावनांनीं प्रेरित होऊन गांधींच्या स्मृतीला वंदन केलें नसेल. परंतु या पूर्वीहि अनेक वर्षें अनेक लहानमोठ्या व्यक्तींनीं गांधींचें चरित्र व त्यांचें कार्य याबद्दल प्रायः स्तुतिपर व क्वचित् निन्दात्मक असें विवेचन केलेलें आहे. तरीहि अद्यापि या विषयावर पुष्कळ अधिक विचार व्हावयास हवा आहे. 'आधुनिक भारताचे जनक' असें ज्या व्यक्तीला आपण म्हणतों तिच्या कार्याची पूरेपूर व योग्य कल्पना आपणांपैकीं पुष्कळांस अद्यापि नाहीं व ती आल्याशिवाय तिच्या कार्याचें चीज आपल्या हातून होणार नाहीं हें स्पष्ट आहे. गांधींचें निधन व त्यापूर्वी व त्यानंतर झालेल्या घटना यांवरून या देशांतील जनतेला गांधी मोठे वाटत असले तरी त्यांच्या कार्याची खरी महती तिला समजली नाहीं असें दिसतें व यांत मी गांधींचे बहुसंख्य अनुयायी व प्रकट व प्रच्छन्न निंदक या दोहोंचाहि समावेश करतों.

## दृष्टिकोन अभ्यासकाचा

प्रस्तुत महत्त्वाच्या विषयाच्या विचाराबाबत आपल्या हातून होईल ती मदत करावी या बुद्धीनें खालील लेख लिहिला आहे. प्रत्यक्ष विवेचनास प्रारंभ करण्यापूर्वी लेखकाचा दृष्टिकोन व या विषयावर विचार प्रकट करण्याची त्याची 'पात्रता' यांबद्दल दोन शब्द लिहिणें योग्य व अवश्य वाटतें. 'पात्रता' इतकीच कीं गेल्या २७–२८ वर्षांत—गांधींचें या देशांतील सार्वजनिक जविन सुरू झाल्यापासून—विद्यार्थिदशेंत व नंतर प्राध्यापक असतां प्रायः असा एकहि सप्ताह गेला नसेल कीं जेव्हां गांधींचें कार्य व चरित्र यांबद्दल कांहीं तरी भावना व विचार लेखकाच्या मनांत आलीं नाहींत. लेखकाप्रमाणेंच इतरहि सहस्रावधि शिक्षित व्यक्तींची अशीच अवस्था असणार. राजकारणांत असो वा नसो, गांधींची दखल विचारांत तरी घेतल्याशिवाय, गांधींविषयीं मनाशीं किंवा स्नेह्यांजवळ तरी टीकात्मक किंवा प्रशंसात्मक असें कांहीं बोलल्याशिवाय फार वेळ राहणें कोणाहि विचारी माणसास या देशांत शक्य नव्हतें. गांधींच्या मोठेपणाचें अगदीं अचूक निदान हेंच होय. म्हणूनच सर्व टीका व टीकाकार एका बाजूला व गांधी एका बाजूला असें असतांहि गांधींचें पारडेंच नेहमीं वजनदार ठरे व ठरेल.

लेखकाचा दृष्टिकोन तत्त्वजिज्ञासूचा व उद्योग शिक्षकाचा आहे; त्याची वृत्ति सत्यान्वेषकाची—अभ्यासकाची आहे. आपल्या देशांतील अत्यंत प्रभावशाली व्यक्ति 'गांधी' यांचा सार्वजनिक संसार आपल्या हयातींत चालू आहे, त्याचें स्वरूप काय, त्यांचें माहात्म्य खरोखर कशांत आहे, त्यांस कांहीं उपाधी आहेत काय, असल्यास त्या कोणत्या व या सर्व निरीक्षणाचा हिंदी व जागतिक जीवनास काय उपयोग होण्यासारखा आहे, यांचा विचार








करण्याची इच्छा हाच लेखकाचा दृष्टिकोन. अर्थात् हा अभ्यास करतांना लेखक तत्त्वजिज्ञासु असला तरीहि हिंदुस्थानचा सामान्य नागरिकहि असल्यामुळें गांधींच्या यशामुळें अभिमान, कौतुक व कृतज्ञता आणि अपयशामुळें दुःख या भावनाहि त्याला वाटत आल्या आहेत. तसेंच गांधींच्या निधनानंतर इतर लक्षावधि हिंदवासीयांप्रमाणेंच गांधींचें नांव उच्चारलें किंवा चलचित्रपटांत गांधींची मूर्ति दिसली कीं "केवढा मोठा हा अवतारी पुरुष आणि आपल्यापैकीं एका व्यक्तीनें त्यांचा काय भयंकर शेवट केला व त्यामुळें कायमची किती मोठी हानि झाली!" या विचारांनीं लेखकाचें मन अस्वस्थ व कावरेंबावरें होतें ! अभ्यासकाच्या दृष्टिकोनाचें मुख्य वैशिष्टय म्हणजे सहृदय निःपक्षपातित्व. जें जीवन, ज्या घटना, किंवा जे अनुभव यांचा अभ्यास करावयाचा त्याच्याशीं किंवा त्यांच्याशीं समरस होण्याचा प्रयत्न करणें हें सत्यान्वेषकाचें पहिलें कर्तव्य होय. पण त्याबरोबरच ही समरसता केवळ भावनात्मक व अंधळी नसून डोळस असावी व इतर मूल्यांचा विसर पडूं देतां कामा नये. लेखाच्या अग्रभागीं दिलेल्या अवतरणांपैकीं ॲरिस्टॉटलचें वचन हें या बाबतींत सामान्यतः ध्येयभूत समजलें पाहिजे व लेखकानें तेंच आपल्यासमोर ठेवलें आहे. असो.

## गांधींचें असामान्य व्यक्तिमत्त्व

गांधींचा सार्वजनिक जीवनक्रम इतका चमत्कृतिपूर्ण आहे कीं तो प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांसमोर घडला नसता तर खराहि वाटला नसता! शास्त्रीय शोध व अद्ययावत्पणा यांच्या युगांत अहिंसा, खादी, मद्यपानबंदी, खेडेगांवची राहणी, या व अशा बाबींवर शक्तिसर्वस्व खर्च करणारी एक व्यक्ति सुमारें तीस वर्षें कोट्यवधि लोकांचें राजकीय धुरीणत्व संभाळते, आपल्या आयुष्यांत त्यांचा स्वराज्याचा लढा पुरा झालेला पाहते व एक वेळचे शत्रू व मित्र दोघांकडूनहि धन्यवाद मिळविते, ही खरोखरच असामान्य घटना होय. या तीस वर्षांत अनेक प्रसंगीं अशा घटना झाल्या कीं, गांधीजींचें सार्वजनिक जीवन संपलें, आतां ते निवृत्त होणार असें पुष्कळांना वाटलें असेल. पण १९२०चा, १९३०चा, १९४२चा, या तीनहि लढ्यांत गांधीच सर्व चळवळीचे खरे नेते राहिले. १५ ऑगस्ट १९४७ला स्वातंत्र्याचा कायदा जाहीर केला गेला, तेव्हां गव्हर्नर-जनरल लॉर्ड माउन्टबॅटन, पंतप्रधान पं. नेहरू व इतर सर्व नेते यांनीं स्वातंत्र्याचे मुख्य कारागीर म्हणून गांधींचा उल्लेख केला, तो अक्षरशः खरा होता हें कोणीहि मान्य करील.

गांधींचें व्यक्तिमत्त्व व त्यांचें कार्य यांचे मुख्यतः दोन भाग पाडतां येतील : देशभक्त गांधी व ईश्वरभक्त गांधी. प्रथम गांधींच्या देशसेवेचा विचार करूं. ब्रिटिश रियासतींतच नव्हे, तर गेल्या कित्येक शतकांत इतकी सर्वांगीण व प्रभावी देशसेवा दुसऱ्या कोणाहि हिंदवासीयानें केलेली नाहीं हें निर्विवाद आहे. ब्रिटिश रियासतींत गांधींच्या पूर्वीं दादाभाई नौरोजी, रानडे, टिळक, गोखले, दे. बं. दास यांसारखे कर्तबगार व ध्येयवादी राजकीय पुढारी, राममोहन रॉय, ईश्वरचंद्र विद्यासागर, स्वामी विवेकानंद, अरविंद घोष, यांसारखे धार्मिक व सामाजिक नेते आणि टागोर व जगदीशचंद्र बोस यांसारख्या प्रतिभासंपन्न व्यक्ती या देशांत होऊन गेल्यामुळें त्यांच्या कार्याच्या योगानेंच गांधींचें कार्य शक्य व सुकर झालें यांत संशय नाहीं. (पण याची पुरेशी जाणीव पंडित नेहरूंपासून अनेक गांधीभक्त देशभक्तांना पुरेशी नाहीं असें त्यांच्या उच्चारांवरून वाटतें.) तसेंच आजहि गांधींचे शिष्यश्रेष्ठ व वारस असे हिंदुस्थानचे पंतप्रधान पं. नेहरू, हिंदुस्थानचे गव्हर्नर-जनरल श्री. चक्रवर्ती राजगोपालाचारियर व उपपंतप्रधान सरदार पटेल यांसारखे कर्तबगार व ध्येयनिष्ठ देशभक्त आपणांत आहेत व पुढेंहि होतील (हेंहि पुष्कळ काँग्रेस-जनांना पटत नाहीं किंवा पटलें तरी आवडत नाहीं!). तरीहि या देशांतील कोट्यवधि जनतेची गांधींनीं जितकी व जशी सेवा केली, तितकी व तशी कोणींहि केली नाहीं हें स्पष्ट आहे. याचें मुख्य कारण म्हणजे गांधींचें असामान्य व्यक्तिमत्त्व. गांधींपेक्षां बुद्धिमत्तेंत, व्यवहारदक्षतेंत व इतर कोणत्याहि एका बाबींत श्रेष्ठ अशा अनेक व्यक्ती आपल्या देशांत गेल्या शतकांत झाल्या व आजहि असतील. परंतु एकंदर गुणसमुच्चयाचा विचार केला तर इतके उत्कट व बहुसंख्य गुण दुसऱ्या कोणाहि देशभक्तांत नव्हते हें








स्पष्ट आहे. याबाबत गांधींची उत्कट धार्मिकता हीच त्यांना फार उपयोगी पडली. 'ईश्वराधिष्ठान' हें सर्व प्रभावी चळवळींचें बीज आहे हें गांधींनीं पुरेपूर ओळखलें होतें व त्याचा त्यांनीं भरपूर उपयोग केला. गांधींबद्दल सामान्य जनतेला असलेली विलक्षण ओढ त्यांच्या धार्मिक देशभक्तीमुळें वाटे. एकंदरींत ईश्वरदत्त किंवा नैसर्गिक देणगी व मानवी प्रयत्न या दोहोंच्या सहकार्यानें गांधी या व्यक्तींत जे गुण विकास पावले ते निर्विवादपणें असामान्य होते.

राजकारण, समाजकारण, अर्थकारण व धर्मकारण यांची गांधींनीं 'खिचडी' केली असा एक आरोप गांधींवर केला जातो व त्यांत माझ्या मतें तथ्यांशहि आहे. गांधींच्या कार्याच्या मर्यादा व त्यांतील कांहीं दोष यांचीहि त्यामुळें उपपत्ति लागेल; परंतु दुसऱ्या दृष्टीनें त्यांतच गांधींचें मोठेपण होतें, त्यांतच गांधींच्या यशाची किल्ली होती. अर्वाचीन हिंदी पुढाऱ्यांपैकीं न्यायमूर्ति रानडे यांचें या बाबतींत गांधींशीं सादृश्य दिसतें. त्यांचा व गांधींचा व्यक्तिपिंड अगदीं वेगळ्या प्रकारचा आहे : रानडे बुद्धिमार्गी तर गांधी भावना-मार्गी होत. तरी पण देशभक्तीच्या मर्यादा सबंध जीवनावर पसरविणें व त्याला धार्मिकतेची पीठिका देणें या बाबतींत मात्र त्या दोघांचें साम्य आहे.

## कांहीं भावनाशील अर्वाचीनांचा समज

देशभक्त म्हणून गांधींनीं काय मिळविलें याचें उत्तर वाटतें तितकें सोपें नाहीं. कारण, आपणांस स्वातंत्र्य मिळालें तें गांधींच्याच प्रयत्नानें, असें म्हणतां येत नाहीं. एक तर गांधींच्या पूर्वी दादाभाई नौरोजींपासून जे अनेक थोर राजकीय पुढारी झाले त्या सर्वांच्या प्रयत्नांची पार्श्वभूमि, तसाच त्यांचा पाया गांधींच्या कार्यास होता; आणि दुसरें म्हणजे महायुद्धामुळें उत्पन्न झालेल्या जागतिक परिस्थितींतलि फेरबदल न होते, तर आणखी पन्नास वर्षे तरी आपणांस स्वराज्य मिळालें असतें असें वाटत नाहीं. १९२१ची, १९३०-३१ची, १९३२-३४ची, इतकेंच नव्हे तर१९४२ची-या चार चळवळींनीं एक प्रकारची जागृति केली व ब्रिटिश राज्यसत्तेविषयीं असमाधान उत्पन्न केलें,त्यायोगें स्वराज्य जवळ आलें असलें तरी आणखी अनेक सर्वगामी व उत्कट चळवळी झाल्याशिवाय स्वराज्य मिळालें असतें अशी शक्यता दिसत नाहीं. ही वस्तुस्थितीहि आजच्या अनेक नेत्यांना माहीत नसावी किंवा मान्य तरी नसावी असें त्यांच्या भाषणांवरून वाटतें.

गेलीं तीस वर्षे विद्यमान राजकीय पुढाऱ्यांतील या देशाचे सर्वश्रेष्ठ राजकीय नेते असल्यामुळें, स्वातंत्र्याचे मुख्य कारागीर व प्रणेते आणि अर्वाचीन हिंदुस्थानचे पितृतुल्य पुढारी असें गांधींचें वर्णन करणें योग्य असलें तरी "केवळ त्यांनींच (किंवा केवळ १९२१नंतरच्या देशभक्तांनींच) स्वातंत्र्य मिळविलें" असा जो कांहीं भावनाशील अर्वाचीनांचा समज आहे तो मात्र वस्तुस्थितीवर आधारलेला नाहीं. शिवाय, अनेक महत्त्वाच्या बाबतींत हा देश इतका मागसलेला आहे व स्वातंत्र्यप्राप्तीनंतर व स्वातंत्र्यप्राप्तीकरतां इतक्या अनिष्ट घटनांचा स्वीकार करावा लागलेला आहे कीं गांधींना अर्वाचीन हिंदुस्थानचे जनक व स्वातंत्र्याचे मुख्य प्रणेते असें म्हटल्याबरोबर आजच्या हिंदुस्थानचीं तशींच आपणांस मिळालेल्या स्वातंत्र्यांतलीं जीं अनेक वैगुण्यें आहेत त्यांचा उगम त्यांच्या कार्यपद्धतींतील दोषांमुळें झाला नसला तरी त्यांचें अस्तित्व त्यांमुळें राहिलें आहे असें म्हणणें भाग आहे.

## आपल्यामधील दोषांची जबाबदारी

तसेंच पाहिलें तर स्वतंत्र हिंदुस्थानांत कोणते दोष नाहींत ? नागरिकत्वाच्या जाणिवेचा संपूर्ण अभाव जनतेंत आढळून येतो, तर जबाबदार किंवा लोकशाही राज्यपद्धतींतील मूलभूत कर्तव्यें करण्याची असमर्थता राज्यकर्त्यांत दिसून येते. याचा अर्थ पंडित नेहरू किंवा सरदार पटेल व इतर कांहीं मंडळी कर्तबगार व ध्येयनिष्ठ पुढारी नाहींत असा नव्हे, तर आमचे श्रेष्ठ पुढारीहि आमच्यांतलेच असल्यामुळें आमच्याप्रमाणेंच तेहि शिस्तीच्या, संयमाच्या, विचारशीलतेच्या व रचनात्मक कार्यनिष्ठेच्या उच्च कसोटीस उतरूं शकत नाहींत, इतकेंच नव्हे तर पुरोगामी विचार व समाजव्यवस्था यांचें पूर्ण आकलनहि त्यांना होतें असें दिसत नाहीं, इतकाच आहे. जनता सर्वस्वीं अशिक्षित व पुढारी राज्यकारभारांत अननुभवी, यामुळें स्वातंत्र्य मिळवि-












तांना विशेषतः देशाच्या विभागणीची जी अनिष्ट घटना आपणांस स्वीकारावी लागली तीमुळें, तसेंच जगांतील बलाढ्य राष्ट्रांच्या समूहांत प्रथमच स्वतंत्रपणें व्यवहार करण्याची पाळी आल्यामुळें, स्वातंत्र्याचें पहिलें वर्ष अनेक दृष्टींनीं तापदायक गेलें. आमची राजकीय चळवळ अधिक बुद्धिवादी, अधिक रचनात्मक व अधिक अंतर्मुख रीतीनें चालविली गेली असती तर आज आमच्यापुढें असलेले अडचणींचे अनेक प्रश्न उद्भवलेच नसते किंवा उद्भवले असते तरी इतके विकट तरी झाले नसते असें समजण्यास जागा आहे.

## आमचे प्रश्न सुटले का विकट झाले ?

हिंदुमुसलमानांचें वैमनस्य, अस्पृश्य समाजाला स्पृश्यांबद्दल वाटत असलेला अविश्वास, आत्यंतिक दारिद्र्य, संपत्तीची विषम व अन्याय्य विभागणी आणि शिस्त व नागरिकत्वाची जबाबदारी यांचा अभाव हे महत्त्वाचे अडचणींचे प्रश्न होत. ह्या सर्व अडचणी आमच्या मार्गांत ब्रिटिश लोकांनीं आणल्या व त्यांस आम्हीं बिलकुल जबाबदार नाहीं असें म्हणण्याचा आपल्याकडे सार्वत्रिक प्रघात आहे, त्यांत अधिकांत अधिक 'अर्धसत्य'च आहे. तरी पण ब्रिटिशांची राज्यसत्ता हांकलून लावणारे आमचे नेते या अडचणी कां दूर करूं शकले नाहींत हेंहि विचार करण्यासारखें आहे. माझ्या मतें गांधींची प्रभावी व सर्वंकष पण वावटळी व प्रदर्शन–प्रधान (Demonstrative) राजनीति व कार्यपद्धति यामुळें हे प्रश्न सुटले तर नाहींतच, पण उलट विकट होऊन बसले! व्यक्तिशः गांधींपुढें हे प्रश्न नव्हते; कारण, ते या सर्वांकडे उच्च नैतिक भूमिकेवरून पाहत. परंतु प्रत्यक्ष राजकारणांत त्यांच्या बहुसंख्य अनुयायांमध्यें त्यांची सात्त्विकता नसूनहि त्यांना इच्छा मात्र व्यावहारिक यशाची होती. तथापि त्यांचे मार्ग व्यावहारिक नव्हते; म्हणून शेवटीं चांगुलपणाहि नाहीं व यशहि नाहीं अशी अवस्था झाली आहे!

"माझा रचनात्मक कार्यक्रम जनतेनें पार पाडल्यास एका वर्षांत स्वराज्य मिळेल" असें गांधी म्हणत, त्याला गांधींचे टीकाकार हंसले व गांधींच्या अनुयायांनीं त्याकडे कानाडोळा केला व म्हणूनच स्वराज्य मिळूनहि त्याबरोबर जें सुख, जें स्वातंत्र्य व जी सुबत्ता येतील असें वाटलें होतें तीं आलीं नाहींत. याचा दोष एका अर्थी जनतेवर असला तरी एका अर्थी पुढाऱ्यांवर व म्हणूनच सर्वश्रेष्ठ नेते गांधी यांवरहि येतो. खरोखरच गांधींच्या या चतुः–सूत्रीकडे योग्य लक्ष पुरविलें गेलें असतें तर आमचे विकट प्रश्न सुटण्याच्या मार्गाला लागले असते व स्वराज्याच्या पहिल्या वर्षांत घडलेल्या अनन्वित घटना झाल्याच नसत्या. या रचनात्मक कार्याचे प्रणेते गांधीच होत यांत शंका नाहीं. परंतु राजकीय चळवळ व असमाधानाचें साधन म्हणूनच प्रायः तिचा उपयोग त्यांच्या बहुसंख्य अनुयायांनीं केला व गांधींनीं त्यांना तो तसा करूं दिला. त्यामुळेंच प्रत्यक्ष रचनात्मक कार्य फारच अल्प झालें. ज्या हिंदु-मुस्लिम-ऐक्याच्या व सलोख्याच्या ध्येयाकरितां गांधींनीं शेवटीं आपले प्राणहि अर्पण केले त ध्येय इतकें दूर कां गेलें याचा विचार केला तर मुसलमान नेत्यांचा दुराग्रह व जागतिक परिस्थिति यांबरोबरच महात्मा गांधींसकट बहुसंख्य हिंदुपुढाऱ्यांमधला मुत्सद्दीपणाचा व एकसूत्रीपणाचा अभाव हींच त्याची कारणें होत, असें दिसून येईल. मुसलमान म्हटला कीं तो लबाड व दुष्टच अशीच ज्यांची विचारसरणी असेल त्यांची गोष्ट वेगळी; परंतु मुसलमान लोकहि आपणांसारखेच मानव आहेत व हिंदीहि आहेत, मग ते एकदम असे देशद्रोह्यांसारखे कां वागूं लागले हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे व त्यांत पुष्कळच आत्म–निरीक्षण करतां येण्यासारखें आहे. अस्पृश्य जमातीचा प्रश्नहि अद्यापि समाधानकारक रीतीनें सुटलेला नाहीं व आज तो दबलेला दिसत असला, तरी केव्हां ना केव्हां तरी तो हिंदुस्थानच्या प्रगतीच्या आड पुनः येईल, अशी भीति आहे. व त्याचेंहि कारण म्हणजे गांधी व त्यांचे अनुयायी यांची घरसोडीची वृत्तीच. गेल्या प्रांतिक निवडणुकींत अस्पृश्य समाजानें मोठ्या बहुमतानें निवडलेले उमेदवार नंतर सार्वत्रिक मतनोंदणींत अयशस्वी होणें, डॉ. अंबेडकर यांना घटनासमितींत निवडून येण्याकरितां बंगालपर्यंत जावें लागणें, श्री. मंडल यांचें पाकिस्तानमधील प्रधानपद, हैद्राबाद संस्थानांतील अस्पृश्य समाजाचा रझाकारांना किंवा निदान हिंदविरोधी गटांना मिळत असलेला पाठिंबा, या घटनांचा नीट विचार








केला तर या जमातीचा प्रश्न न्याय्य व समाधानकारक रीतीनें सोडविला गेलेला नाहीं हें स्पष्ट होईल. महाराष्ट्रापुरतें बोलावयाचें तर जो ब्राह्मण–ब्राह्मणेतर–प्रश्न आम्हीं सोडविला असें कॉंग्रेसचे येथील नेते म्हणत होते, तो सुटलेला नाहीं, हें 'बहुजनसमाज'–पक्षाची स्थापना दाखवीत आहे. असो.

## खादीच्या कार्यक्रमाचें काय झालें ?

गांधींच्या रचनात्मक कार्यक्रमापैकीं अतिशय महत्त्वाची आणखी एक बाब म्हणजे खादी. स्वावलंबन, साधेपणा व न्याय्य अर्थविभागणी यांनींच हिंदुस्थानचा (व जगाचाहि) दारिद्र्याचा प्रश्न सुटूं शकेल व याबाबत नेत्यांनीं उदाहरण घालून दिलें पाहिजे, हा खादीच्या कार्य–क्रमाचा खरा अर्थ; परंतु गांधींच्या हयातींतच त्यांच्या व्यापारी मित्रांनीं व त्यांच्या बहुसंख्य कॉंग्रेस–अनुयायांनीं खऱ्या खादीला वाणीनें नसला तरी कृतीनें धोका दिला! खादी वापरली; पण ती मिलची किंवा जपानीहि!! व वापरली तीहि कॉंग्रेस–संस्थेंत व तिच्याकरवीं इतरत्र निवडून येण्याकरितां!!! ही गोष्ट गांधींसारख्या चतुर मनुष्याच्या लक्षांत आली नसेल, हें शक्य नाहीं. पण 'असले नालायक व अप्रामाणिक अनुयायी मला नकोत, तुम्हीं आपला लढा चालवा', असें कॉंग्रेसला न म्हणतां गांधी कॉंग्रेसशीं सहकार्य करीतच राहिले, याचा अर्थ रचनात्मक कार्यक्रम केवळ राजकीय चळवळीचें साधन म्हणून करूं देण्याला ते तयार होते व आपल्या अत्यंत ओजस्वी व सत्प्रवृत्त कार्य–क्रमाकडे त्यांनीं कांहींशी पाठ फिरविली असाच होतो.

## नेता म्हणून गांधीजींची जबाबदारी

गांधींच्या जीवनाचें सार व कार्यपद्धतीचें वैशिष्ट्य त्यांच्या 'अहिंसे'त आहे. परंतु खेदाची व शरमेची गोष्ट अशी कीं हिंदी जनता खऱ्या अर्थानें अहिंसा–भक्त बिलकुल बनली नाहीं, असेंच अनेक वेळां सिद्ध झालें आहे! शेवटीं तर कळसच झाला!! स्वराज्याच्या पहिल्या वर्षांत लक्षावधि लोकांची हत्या व वाताहत आपणच केली व अहिंसेचे मुख्य सेवक गांधींजी यांचाहि खून या देशांत झाला!!! ख्रिस्त, सॉक्रेटीस किंवा लिंकन यांच्या हत्येपेक्षां अधिक रानटीपणानें व अधिक बेदरकारपणानें हा खून केला गेला.

व्यक्तिशः गांधींनीं आपलीं तत्त्वें जीवनांत पाळलीं; परंतु आपले अनुयायी तीं पाळीत नाहींत व त्यांचा त्यांवर विश्वास नाहीं, हें स्पष्ट असतांना राजकीय नेते म्हणून त्यांनीं त्यांना पाठीशीं घातलें व चळवळ चालू ठेविली. विशेषतः १९४२च्या चळवळी–बाबत 'अहिंसा' शब्दाचा जो अर्थ गांधींनीं करूं दिला त्यानें अहिंसेचीच 'हिंसा' झाली! स्वराज्याच्या किंवा कोठल्याहि न्याय्य लढ्यांत 'हिंसा' करायला लागली तरी करावी असें म्हणणारा एक प्रामाणिक व ध्येयवादी पक्ष आहे; पण गांधींचे अनुयायी (व बहुसंख्य हिंदी जनता) तसले प्रामाणिक लढवय्ये नव्हते, तर भ्याड हिंसात्मक वृत्तीचे होते असेंच इतिहास म्हणेल. वरील विवेच–नांतील विधानें सर्वसाधारण असून त्यास अपवाद आहेत व स्वतः गांधी किंवा त्यांचे कांहीं खरे अनुयायी यांना तीं लागत नाहींत हें इतरांप्रमाणें लेखकासहि माहीत आहे. तरीहि पण नेते म्हणून अनुयायांच्या वैगुण्यांची जबाबदारी या सर्वांवर पडते व म्हणूनच राजकीय पुढारी म्हणून गांधींचें यश परिपूर्ण नाहीं. त्याचप्रमाणें त्यांनीं अधिक बुद्धिवादी व व्यावहारिक आणि म्हणूनच त्या अर्थीं अधिक प्रामाणिक कार्यपद्धतीचा अंगीकार केला असता तर तें यश अधिक परिपूर्ण झालें असतें असें मानण्यास सबळ कारणें आहेत.

तथापि ही उणीव मानली तरीहि गांधी हे भारताचे सर्वश्रेष्ठ राजकीय पुढारी व आधुनिक भारताचे जनक होते या विधानाला बाध येत नाहीं. कारण, हें विधान तुलनात्मक आहे व त्या दृष्टीनें विद्यमान व गत पुढा–ऱ्यांशीं तुलना करतां गांधींइतकी प्रभावी देशसेवा त्यांच्याइतक्या दीर्घ काळपर्यंत कोणींहि केली नाहीं हें स्पष्ट आहे. शिवाय, आणखी एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. ती ही कीं नेत्यांचे दोष हे अनुयायांच्या वैगुण्यांचे प्रतिक्रियात्मक असेच असतात व हिंदुस्थानसारख्या मागसलेल्या व सर्व दृष्टींनीं निकृष्टावस्थेंत असलेल्या देशाऐवजीं अधिक सुधारलेल्या, प्रगतिपर व जिवंत राष्ट्रांत गांधी जन्मले असते तर ते याहीपेक्षां मोठे झाले असते.



अनुक्रमणिका








गांधींचा अमानुष रीतीनें वध झाल्यापासून त्या वधास कोण व किती (कायदेशीर दृष्ट्या नव्हे) जबाबदार ठरतात व त्यानंतर देशाच्या कांहीं भागांत उठलेल्या वावटळीचें खरें स्वरूप काय व तीवर कायमचे उपाय कोणते याची या मासिकांत व इतरत्रहि बरीच चर्चा झाली आहे व अनेक विचारी व विद्वान् व्यक्तींनीं तींत भाग घेतला आहे. वस्तुस्थितीचीं बहुतेक अंगें पुढें आलीं आहेत; परंतु त्यांचा समन्वय करण्याच्या मनःस्थितींत कोणी-च नव्हतें असें वाटतें. प्रस्तुत लेखांत या प्रश्नाचा प्रत्यक्ष व सविस्तर विचार करणें नाहीं; परंतु माझे सिद्धांत चर्चेकरतां थोडक्यांत मांडीत आहें.

## गांधीजींच्या जीवनमूल्यांना नकार

माझ्या मतें गांधी या व्यक्तीचा खरा मोठेपणा या देशांतील बहुसंख्य जनतेला, विशेषतः त्यांच्या अनुयायांना कधींच समजला नाहीं व गांधींची शिकवणूक तर फारच थोड्या व्यक्तींनीं प्रामाणिक-पणानें पाळली. म्हणून, प्रत्यक्ष गांधींचा खून झाला नसता तरीहि गांधींच्या जीवन-मूल्यांना हिंदी जन-तेनेंच नव्हे तर त्यांचे अनुयायी म्हणविणाऱ्यांनींहि 'नकार'च दिला असें स्पष्ट झालें होतें. गांधीजी शेवटल्या कांहीं महिन्यांत अतिशय उदास असत व त्याचें कारण एकच कीं ज्या ज्या गोष्टी ते मूलभूत म्हणून मानीत, त्यांचेकडे या देशांतील जनता व नेते यांनीं पाठ फिरविली होती. म्हणून मौ. आझाद यांनीं म्हटल्याप्रमाणें एका अर्थीं प्रत्येक हिंदी व्यक्तीच्या हातावर गांधीजींच्या रक्ताचा डाग आहे व तो यापुढील आचरणानेंच धुऊन निघाला तर निघेल, गांधींच्या नुसत्या स्तुतीनें किंवा गांधींच्या निंदकांची निर्भर्त्सना केल्यानें नव्हे.

## खून होण्यापूर्वी

परंतु वरील महत्त्वाची पण अनेकांना समजत नसलेली या प्रश्नाची बाजू लक्षांत घेतली तरीहि प्रत्यक्ष खुनाची घटना होण्यापर्यंत पाळी आली याचीं दुसरींहि कारणें आहेत : असलें कृत्य प्रत्यक्ष करणारे लोक माथेफिरू असतात व ते ज्या समाजां-तील असतील त्या समाजांत इतर पुष्कळ व्यक्तीहि तश्याच असतील असें समजणें चुकीचें आहे. तथापि हा प्रश्न येथेंच सोडतां येत नाहीं. याचें कारण असें कीं अश्या अविचारी व माथेफिरू व्यक्तींना तरी गांधीजी या व्यक्तीचा खून करावासा कां वाटला, याचा विचार कर्तव्य आहे. त्याचें एक कारण गांधींचा मोठेपणा. असामान्य व अवतारी व्यक्ती इतक्या प्रभावशाली होतात कीं त्यांच्याशीं सहमत नसलेल्या व्यक्ती उघड व परिणामकारक प्रतिकार करूं शकत नाहींत, म्हणून आततायी बनतात. याबाबत माझ्या मतें मध्यवर्ति सरकारनें सरकार म्हणून आपल्या जबाबदाऱ्या ओळखल्या नाहींत. कटाचा तपास व बंदोबस्त या बाबींचा उल्लेख मी येथें करीत नाहीं. त्या कोर्टासमोर आहेत. एका अर्थीं गांधींचें संरक्षण करणें खरोखरच कठिण होतें. कांहींहि व कस-लेंहि संरक्षण आग्रहपूर्वक न घेतां जनसमुदायांत अहर्निश मोकळेपणानें वावरणाऱ्या एका निःशस्त्र व कनवाळू वृद्धाला मारणें यांत तसें कठिण कांहींच नाहीं व कडेकोट बंदोबस्त असतांहि अशीं कृत्यें धाडसी लोक करूं शकतातच. तथापि मी हिंदी सरकारला दोष देतों तो इतकाच कीं गांधींनीं सत्प्र-वृत्ति व मनाचा थोरपणा यांमुळें घेतलेला निर्णय व्यावहारिक दृष्टीनें अव्यवहार्य आहे हें स्पष्ट असूनहि त्याला सरकारकडून पसंतीचा शिक्का मिळाल्यासारखा झाला व ह्या सरकारकडून गांधींच्या अव्यवहार्य गोष्टीहि उचलून धरल्या जाण्याचा संभव आहे असें दिसलें; तेव्हां मात्र गांधींचाच नाश केला पाहिजे असें अविचारी व बेफाम व्यक्तींस माथेफिरूपणाच्या लहरींत वाटूं लागलें असेल. (प्रत्यक्ष ५५ कोटी रु. पाकिस्तानला देणें ही कृति उच्च व नैतिकच नव्हे तर प्रत्यक्ष व्यावहारिक राजनीति व सभ्यता या दृष्टींनींहि अगदीं योग्य होती व ते न देणें प्रथमपा-सूनच अयोग्य होतें असें माझें व्यक्तिशः मत आहे. परंतु इतरहि अनेक कबुलीजबाबासारखीं विधानें हिंदुजमातीच्या वतीनें केलीं गेलीं व हिंदुसमाजास तोंडघशीं पाडल्यासारखें वाटेल अश्या घटना झाल्या. कोणत्याहि जबाबदार सरकारनें त्या होऊं देणें शहाणपणाचें नव्हतें.) गांधी या व्यक्तीबद्दल नावड, तिरस्कार व द्वेष या भावना हिंदुसमाजाच्या कांहीं भागांत पसरलेल्या नसत्या, तर कांहींहि व कितीहि तीव्र मतभेद असते तरी गोष्टी



अनुक्रमणिका






या थराला आल्या नसत्या. म्हणून कोणाचीं भाषणें, कोणाचे लेख व कोणाचीं कृत्यें यांमुळें या भावना प्रसृत झाल्या असतील याचा विचार करावयास हवा व तो केल्यास हिंदुसभा, राष्ट्रीय-स्वयंसेवकसंघ व महाराष्ट्रांतील सुशिक्षितांपैकीं कांहींजण व त्यांपैकीं म्हणून महाराष्ट्रांतील ब्राह्मण समाजाचा कांहीं भाग हे सर्वस्वीं निर्दोषी ठरतील असें वाटत नाहीं.

## खुनाच्या घटनेनंतर

गांधीजींच्या वधानंतर जी दोषार्ह वावटळ या भागांत उठली तिला दुसरीं कारणें असलीं तरी, गांधी या राष्ट्रवंद्य विभूतिबद्दल अनादर व शत्रुत्व दाखविणाऱ्या लोकांना शासन करण्याची इच्छा हेंहि एक कारण होतें, याबद्दल संशय नाहीं. ब्राह्मण समाजाच्या कांहीं व्यक्तींकडून गांधींविषयीं असा अन्याय होण्याचें कारण त्यांनीं खऱ्या ब्राह्मण्याकडे पाठ फिरविली आहे हेंच होय. श्री. जावडेकर समजतात त्याप्रमाणें खरा ब्राह्मण केवळ पाठिक, विद्वान् आणि संतवृत्ति नसणारा व न समजणारा असा नाहीं. तो सत्य अर्थानें विद्वान् म्हणजेच 'जाणणारा' व 'शहाणा' असतो व त्याच्याइतकें सत्प्रवृत्तीचें चीज, कौतुक व आचरण कोणीहि करूं शकत नाहीं, असेंच इतिहास व वर्तमानकाळ सांगतात. खऱ्या ब्राह्मण्याचा ऱ्हास झाल्यामुळेंच ब्राह्मण सर्व क्षेत्रांत अवनति पावलेले आहेत व गांधी–द्वेष हा त्याचा परिणाम आहे. एका अर्थी प्रत्यक्ष खून करणाऱ्या धाडसी इसमापेक्षांहि ज्यांचे आचार व ज्यांची विचारसरणी यांमुळें असें कृत्य झालें तेच लोक अधिक दोषार्ह व भ्याडपणामुळें अधिक तिरस्कारार्ह आहेत.

गांधींच्या शोचनीय निधनानंतर त्यांच्या अनुयायांनीं काय केलें व काय केलें नाहीं याचा थोडक्यांत निर्देश करून हा विषय संपवितों. माझ्या मतें गांधीजींच्या निधनामुळें भावनेचा जो आवेग साहजिकच सर्व हिंदवासीयांच्या व विशेषतः गांधींच्या अनुयायांच्या ठायीं उत्पन्न झाला त्याचा आविष्कार करतांना गांधींच्या मोठेपणाला साजेसा संयम दाखविला गेला नाहीं. गांधींचा अंत्यविधि होईपर्यंत नभोवाणींच्या व इतर सर्व प्रचारसाधनांच्या द्वारें शोकप्रदर्शनाची सीमा गांठली गेली! तसें करतांना शेवटीं शेवटीं साहजिकच आर्तता व स्वाभाविकपणा यांची उणीव दिसून आली व तेराव्या दिवशींच्या महायात्रेची रेडिओवरील वर्णनें तर इतर मिरवणुकींच्या किंवा क्रिकेट-मॅचच्या वर्णनासारखीं वाटूं लागलीं! या सर्व अतिरेकाचा अनिष्ट परिणाम असा झाला कीं हा भावनावेग ओसरल्यावर गांधींना जनताच नव्हे तर खुद्द त्यांचे अनुयायीहि विसरल्यासारखे दिसतात. ज्या गांधींना उभ्या आयुष्यांत एकाहि निधीचे बाबतींत अपयश आलें नाहीं, त्यांच्या स्मारकाच्या निधीबाबत इतकी व्यवहारशून्यता व इतकें कार्यशैथिल्य दिसून येत आहेत कीं त्यामुळें कोणाहि सहृदय हिंदवासीयास खेद वाटल्याशिवाय राहणार नाहीं. माझ्या मतें याचें मुख्य कारण म्हणजे गांधींचा खरा मोठेपणा त्यांच्या तथाकथित अनुयायांस कधींच नीट समजला नाहीं व पटलाहि नाहीं.

गांधीजींयेवढी असामान्य व्यक्ति या देशांत होऊन गेली; परंतु त्यांच्या गुणांचें चीज आपण पुरेसें करूं शकलों नाहीं, ही अत्यंत खेदाची गोष्ट आहे. परंतु ती कबूल केल्यानेंच यापुढें तरी प्रामाणिक आचरण होईल हें लक्षांत ठेवलें पाहिजे. जे लक्षावधि लोक आपणांस गांधींचे अनुयायी म्हणवितात, गांधीटोप्या घालतात व कॉंग्रेसचे म्हणून निवडून येतात, ते सर्व जर खरे गांधी–भक्त असते किंवा होतील तर आमचे पुष्कळसे प्रश्न सुटण्याच्या मार्गास लागले असते किंवा लागतील. खरी भक्ति म्हणजे अंधश्रद्धाहि नव्हे वा ढोंगहि नव्हे.

गांधींच्या व्यक्तिमत्त्वाचा व जीवनकार्याचा दुसरा महत्त्वाचा भाग म्हणजे त्यांची ईश्वरभक्ति व धार्मिकता. गांधी या व्यक्तींत देशभक्ति व ईश्वर–भक्ति या दोहोंचा सुंदर मिलाफ झाला होता. या दोहोंचा अन्योन्यसंबंध निकट आहे; तो कसा याचाहि विचार आपणांस करावा लागेल. परंतु तत्पूर्वी गांधींच्या धार्मिकतेबद्दल किंवा ईश्वरभक्तीबद्दल सविस्तर विवेचन करणें जरूर आहे. तें पुढील* लेखांत करूं.

* प्रा. दामले यांचा या विषयावरील पुढील लेखांक 'नवभारत'च्या पुढील अंकांत येईल.—का. सं.









अनुक्रमणिका

आचार्य काका कालेलकर

# अ भि न व  सा ध ना

### व्यक्ति व समाज यांमधील सनातन द्वंद्व

राजकारणांत अगदीं प्राथमिक पण अत्यंत महत्त्वाची चर्चा म्हणजे व्यक्ति श्रेष्ठ का समाज श्रेष्ठ ही असते. ''समाज अथवा राष्ट्रपुरुष हाच खरा 'अेकम्' आहे. त्याच्या अस्तित्वासाठीं आणि विकासासाठीं व्यक्तींचें बलिदान द्यावयास हरकत नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्याला कांहींच अर्थ नाहीं. जें कांहीं स्वातंत्र्य असावयाचें तें समाजालाच असलें पाहिजे. समाजाचा व्यक्तींवर सर्वच प्रकारचा अधिकार असला पाहिजे, ताबा असला पाहिजे. व्यक्तिजीवनाच्या सर्व अंगांचें नियंत्रण करण्याचा हक्क समाजाला आहे'' असें या पक्षाचें आत्यंतिक म्हणणें असतें. 'व्यक्तीनें मिळविलेली संपत्ति समाजाचीच असली पाहिजे. समाज सांगेल तेंच काम व्यक्तीनें केलें पाहिजे. फार कशाला, व्यक्तीनें कोणा व्यक्तीशीं लग्न करावें किंवा करूं नये. हें देखील समाजानेंच ठरवून द्यावें,' असें म्हणण्यापर्यंत या पक्षाची केव्हां केव्हां मजल जाते.

त्यजेत् अेकं कुलस्यार्थे
ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत् ।
ग्रामं जनपदस्यार्थे ...... ।। या सूत्राचा हा पक्ष फायदा घेतो. कुलाच्या कल्याणासाठीं एका व्यक्तीचें बलिदान अवश्य द्यावें, गांवाच्या संरक्षणासाठीं किंवा हितासाठीं एकाद्या सबंध कुळाचा नायनाट होत असला तरी तें मान्य करावें आणि सबंध राष्ट्रासाठीं व्यक्ति आणि कुल यांचाच काय, पण अनेक गांवांचा नाश देखील पत्करावा, असें आपल्या पूर्वजांनीं लिहून ठेवलें आहे तें उगीच नव्हे, असें ते म्हणतात !

'समाजानें ठरवावयाचें म्हणजे कोणीं ठरवावयाचें ?' असा प्रश्न स्वभाविक उरतोच. यावर ते म्हणतात कीं समाजाचे प्रतिनिधी म्हणून जे नेमले जातात किंवा समाज ज्यांना त्या त्या विषयांतील तद्–विद् म्हणून स्वीकारतो, त्यांच्या अभिप्रायांप्रमाणें सरकार सांगेल तसें व्यक्तीनें चाललें पाहिजे.

व्यक्तीची आवडानिवड, व्यक्तीचें विशिष्ट कौशल्य, व्यक्तीची परिस्थिति वगैरे गोष्टींचा विचार समाजाचे प्रतिनिधी करतीलच; पण ते करोत किंवा न करोत, त्यांच्या मार्फत समाज जो कांहीं हुकूम करील तो व्यक्तीनें स्वीकारलाच पाहिजे, अशा तऱ्हेची या लोकांची लष्करी दृष्टि असते. ते असेंहि म्हणतात कीं 'व्यक्ति क्षणजीवी आहे. मनुष्य बघतां बघतां म्हातारा होतो, मिळविलेली शक्ति गमावून बसतो. विस्मरणाचे पराक्रमहि कमी नसतात आणि शेवटीं मनुष्य मेला म्हणजे सगळाच ग्रंथ आटोपतो ! व्यक्ति नश्वर आहे; त्या मानानें समाज व्यापक आणि स्थिर आहे. व्यक्तीनें मिळविलेलें समाज संभाळून ठेवतो. यामुळें अमरत्व आणि दैवी गुण व्यक्तीपेक्षां समाजांतच अधिक आहेत. समाज हा एकम् आहे, व्यक्ति हा त्याचा अंश आहे.'

याच्या उलट दुसरा पक्ष म्हणतो कीं ''व्यक्तीमध्येंच चैतन्यतत्त्व व्यक्त होतें; व्यक्ति हाच खरा आध्यात्मिक एकम् आहे. समाज म्हणजे फक्त संख्या. संख्येंत नैतिक तत्त्व किंवा आध्यात्मिक तत्त्व कधीं दिसून येत नाहीं. संख्या ही वस्तूच अनाध्यात्मिक आहे. व्यक्ति ही पवित्र वस्तु आहे. तो ईश्वराचा एक प्रयोग आहे. व्यक्तीनें मिळविल्यावांचून समाज संभाळून तें काय ठेवणार ? आणि खरोखर पाहतां संभाळण्याचें काम शेवटीं व्यक्तीच करतात. विस्तार व्यक्तींच्या हातूनच होतो. व्यक्तींच्या विकासाला जितपत उपयोगी असेल त्या मानानेंच समाजाला आणि सामाजिक संस्थांना महत्त्व आहे.

व्यक्तीची उत्कटता, नैतिकता आणि उंची समाजांत टिकूंच शकत नाहींत. समाज नेहमींच व्यक्तीला खालीं ओढण्याचें काम करतो.'

व्यक्ति आणि समाज यांच्यामधील हें सनातन द्वंद्व जसें दर्शनशास्त्रांत दिसून येतें, तसेंच तें राजकारणांतहि शिरलेलें आहे. तात्त्विक अराजकवाद व्यक्तिनिष्ठेला प्राधान्य देतो. याच्या उलट समाजवाद, साम्यवाद आणि समष्टिवाद समाजालाच सर्व प्रकारें पुढें करतात!

## तडजोड कीं समन्वय ?

जेथें द्वैत किंवा द्वंद्व आलें तेथें दोहोंची सांगड घालणारा आणि दोहोंना कसेंबसें संभाळून घेणारा तडजोडवाद असतोच. आजकालची लोकशाही—डेमॉक्रसी—अशा तडजोडवादाची प्रतिनिधि आहे. व्यक्ति—स्वातंत्र्याला शक्य तितकें अधिक संभाळून संख्या—मताचें राज्य चालविण्याचा लोकशाहीचा प्रयत्न असतो.

विचारवंतांना व्यक्तिवाद आणि समाजवाद दोन्ही एकांगी वाटतात आणि तडजोडवाद त्यांना कधींच संतोषकारक वाटत नाहीं. आणि म्हणून ते समन्वय—वाद शोधीत असतात. तडजोडीमध्यें विरोध, वैषम्य आणि विसंगति यांचा नाश झालेला नसतो. दोन्ही पक्ष कसेबसे संभाळून जन—संसाराचें गाडें पुढें हांकण्याचा तो प्रयत्न असतो! खरा समन्वयवाद परस्परविरोधी दिसणाऱ्या तत्त्वांतील मूलगत वैषम्यच काढून टाकतो. दोन्ही बाजूंना शुद्ध करून तो दोहोंनाहि परस्पर—पोषक करीत असतो. अशा खऱ्या शुद्ध समन्वयानेंच जगाची खरीखुरी प्रगति होत असते. हें दुष्कर कार्य करणाऱ्या व्यक्तींना आपण अवतारी पुरुष म्हणतों. श्रीकृष्णाच्या वेळीं दर्शनक्षेत्रांत जे निरनिराळे वाद माजले होते, त्या सर्वांना हाताशीं धरून, त्या प्रत्येकाची कदर करून, श्रीकृष्णानें जीवनक्षेत्रांत त्यांचा समन्वय केला. ब्रह्मविद्या आणि योगशास्त्र या दोहोंचें सहकार्य साधून श्रीकृष्णानें गीतेच्या द्वारें मनुष्य—जातीला जीवनयोग अर्पण केला.

## द्वैताची अद्वैतांत परिणति

महात्मा गांधींनीं देखील व्यक्ति आणि समाज हें द्वैत स्वतःच्या जीवनांत आणि स्वतःच्या साधनेंत मोडून टाकलें. सत्याग्रह ही खरोखर व्यक्तिवादाची परिसीमा आहे. 'मला जें पटलें त्याला मी चिकटून राहणार, त्याचाच आग्रह धरणार. हा आग्रह मला कोठेंहि घेऊन जावो, जगाच्या दृष्टीनें तो माझें वाटोळें करो, पण मीं माझा आग्रह सोडणार नाहीं. माझी जर चूक होत असेल तर माझ्या या शुद्ध निष्ठा—प्रेरित आग्रहानेंच ती मला दिसून येणार आहे. आणि माझी चूक सुधारण्याची शक्ति देखील मला माझा आग्रहच मिळवून देणार आहे.' अश्या जिवंत निष्ठेलाच गांधीजी 'आग्रह' म्हणतात. जी निष्ठा जीवन—व्यापी होत नाहीं, कार्यप्रवण असत नाहीं, ती निष्ठा जिवंत नव्हे; ती मृत असेल किंवा मेंगी असेल.

इंग्रजींत ज्याप्रमाणें कायद्याचें एक तत्त्व आहे कीं 'Right wrongs no man', त्याचप्रमाणें गांधीजींचें तत्त्वज्ञान सांगतें कीं सत्याग्रहाचें तत्त्व परमपावन आहे. त्यानें कुणाचेंच आत्यंतिक नुकसान होत नाहीं. सत्याग्रहाशीं ज्यांचा ज्यांचा संबंध येतो, त्या सर्वांना त्यांच्या त्यांच्या मगदुराप्रमाणें तें उन्नतच करतें.

पण या सत्याग्रहाचें अनुपान गांधीजींनीं फारच कडक सांगितलें आहे. व्यक्तीनें स्वतःचा अहंकार, स्वतःचा लोभ आणि स्वतःची भोगैश्वर्याची लालसा या वस्तू सोडून दिल्या पाहिजेत.

आसुरी संपत्तीचे लोक म्हणतात कीं भोग आणि ऐश्वर्य यांतच तर मनुष्याचें व्यक्तित्व सांठविलेलें आहे. भोगलालसा सोडून दिली, अहंकार टाकून दिला आणि अंधळ्या लोभाला तिलांजलि दिली, तर मग जगावयाचें कशासाठीं? जीवनांत आनंद उरलाच कोणता?

गांधीजी म्हणतात, "भोगलालसा, अधिकारलालसा, अहंकार आणि मद या गोष्टी व्यक्तित्वाचा आत्मा नसून त्यावर चढलेला गंज आहेत. त्यांना रोग किंवा विकृति म्हणतां येईल" जगांत जर खराखुरा आनंद असेल तर भोगैश्वर्यामुळें येणारी संकुचितता आणि द्वैत दूर करून प्रेमयुक्त सेवेच्या द्वारा सर्वांशीं ऐक्य अनुभवणें यांतच तो आहे. आत्मौपम्यानें मनुष्य सेवा करावयाला प्रवृत्त होतो. शुद्ध सेवा करतां करतां भोगैश्वर्याची लालसा क्षीण होते आणि सरतेशेवटीं आत्मौपम्याची परिणति आत्मैक्यांत होते. व असें झालें म्हणजे व्यक्ति आणि समाज हें द्वैतच नष्ट होतें.








## साधनेच्या द्वारें अद्वैतसाधन

व्यक्तीला ज्याप्रमाणें गांधीजींनीं साधना सांगितली कीं भोगलालसा सोडा, अहंकार आणि स्वार्थ सोडा, त्याचप्रमाणें त्यांनीं समाजालाहि फार मोठी साधना सांगितली आहे.

समाजानें अधिकारलालसा सोडली पाहिजे, आपपरभाव सोडला पाहिजे, उचनीचभावाला तिलांजलि दिली पाहिजे. एक म्हण अशी आहे कीं, व्यक्तीला Conscience म्हणजे धर्मबुद्धि असूं शकते, समाजाला ती प्रायः नसते. आपला सर्व प्रयत्न समाजाचें शुद्धीकरण करून, अर्थात् समाजांत धर्म–दृष्टि जागृत करून अथवा खरें म्हणावयाचें म्हणजे उत्पन्न करून व्यक्ति आणि समाज यांच्यामधील स्वाभाविक असलेला विरोध नष्ट करावयाचा हा आहे.

यासाठीं महात्माजींनीं प्रथम समाजावर परक्यांकडून होणाऱ्या अन्यायाविरुद्ध लढण्यास सुरुवात केली आणि समाजाला त्यांची ती सेवा पटूं लागतांच त्यांनीं समाजाचें लक्ष्य तो स्वतः करीत असलेल्या अन्यायाकडे खेंचलें. आणि समाजाला झपाट्यानें आत्मशुद्धि करण्यास त्यांनीं उद्युक्त केलें.

शुद्ध समाज आणि शुद्ध व्यक्ति यांच्यामध्यें सिंधु–बिंदूंचें अद्वैत असूं शकतें. दोहोंमध्यें येणारी विकृति कायम ठेवून हें अद्वैत साधणें शक्य नाहीं. व्यक्ती जश्या आहेत तश्या घेऊन आणि समाज जसा आहे तसा त्याला स्वीकारून गांधीजींनीं दोहोंमधील अशुद्धि दूर करण्याचे भगीरथ प्रयत्न केले. पाहिली गोष्ट म्हणजे व्यक्ति आणि समाज या दोहोंना शुद्ध करणें शक्य आहे ही जुनी श्रद्धा त्यांनीं पुनः जागृत केली.

हल्लींचें युग ज्ञानप्रसाराच आणि विज्ञानमूलक संघटनेचें आहे, साधनेचें नाहीं. गांधीजींनीं व्यक्तीला आणि समाजाला साधनाक्रम लावून देण्याचा प्रयत्न केला. स्वराज्यप्राप्तीची चळवळ त्यांनाच चालवावी लागल्यामुळें आणि त्या स्वराज्यप्राप्ती-बरोबर उत्पन्न झालेलें हालाहल त्यांनाच पचवावें लागल्यामुळें त्यांना त्यांचें मुख्य जीवनकार्य फक्त सुरूं करून सोडून द्यावें लागलें.

## नवीन समाजरचनेचा महान् प्रयोग

व्यक्तींमधील असामाजिक वृत्तींवर नियंत्रण घालण्याचें काम प्रथम कुटुंबसंस्थेनें केलें. रक्ताचा संबंध आणि विवाहाचा संबंध या दोन जबरदस्त आकर्षणांच्या जोरावर हें काम साधूं शकलें. कुटुंब ही जवळजवळ ईश्वरनिर्मित संस्था आहे असें आपणांला वाटतें याचें कारण हेंच आहे. ज्यांचा ज्यांचा म्हणून रक्ताचा संबंध येऊं शकतो, अशा लोकांचें संघटन म्हणजे जातिसंघटन. या संस्थेनें देखील व्यक्ती आणि समाज यांच्यामधील विरोध दूर करण्याचा बराचसा सफळ प्रयत्न केला आहे. पण ही संस्था आजच्या काळांत अत्यंत संकुचित ठरते आणि मनुष्याला पूर्णपणें सामाजिक बनवीत नाहीं. जगांतील सर्व धर्मसंस्थापकांनीं जातिसंस्थेला विरोधच केला आहे. माणसांमाणसांमधील रक्ताचा संबंध आणि यौन संबंध यांच्या बाहेर जाऊन केवळ आत्मिक संबंध स्थापन करणारी संस्था म्हणजे आश्रमसंस्था होय. या संस्थेमार्फत पूर्वींच्या ऋषि–मुनींनीं शिक्षणाचें तसेंच संस्कृतिविस्ताराचें काम केलें होतें; पण गांधीजींनीं सत्याग्रहाश्रमाची स्थापना करून जातिभेद, धर्मभेद, पेशाभेद, स्त्रीपुरुषभेद इत्यादि सर्व प्रकारचे भेद गौण करून एक नवीन समाज–रचना स्थापन करण्याचा प्रयत्न केला. या आश्रमांत त्यांनीं माणसांमाणसांमधील उच्चनीचभाव वितळवून टाकणारें रसायन तयार केलें आणि व्यक्तींतील दोष दूर करून आदर्श समाजसेवक तयार करण्याचा प्रयत्न केला. आणि समाजानें देखील स्वतःचे दोष कसे दूर करावे याचें उदाहरण घालून दिलें.

गांधीजींचा हा प्रयोग प्रथम दक्षिण आफ्रिकेंत आणि नंतर साबरमतीला कांहीं वर्षें चालला. या प्रयोगाला दोन तपांचा अवधि देखील मिळाला नाहीं. त्यामुळें गांधीजींचे प्रयत्न अर्ध्यावरच राहिले. लोकांकडून मिळणाऱ्या दानावर संस्था चालत राहावी हें त्यांना मान्य नव्हतें. प्रारंभीं जरी दान घ्यावें लागलें तरी शक्य तितक्या लवकर आश्रमानें स्वावलंबी व्हावें असा त्यांचा पहिल्यापासून कटाक्ष होता. नवजीवन छापखाना, त्यांत छापलीं जाणारीं वर्तमानपत्रें आणि नवजीवन–प्रकाशन–

मंदिराचीं पुस्तकें हें एक उत्पन्नाचें साधन होतेंच; पण त्याचा उपयोग त्यांनीं आश्रमासाठीं केला नाहीं. आश्रमांतील शाळा, खादी–कार्य, दुग्धालय, चर्मालय, सरंजाम–कार्यालय, शेती, कागदाचा कारखाना, मधुमक्षिकापालन, तेलघाणीचा कारखाना, कुंभार–काम, इत्यादि लहान–मोठ्या ग्रामोद्योगांच्या साहाय्यानें आश्रम स्वावलंबी व्हावा आणि त्याबरोबर अहिंसक समाजाची स्थापना करण्याला मदत व्हावी अशी त्यांची अपेक्षा होती.

ब्रह्मचर्य आणि संयमी गृहस्थाश्रम हा या आश्रमाचा पाया होता. जातिभेद आणि धर्मभेद विसरून जाऊन विशाल समाज स्थापन करण्याचा फारच मोठा प्रयत्न आश्रमाच्या मार्फत गांधीजींनीं सुरू केला होता आणि त्याचा पाया म्हणून आश्रमाच्या व्रतांत त्यांनीं सर्व--धर्म--समभावाला स्थान दिलें होतें.

## समाजाला साक्ष ठेवून केलेली साधना

गांधीजींना हें सर्व करतां आलें याचें मुख्य कारण त्यांच्या मनाची विशिष्ट ठेवण होय. आणि तीच गोष्ट मला आज मुख्यत्वें सांगावयाची आहे. अगदीं लहानपणापासून गांधींनीं जी जी म्हणून साधना केली ती ती त्यांनीं समाजाला साक्षी ठेवूनच केली आहे. लहानपणीं जो कौटुम्बिक भाव त्यांच्यांत प्रकट झाला होता, तो त्यांनीं एका मुसलमानाला आपला जविश्वकंठश्च स्नेही बनवून वाढविला. त्याच्या शिकवणीनें ते मांस खाऊं लागले. मांसाहाराचे पैसे चुकविण्यासाठीं त्यांनीं घरींच चोरी केली! पण पुढें पश्चात्ताप होऊन त्यांनीं वाडिलांजवळ सर्व कांहीं कबूल केलें. स्वतःचें जीवन त्यांनीं ताबडतोब शुद्ध केलें, पण त्या मुसलमानाचा संबंध सोडला नाहीं. तोच मनुष्य पुढें दाक्षिण आफ्रिकेंत त्यांचा पाहुणा म्हणून राहिला आणि गांधीजी दुपारीं कोर्टांत गेले म्हणजे घरांत वेश्येला आणूं लागला! मग मात्र गांधीजींनीं त्याला गचांडी दिली.

घरांत तऱ्हेतऱ्हेच्या पाहुण्यांना आणावयाचें, जे येतील त्यांच्या जीवनांत प्रवेश करावयाचा, त्यांचेशीं होतां होईल तितका कौटुम्बिक भाव स्थापन करावयाचा आणि घरांत जी कांहीं साधनसंपत्ति असेल, ती सर्वांशीं संविभाग करून उपभोगावयाची हा त्यांचा स्वभावच होऊन गेला होता; यांतूनच पुढें एक आश्रम स्थापन करण्याची वृत्ति बळावली.

गांधीजी दाक्षिण आफ्रिकेंतच प्रथम जेलमध्यें गेले. त्यांना लहान लहान मुदतीच्याच शिक्षा होत; पण तेथें त्यांनीं अतोनात कष्ट सहन केले. येथें आपण जेल किंवा तुरुंग या संस्थेचा थोडासा इतिहास तपासला पाहिजे.

गुन्हेगाराला समाजापासून वेगळा केला पाहिजे, तो गुन्हे करूंच शकणार नाहीं अश्या स्थितींत त्याला ठेवलें पाहिजे, ज्या हातानें चोरी केली तो हातच कापून टाकावा, ज्यानें एकाद्याचा वध केला त्याला सुळावर चढवावें किंवा त्याचा गळा दोरीनें आंवळून त्याचा प्राण घ्यावा, असल्या सुडाच्या कल्पना जगांत सर्वत्र पसरलेल्या होत्या. जेलजीवन ही त्याहून थोडी सुधारलेली कल्पना आहे. जेलमध्यें खाण्यापिण्याचे, कपड्यालत्त्याचे आणि राहण्याकरण्याचे जे हाल केले जातात ते म्हणजे मठांत राहून प्रायश्चित्त करणाऱ्या आणि अिंद्रियदमन साधणाऱ्या मठस्थांकडून उसनी घेतलेली कल्पना होय. मठांतील संन्यासी स्वेच्छेनें जी साधना करतात तीच साधना गुन्हेगारांकडून जबरदस्तीनें करवून घेऊन त्यांना निष्पाप करण्याचा वेडगळ प्रयत्न म्हणजे जेलजीवन होय.

या जेलजीवनांतील जबरदस्ती जर काढून टाकली आणि मानवी आरोग्याला अत्यंत आवश्यक असें जें श्रमजीवन तें जर अंगवळणीं पाडून घेतलें, तर समाजाची तपश्चर्या वाढेल आणि समाजांत एक नवीन जोम येईल ही गोष्ट गांधीजींच्या लक्षांत आली.

गांधींनीं फीनिक्स येथें जमीन विकत घेऊन तीवर एक वसाहत केली. त्यांनीं श्रमजीवनाचा सर्वसामान्य नियम केला, स्वतः मीठ सोडलें आणि लागलेंच पुष्कळांना तसें करण्यास उत्तेजन दिलें. प्राण्यांपासून उत्पन्न होणाऱ्या दूध, तूप इत्यादि वतूर अंड्यांप्रमाणेंच त्याज्य आहेत ही कल्पना मनावर ठसतांच त्यांनीं तिचाहि अंमल सुरू केला. जें कांहीं स्वतःला सुचेल तें बरोबरच्या सर्व लोकांपुढें तें मांडावयाचें. स्वतः केलेल्या संकल्पाच्या आणि घेतलेल्या व्रताच्या बाबतींत देखील सर्व समाजाला साक्षी ठेवणें आणि मोठ्या नम्र आपुलकीनें समाजाचा










आशीर्वाद मागणें हा एक त्यांचा स्वभावच होऊन बसला.

## समाजाशीं तादात्म्य

समाजसेवा करणारे लोक पुष्कळ असतात. त्यांपैकीं कित्येक विरंगुळा म्हणून किंवा मधुर व्यायाम म्हणून थोडी–बहुत समाजसेवा करतात; पण गांधीजींचें तसें नव्हतें. त्यांनीं जी समाजसेवा हातीं घेतली ती जीवनकार्य म्हणून घेतली. युद्धांत जखमी लोकांना मदत करणें, सांसर्गिक रोगांची सांथ आली असतां धडाडीनें शुश्रूषापथकें उभारणें, जुलमी कायद्यांचा भंग करण्यासाठीं हजारों लोकांना कूच करीत घेऊन जाणें अशांसारख्या प्रचंड कामांची दीक्षा घेऊन त्यांनीं समाजसेवा चालविली; आणि तींत सुशिक्षित–अशिक्षित, स्त्री–पुरुष, युवक–युवती आणि लहान मुलें यांपर्यंत सर्वांना त्यांनीं खेंचलें! येवढी जबाबदारीची कामगिरी वर्षानुवर्षें चालवावयाची तर त्याला असाधारण शक्ति आणि असाधारण एकाग्रता पाहिजेत व त्या मिळविण्यासाठीं ब्रह्मचर्य आवश्यक आहे, या गोष्टींचा गांधीजींना साक्षात्कार झाला. व्रत घेतांच गांधींनीं तें सर्वत्र जाहीर केलें. यांत प्रचारकी वृत्ति नसून समाजाशीं त्यांनीं स्थापन केलेलें तादात्म्य होतें. येथें देखील आपल्या कार्यांतील साथीदारांना आमंत्रण देण्यास ते चुकले नाहींत.

लोकांचें सुखदुःख तें आपलेंच सुखदुःख अशा तऱ्हेचा अभेद त्यांच्या वृत्तींत स्वाभाविकच असल्यामुळें व्यक्तिगत जीवन निराळें आणि सामाजिक जीवन निराळें असें द्वैत त्यांच्याजवळ नव्हतें. मोटारीचा प्रवास असो किंवा आश्रमांत पाहुण्यांची सोय करावयाची असो, स्वतः अडचण सोसून अधिकाधिक लोकांची सोय केल्यावांचून त्यांना संतोषच होत नसे. सेवाग्राममध्यें एक खरजुला मनुष्य त्यांच्याकडे औषध मागावयास आला. त्यांनीं त्याला तपासून इलाज सांगितला आणि शेवटीं ते म्हणाले कीं जुलाब घेऊन पोट तर साफ करच, पण तुला एकान्तांत नग्नस्नान करून सगळें शरीर स्वच्छ केलें पाहिजे.

इतक्यांत त्यांना आठवलें कीं या दरिद्री माणसाजवळ एकान्त कोठला आणि आंघोळीची सोय तरी कोठून असणार! तेव्हां ते लगेच त्याला म्हणाले, "या माझ्या खोलींत हें आंघोळीचें टब आहे. तुला त्यांत गरम पाणी भरून देऊं, त्यांत बसून आंघोळ कर, शरीर चोळ, खपल्या काढ आणि तयार हो. मग तुला औषध लावूं." इतकें सांगून आश्रमांतील कुणालासें त्यांनीं सांगितलें कीं याची आंघोळ झाल्यानंतर माझें टब उत्तम धुऊन काढा (disinfect करा) आणि माझ्या आंघोळीचें पाणी त्यांत काढून ठेवा. रोगी आणि त्यांत भणंग भिकारी असा विचार त्यांच्या मनांत सुद्धां आला नाहीं.

## बोधिसत्त्वाची वृत्ति

अशा उदाहरणांची जर माळ लावली तर ती संपावयाचीच नाहीं. जें जें करावयाचें तें सर्व उघडपणें करावयाचें, समाजाला साक्षी ठेवून करावयाचें, समाजाला त्यांत शक्य तितकें भागीदार करावयाचें, समाजाला त्याचा फायदा मिळवून द्यावयाचा, असा गांधीजींचा अगदीं पहिल्यापासून कटाक्ष असे. मोक्षाची साधना देखील समाजाला न विसरतां करावयाची ही बोधिसत्त्वाची वृत्ति गांधींमध्यें पहिल्यापासूनच दिसत होती आणि म्हणूनच व्यक्ति श्रेष्ठ कीं समाज श्रेष्ठ अशी दुविधा त्यांच्या मनाला कधींहि शिवली नाहीं. आत्मशुद्धि आणि समाजशुद्धि ही त्यांची विराट् साधना होती. समाजानें त्यांची साधना जितकी पचविली तितकी समाजाची प्रगति झाली आणि जेव्हां जेव्हां समाजानें स्वार्थानें, आळसानें किंवा शिथिलतेनें ती साधना सोडली तेव्हां तेव्हां समाजावर आणि समाजांतील व्यक्तींवर अनर्थांची परंपरा कोसळली.

यासाठीं आपल्या समाजानें आणि समाजाच्या लहानथोर नेत्यांनीं गांधींची ही अभिनव साधना–व्यष्टिसमष्टींचा सुभग समन्वय करणारी साधना–समजून घेऊन तिचा स्वीकार केला पाहिजे. आजच्या काळीं जगाला आणि स्वतःला तारण्याचा दुसरा मार्ग नाहीं.

---










डॉ. अबीद हुसेन

# ‘ हिंदुस्थानचा आत्मा ’

[ दिल्ली येथें नुकत्याच सुरू झालेल्या ‘ नई रोशनी ’ या उर्दू साप्ताहिकाचे संपादक डॉ. अबीद हुसेन यांनीं त्या साप्ताहिकांत लिहिलेल्या एका छोट्या लेखाचा खालील लेख अनुवाद आहे. गांधीजींचें ध्येय काय होतें, हिंदुस्थानच्या नैतिक व सांस्कृतिक परंपरेचे ते कसे प्रतीक होते, याचें दिग्दर्शन संक्षेपानें पण अत्यंत सहृदयतेनें लेखकानें केलें आहे.—का. सं. ]

सेवाग्रामला मार्चच्या दुसऱ्या आठवड्यांत विधायक कार्यकर्त्यांची एक सभा भरली होती. समेला हजारावर लोक आले होते. त्यांत मंत्री होते, राजकारणी पुढारी होते, सामाजिक व शैक्षणिक क्षेत्रांतील कार्यकर्ते होते व पत्रपंडित होते. इतरहि कित्येक स्वार्थत्यागी आणि प्रामाणिक कार्यकर्ते तेथें उपस्थित होते, जे देशांत फारसे प्रसिद्ध नसले तरी आपापल्या कार्यक्षेत्रांत मनोभावानें सेवा करून लोकांच्या आदरास आणि भक्तीस पात्र झालेले आहेत. हें संमिश्र संमेलन मजेदार होतें यांत शंका नाहीं. बहुतेक सभासदांचे पोषाख खादीचे असले तरी त्या एकमेकांमध्यें बाह्य वेषांत किती फरक दिसत होता! जमलेल्यांत हिंदू होते, मुसलमान होते, शीख होते, खिस्ती होते, पार्शी होते व कांहीं धर्म न मानणारेहि होते. हिंदुस्थानांतील सर्व भाषांतून तेथें बोलणें ऐकूं येत होतें. उपस्थित सदस्यांमध्यें मवाळ, जहाल, राष्ट्रवादी, समाजवादी, प्रचंड औद्योगीकरणाचे पुरस्कर्ते, ग्रामोद्योग आणि हस्त-व्यवसाय यांचे कैवारी, केन्द्रीकरणवादी, विकेन्द्रीकरण—वादी, असे सर्व प्रकारचे लोक होते!

हे सर्व भिन्न भिन्न वृत्तींचे लोक देशाच्या निरनिराळ्या भागांतून या एका लहानशा खेडेगांवांत जे एकत्र आले ते कोणत्या एकाच समान प्रेरणेनें आले ? हें आश्चर्य एका महान् आध्यात्मिक विभूतीच्या किमयेनें घडवून आणलें होतें. जमलेल्यांपैकीं प्रत्येकावर आपापल्या परीनें गांधीजींच्या जीवनाची व विचारांची छाप पडलेली होती. पुष्कळजण त्यांचीच धार्मिक विचारसरणी अक्षरशः शिरसावंद्य मानीत होते, तर कित्येक त्या विचारसरणीचा अर्थ आपल्या बुद्धीनें लावीत होते. कित्येकांना गांधीजींच्या प्रेरणेमुळें आपापल्या धर्माचें हृद्गत अधिक सखोलपणें कळायला व त्याप्रमाणें तें आचरायला स्फूर्ति मिळाली होती, तर दुसरे असेहि कित्येक होते कीं त्यांना धर्माविषयीं कांहीं विधिनिषेध नसला तरी त्यांच्या अंतःकरणांत स्वबांधवांच्या सेवेविषयीं जाज्वल्य तळमळ होती. गांधीजींनीं सत्याग्रही लोकांकरतां जीं व्रतें घालून दिलीं होतीं तीं सर्वच्या सर्व कांटेकोरपणानें पाळणारेहि कांहीं लोक उपस्थित होते, तर उपस्थितांपैकीं कांहींजण त्या व्रतांमधील केवळ कांहीं व्रतांचेंच पालन करणारे होते. ज्यांना या व्रतांची आवश्यकता वाटत नव्हती असेहि कांहींजण होतेच. कांहींच्या मतें गांधीजी हिंदुधर्मातील महान् सुधारक होते, तर कांहींच्या मतें ते मानवतेच्या नवीन धर्माचे महान् संस्थापक होते. कांहींजणांच्या मतें गांधीजी हे आधुनिक बुद्धिवादी, पुरोगामी व उदार विचाराचे लोकसत्तावादी ( democrat ) असून त्यांनीं केवळ धार्मिक परिभाषेच्या द्वारा बौद्धिक भूमिकेवरून लोकशाहीचाच पुरस्कार केलेला होता. उपस्थितांमध्यें असे मतभेद कितीहि असले तरी जमलेल्या सर्व लोकांचाच गांधीजींच्या तत्त्वप्रणालींतील मूलभूत अशा नैतिक ध्येयावर निर्भेळ विश्वास होता आणि यामुळेंच ही सर्व मंडळी ऐक्याच्या आणि बंधुत्वाच्या भावनेनें एकाच कुटुंबांतील कुटुंबीयांप्रमाणें एकत्र बांधली गेली होती. सर्वांची अशी

श्रद्धा होती कीं मानव तेवढा एकच असून सर्व मानवांना जाति–धर्म–वर्ण–निरपेक्ष असे समान हक्क आहेत. एकमेकांची पिळणूक आणि गळेकापू स्पर्धा ह्यांवर समाजव्यवस्था न आधारतां ती सहकार्य आणि न्याय यांवर आधारली पाहिजे, तंटयाबखेडयांचा निकाल युद्ध करून न लावतां समंजसपणें विचारविनिमयानें लावला पाहिजे, राजकारणाची नीतिमत्तेपासून फारकत करतां कामा नये, 'दुष्ट' साधनांचा अवलंब करून 'सुष्ट' साध्यें कधींच साधणें शक्य नाहीं, स्वदेशाविषयींचा त्याचप्रमाणें स्वबांधवांचाहि अभिमान बाळगणें हें आपलें आद्य कर्तव्य असलें तरी त्याचें पर्यवसान दुरभिमान आणि इतर लोकांचा द्वेष करण्यांत होतां कामा नये, स्वदेशाच्या रक्षणाला उभें ठाकणें हें जरी प्रत्येकाचें महत्कर्तव्य असलें तरी त्यायोगानें सत्य आणि न्याय यांना हरताळ फांसला जाऊं नये—या सर्व बाबतींत सर्वांची एकवाक्यता होती. प्रत्येक व्यक्तीचें ध्येय आपापल्या शक्तींचा संपूर्ण विकास करून त्या शक्ती समाजाच्या सेवेकरितां वेंचणें हें असून, आपापलें काम अशा रीतीनें करीत असतांना जें फळ—कीर्ति, पारितोषिक वगैरे—मिळेल तें त्या कार्याला आवश्यक नसून तें केवळ गौण आणि आनुषंगिक होय अशीच सर्वांची विचारसरणी होती.

या सर्व गोष्टींचें निरीक्षण करीत असतां मी आपल्या मनाशींच विचक्षणा करूं लागलों : "किती विलक्षण गोष्ट आहे ही ! गेली दीडशें वर्षे जो देश पारतंत्र्याच्या शृंखलांत जखडला गेला असून ज्याचा सारखा नैतिक ऱ्हास व तेजोभंग होत आला आहे, ज्या देशांतील लोकांमध्यें जातीय, प्रांतीय त्याचप्रमाणें पंथीय वैमनस्यें बिंबविण्याचा सारखा प्रयत्न चालू आहे, त्या देशांतील भिन्नभिन्न जातींना, वर्गांना व प्रांतांना ज्या विभूतीनें एकत्र गोंवून एकजीव केलें, त्यांचीं अंतःकरणें ज्या विभूतीनें सत्य, न्याय, स्वातंत्र्य आणि मानवी मूल्यांबद्दलची चाड यांविषयींच्या जाज्वल्य भावनेनें प्रदीप्त केलीं, त्या विभूतीची खरोखरच कमाल असली पाहिजे ! त्या माणसामध्यें काय बरें जादू असावी ?". मला एकदम उत्तर सुचलें : "ज्याला तूं गांधीजी म्हणून संबोधतोस तो 'भारताचा आत्मा' आहे ! आतांपर्यंत शतकानुशतकें जुलूम व अनियंत्रित दडपशाही यांनीं दडपला गेलेला तो 'आत्मा' आतां शेवटीं बंधनांपासून मुक्त होऊन या दुबळ्या (frail) दिसणाऱ्या वामनमूर्तीच्या रूपानें अवतरला होता. तोच 'आत्मा' आज देहबंधांतून निसटून सबंध समाजाच्या जीवनांत—विशेषतः या हजार सभासदांच्या संमेलनांत—भरून राहिलेला आहे ! या 'आत्म्या'ला विशिष्ट स्थळाच्या, काळाच्या, धर्माच्या किंवा राजकीय वा आर्थिक मर्यादा (वा बंधनें) नाहींत. उपरिनिर्दिष्ट 'नीतितत्त्वांविषयीं निष्ठा बाळगा आणि तीं तत्त्वें आपल्या आचरणांत आणा' येवढीच ह्या 'आत्म्या'ची प्रत्येक हिंदवासीयाजवळ कळकळीची मागणी आहे. 'सभ्यता, संस्कृति आणि मानव्य यांच्याशीं एकनिष्ठ रहा; मग धार्मिक, राजकीय आणि आर्थिक बाबतींत तुम्हांला आचारांचें आणि विचारांचें हवें तें पूर्ण स्वातंत्र्य आहे' असें ह्या 'आत्म्या'चें सांगणें आहे."

गेल्या वर्षी ज्या भयंकर घटना घडून आल्या व विशेषतः ३० जानेवारीला घडून आलेल्या ज्या घटनेनें सगळें जग हादरून गेलें, त्या सर्व घटनांचा संमेलनाला आलेल्या कार्यकर्त्यांच्या समूहावर—या 'हिंदुस्थानच्या आत्म्यावर'—काय परिणाम झाला आहे हें मला समजून घ्यावयाचें होतें. गांधीजींच्या कार्याप्रीत्यर्थ ज्यांनीं आपणां स्वतःस संपूर्णपणें वाहून घेतलें आहे, ते हे लोक आपल्या नेत्याच्या—गुरूच्या—निधनामुळें झालेलें दुःख कसें प्रदर्शित करणार आहेत, आपल्या गुरूची तत्त्वप्रणाली कशी जिवंत ठेवणार आहेत, आपल्या नेत्याचें कार्य पुढें कसें चालविणार आहेत, हें जाणण्याची मला फार उत्सुकता होती. म्हणून मी त्या सर्वांचें बारकाईनें निरीक्षण करीत होतों. त्यांचे डोळे, त्यांचे चेहरे, त्यांचीं बोलणीं या सर्वांवरून त्यांना किती भयंकर दुःख आणि यातना होत आहेत हें मला स्पष्ट दिसत होतें. परंतु नवल असें कीं, सूडबुद्धि, क्रोध, निरुत्साह किंवा निराशा यांचा त्यांच्या ठिकाणीं मागमूसहि दिसून आला नाहीं. गांधीजींचें कार्य पुढें सतत चालू ठेवून त्यांचें नांव जिवंत ठेवण्याचा सर्वांनीं निर्धार केला होता. परंतु गांधीजींच्या नांवाचे देवाप्रमाणें देव्हारे माजवायची किंवा त्यांच्या कार्याला








## ' हिंदुस्थानचा आत्मा '

एकाद्या जखडबंद धार्मिक पंथाचें स्वरूप द्यायची कोणाचीहि इच्छा दिसली नाहीं. केवळ नांवाचा 'उदो उदो' करण्यांत काय धोके असतात ह्या गोष्टीची सर्वांना तीव्र जाणीव होती. याची खूण म्हणजे 'गांधीसेवासंघ' हें नांव बदलून त्याऐवजीं 'सर्वोदयसमाज' हें नांव त्यांनीं ठेवलें ही होय. सर्वोदयसमाज ह्याचा अर्थ : ज्यानें सर्वांच्या—प्रत्येक साध्याहि मानवाच्या—कल्याणाप्रीत्यर्थ स्वतःस वाहून घेतलें आहे असा समाज किंवा संघ. सर्वांनीं आपल्या भाषणांतून वारंवार जर कोणत्या एका गोष्टीवर कटाक्षानें भर दिला असेल तर ती गोष्ट ही कीं, गांधीजींचें नांव आणि त्यांचें व्यक्तिमत्त्व हीं वगळून त्यांच्या केवळ तत्त्वांचा विचार व्हावा आणि त्यांच्या तत्त्वप्रणालीला जड यांत्रिक अशा धर्मपंथाचें स्वरूप येऊं देऊं नये. एका महान् सुधारकानें जीं तत्त्वें आचरून दाखविलीं, त्यांचा अर्थ आपापल्या शक्तीनुसार समजून घ्यावा आणि आपापल्या परिस्थितीनुसार त्या तत्त्वांचें आचरण करावें, यावर सर्वांचा कटाक्ष दिसून आला.

अश्या तऱ्हेनें 'हिंदुस्थानचा आत्मा' जिवंत आहे, जागृत आहे, तत्पर आणि कृतिमान् आहे, ह्याचें दर्शन मला घडलें आणि त्याबद्दल मीं परमेश्वराला धन्यवाद दिले. या चैतन्यमय आत्म्याभोंवतीं हल्लीं जातीयता, उपजातीयता, प्रांतीयता, भांडवलशाही, झोटिंगशाही, हिंसा, जडवाद, दहशतवाद आणि यादवी अशा अनेक पापी भुतांखेतांचा गराडा पडला आहे हें कोणीच नाकबूल करणार नाहीं. परंतु ज्याप्रमाणें त्या 'आत्म्या'नें सत्य आणि अहिंसा यांच्या शांत व सोज्ज्वल प्रभावानें ब्रिटिश साम्राज्यवादाचा राक्षस जमीनदोस्त करून टाकला, त्याचप्रमाणें या सर्व भुतांखेतांचा व पिशाच्चांचाहि तो नायनाट करून टाकील अशी आशा बाळगायला हरकत नाहीं.

———

## "मार्गीं तें शिशुचें हताश रडणें"

जें या जीर्ण जगीं असुंदर, तसें जें रुग्ण वा भग्न वा
मार्गीं तें शिशुचें हताश रडणें, तो बैल भारावला, ।
हा पायीं तुडवीत थंड चिखला खेडूत चाले घरा,
हीं दृश्यें बघुनी निळें कमळ हें हो म्लान चित्तांतलें ॥

माती, पाणि, हवा विशुद्ध, गगना, घेऊनि हातामधें
विश्वाची रचना पुन्हां करिन मी, ही भूक आत्म्यास या ।
सोन्याच्या कलशासमान रचुनी पृथ्वीस, तीच्या मधें
ठेवोनी कमळा निळ्या मग सुखें जाईन माझ्या घरा. ॥

—प्रा. ना. पां. गुणे.



अमेरिकन नियतकालिकांतील सुंदर लेख

# गांधीजींच्या मोठेपणाचें रहस्य

[ अमेरिकेंतील चिकॅगो येथें निघणाऱ्या 'ख्रिश्चन सेंचरी' या नियतकालिकाच्या ११-२-४८च्या अंकांत गांधीजींवर आलेला एक संपादकीय लेख 'हरिजन'( २५-७-४८ )मध्यें पुनर्मुद्रित केला होता, त्याचा अनुवाद खालीं दिला आहे. ]

'मानवजातीच्या ललाटीं दुःख लिहून ठेवलें आहे. दुःखभोग हा नित्य सृष्टिनियम आहे. मुलानें जगावें म्हणून आई दुःख भोगीत असते. मृत्यूंतूनच जीवन बाहेर येत असतें. गहूं वाढायचा म्हणजे त्याचा मूळचा जो बीजभूत धान्याचा दाणा तो नष्ट होणार हें ठरलेलेंच. ... जगांतील दुष्टपणाला कारण काय असावें याचा जेव्हां मी बौद्धिक दृष्टया विचार करतों तेव्हां या उपपत्तीशिवाय मला दुसरें कांहीं सुचत नाहीं. यापेक्षां दुसरी उपपत्ति शोधून काढावयाची तर आपण प्रतिपरमेश्वरच बनलें पाहिजे. म्हणून जगांत दुष्टपणालाहि स्थान आहे हें ओळखण्याइतपत लीनता माझ्या ठिकाणीं आहे. परमेश्वराहि अति दीर्घकाल दुःखें सहन करीत असून तो अतिसहिष्णु असला पाहिजे असें मी मानतों, याचें कारण हें कीं तो जगांत दुष्टपणाला राहूं देतो. ... मुलें, तरुण किंवा म्हातारीं माणसें जेव्हां मरतात, तेव्हां आपण व्याकुळ कां म्हणून व्हावें ? ज्यांची आत्म्याच्या अस्तित्वावर श्रद्धा आहे—आणि असा कोण हिंदु, मुसलमान वा पार्शी आहे कीं ज्याची अशी श्रद्धा नाहीं ?—त्यांना हें पटलेलें असतें कीं आत्मा हा अमर आहे.'—गांधीजी.

महात्मा गांधींना एका हिंदु मारेकऱ्याकडून मृत्यु यावा या घटनेनें दुष्टपणाचा जगांत किती प्रभाव आहे याची भयप्रद आठवण होऊन हृदयाचा थरकांप होतो ! गांधीजींनीं दुष्टपणाची परतफेड सुष्टपणानें, शिव्याशापांची परतफेड शुभचिंतनानें व द्वेषाची परतफेड प्रेमानें आपल्या जन्मभर केली. असें करणारा माणूस ह्या शतकांत तरी दुसरा झालेला दिसून येत नाहीं. त्यांनीं निंदकांची कधीं परत निंदा केली नाहीं. जे त्यांचा छळ करीत त्यांचेंहि शुभच व्हावें म्हणून ते प्रार्थना करीत. आपला 'दुसरा गाल' ते सदैव पुढें करीत. आपल्या जीविताच्या रक्षणाकरतां जो कडेकोट बंदोबस्त मोठे लोक साधारणतः आवश्यक मानतात, तो त्यांनीं कधीं ठेवूं दिला नाहीं, कीं आपले प्राण वांचविण्याचा कधीं प्रयत्न केला नाहीं. यांत केवढे धोके आहेत हें त्यांना माहीत नव्हतें असें नाहीं. कारण, त्यांना ठार मारण्याचे प्रयत्न कितीं तरी वेळां झाले ! असें असूनहि ते लोकांत निर्भयपणें वावरत असत आणि कोणीहि भेटायला आला तर त्याला खुशाल भेटत असत ! शेवटीं असेच आपल्या एका दैनिक प्रार्थनासभेला जात असतांना ते मारेकऱ्याच्या गोळीला बळी पडले.

दुष्टपणाला चांगुलपणानें जिंकायचा जर कोणीं प्रयत्न केला असेल तर तो गांधीजींनींच केला असें म्हणावें लागेल. पण शेवटीं त्यांचाच वध झाला आहे !—चांगुलपणाचाच पराजय झाला आहे ! गांधीजींनीं आपले प्राण वांचविण्याचा कधींच प्रयत्न केला नाहीं. शेवटींहि त्यांनीं आपले प्राण वांचविले नाहींत. अखेर अहिंसेचा महर्षि हिंसेला बळी पडला ! सत्याचा कैवारी असत्याच्या, दगलबाजपणाच्या घावाखालीं गारद झाला ! जो आपल्या शत्रूंवराहि प्रेम करीत असे, अशा साधु—पुरुषाचा शत्रूनें शेवटीं घात केला. दुष्टपणानें आपली शर्थ करून दाखविलेली दिसत आहे खरी; पण त्यानें चांगुलपणावर शेवटीं मात केली असें खरोखरींच म्हणतां येईल का ?








# गांधीजींच्या मोठेपणाचें रहस्य

आपल्या हल्लींच्या कालांत गांधीजींयेवढा श्रेष्ठ पुरुष दुसरा झाला नाहीं. त्यांच्या शेजारीं त्यांचे समकालीन रूझवेल्ट, स्टॅलिन, हिट्लर, चर्चिल, फार काय, वुड्रलसन, सन्यत्सेन व लेनिन हे खुजट व खुरटे दिसूं लागतात ! गांधीजींचा मोठेपणा खरोखरी कशांत आहे ? हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळवून द्यायचें श्रेय कोणाहीपेक्षां त्यांनाच अधिक आहे, हें खरें; पण यांतहि त्यांचा खरा मोठेपणा नाहीं. हिंदुस्थानांतील भांडणाऱ्या भिन्नधर्मीय जमातींत त्यांनीं आपल्या 'आत्मबला'नें सलोखा घडवून आणण्याचा आश्चर्यकारक पराक्रम नुकताच करून दाखविला यांत शंका नाहीं; पण याहि गोष्टींत त्यांचा मोठेपणा नाहीं. तो निराळ्याच गोष्टींत आहे. **हल्लींच्या जगांत चाललेला महान् संघर्ष हा खरोखरी राजकारणांतला नसून तो मानवाच्या मनांतील सत् आणि असत् प्रवृत्तींमधील अंतर्गत संघर्ष आहे,** ही गोष्ट त्यांनीं अचूक ओळखली. यांतच त्यांचा मोठेपणा आहे. गांधीजींच्या ह्या अंतर्भेदी दृष्टीमुळें पुष्कळ वेळां त्यांचे राजकारणांतील सहकारी संभ्रान्त होऊन स्मिमित झाले आहेत. "या साधु पुरुषाचा आपणांस कांहीं थांग लागूं शकत नाहीं" अशी कबुली खुद्द नेहरूंनीच आपल्या ग्रंथांतून अनेक वेळां दिली आहे. इतकेंहि असून नेहरूंचें गांधीजींवर किती निःसीम प्रेम होतें ! गांधीजींच्या मार्गदर्शनाला ते किती मान देत असत !

गांधीजींची विचारसरणीच शेवटीं बरोबर होती. त्यांच्या मृत्यूनें देखील हेंच सिद्ध केलें आहे. सर्व राजकीय व्यवहारांची फलनिष्पत्ति कशावर अवलंबून आहे याचें पृथक्करण जर आपण करूं लागलों, तर ती शेवटीं मूळ जो मानसिक वा आध्यात्मिक संघर्ष त्याच्याच निर्णयावर अवलंबून आहे, असें आढळून येईल. या संघर्षांत शेवटची सीमा म्हणजे हृदयस्थ आध्यात्मिक अशी जी आंतरिक सीमा ती होय. त्या आंतरिक सीमेवरील शेवटच्या बालेकिल्ल्यापर्यंत आज आधुनिक मानव हटविला जात आहे. कोणाचाहि मुलाहिजा न राखतां आपल्या हिंदुबांधवांना गांधीजींनीं अगदीं निर्दयपणें याच सीमेपर्यंत ओढून आणलें आणि त्यामुळेंच त्यांचा खून झाला. जातीय यादवीमुळें हिंदुस्थाननें आपला नाश ओढवून घ्यावा आणि आपण कांहींहि न करतां तें स्वस्थ पाहत बसावें हें त्यांना सहन होईना आणि म्हणून त्यांनीं आपला शेवटचा उपवास आरंभिला होता. त्यांनीं हें उपवासाचें खडतर दिव्य अंगीकारिलें असतां सर्व पक्षांच्या लोकांनीं त्यांच्याकडे येऊन जेव्हां, 'आपण कोणत्या अटींवर आपला उपवास सोडणार ?' असें त्यांना विचारलें, तेव्हां त्यांनीं आपल्या ज्या शर्ती सांगितल्या त्या त्यांनीं फक्त स्वधर्मीयांवरच लादल्या. मुसलमान किंवा शीख यांच्याकडून त्यांनीं कांहींहि मागितलें नाहीं; आपलें मागणें त्यांनीं हिंदूंकडूनच मागितलें.

त्याचा परिणाम असा झाला कीं गांधीजींच्यामुळें हिंदू लोक वचनबद्ध होऊन दुःखाच्या दिव्यांतून जायला आणि अपमान सहन करायला तयार झाले. ज्या लक्षावधि मुसलमानांना आपलीं घरेंदारें सोडून जावें लागलें होतें, त्यांना पाकिस्तानांतून परत हिंदुस्थानांत स्वगृहीं बोलावण्याचें हिंदूंनीं कबूल केलें. खुद्द हिंदूंवरहि मुसलमानांकडून भयंकर अत्याचार झालेले होते; तरी देखील हिंदुस्थानांत परत यावयास तयार असलेल्या मुसलमानांना सुरक्षितपणें आणावयास हिंदू तयार झाले. मशिदी उघडून त्या मुसलमानांना परत कराव्या आणि सामाजिक व आर्थिक वैषम्ययुक्त पंक्तिप्रपंच थांबवावा असें ठरलें. एका पिढीपूर्वीं जेव्हां जातीय वैमनस्य नव्हतें त्या वेळीं जसें सणांच्या दिवशीं हिंदू लोक आपल्या मुसलमान मित्रांना भेटून मिठाई देत असत, तसेंच आतांहि करावयाचें हिंदूंनीं आपल्या प्रतिज्ञापालनार्थ व प्रायश्चित्तार्थ ठरविलें. या सर्व गोष्टींवरहि शेवटची कडी म्हणजे गांधीजींनीं असा आग्रह धरला होता कीं हिंदुस्थाननें पाकिस्तानचे अडकवून ठेवलेले ५० कोट रुपये पाकिस्तानला परत करावे. हे पैसे अडकवून ठेवायला हिंदुस्थानला पुरेसें कारणहि होतें. हे पैसे काश्मीरवरील मुसलमानांच्या हल्ल्याला मदत करण्याप्रीत्यर्थ खर्च होणार असें त्यांना सकारण वाटत होतें. तरीहि त्यांनीं गांधीजींच्या आग्रहामुळें हे पैसेहि पाकिस्तानला परत केले !

या सगळ्या गोष्टींचा अर्थ खरोखरी काय आहे याची अमेरिकन लोकांना अंधुक तरी कल्पना येणें शक्य आहे का ? कल्पना करा कीं, अमेरिकेमधील








ज्या जपानी लोकांच्या जमिनी काढून घेतल्या गेल्या त्या जपान्यांची आपले कॅलिफोर्निआंतील जमीनदार 'क्षमस्व' म्हणून आज माफी मागत आहेत! कल्पना करा कीं, युद्धाला प्रामाणिक विरोध असल्यामुळें जे आज कैदेंत आहेत त्यांना निर्दोष ठरवून सोडून देण्याकरितां खुद्द अमेरिकन सैनिकच प्रयत्न करीत आहेत! कल्पना करा कीं, गोऱ्या लोकांच्या प्रॅाटेस्टंट धर्मसंस्था नीग्रोंना आपले सभासद करून घेत आहेत किंवा रोमन कॅथॉलिक लोक कम्युनिस्टांना आपले दोस्त मानायला तयार आहेत! घटकाभर गृहीत धरा कीं गेल्या युद्धांत आपण जेवढे जर्मन लोक ठार मारले त्याच्या दुप्पट अमेरिकन जर्मनांनीं मारले आहेत; नंतर कल्पना करा कीं असें असूनहि आजच्या सर्व निराश्रित जर्मनांना बोलावून आपलें अमेरिकन सरकार मनांत कांहींहि किंतु न ठेवतां त्यांची सोय लावीत आहे! या सर्व गोष्टी जर आपण प्रत्यक्षांत घडवून आणूं शकलों तरच हिंदूंनीं गांधीजींचे प्राण वांचवायला जें करायचें कबूल केलें, तें आपण केलें असें होईल! अशा परिस्थितींत इतक्या मोठ्या प्रमाणांत आणि इतकी मोठी किंमत देऊन क्षमाशीलता व सहिष्णुता दाखविणें हा शुद्ध वेडेपणा आहे असें जर गांधीजींच्या मारेकऱ्याला आणि त्याच्यासारख्याच कांहीं हिंदवासीयांना वाटलें असेल तर त्यांत सकृद्दर्शनीं नवल नाहीं!

तात्पर्य, एका हिंदु मारेकऱ्याच्या हातून गांधीजींना मरण आलें आहे. कारण काय कीं, त्यांनीं हिंदूंना पश्चात्ताप वाटायला लावून शत्रूंनाहि क्षमा करायला लावलें. पण मृत्यूंतहि गांधीजी स्वस्थ नाहींत. ते कंठरवानें सांगत आहेत, त्यांची वाणी ऐकूं येत आहे. हिंदू पुढाऱ्यांनीं त्यांच्याशीं जो करार केला, त्या करारावर गांधीजींनीं आपल्या प्राणार्पणानें शिक्कामोर्तब केलें आहे! त्यामुळेंच गांधीजी जिवंत असते तर प्रतिज्ञापालन जितकें बंधनकारक झालें असतें त्यापेक्षां आतां त्यांच्या पश्चात् त्या हिंदू पुढाऱ्यांवर ती प्रतिज्ञा पार पाडणें अधिकच बंधनकारक झालें आहे. हिंदूंबद्दल मुसलमानांची वृत्ति दुसऱ्या कशानेंहि नरमली नसेल येवढी गांधीजींच्या बलिदानानें नरमण्याचा संभव आहे. गांधीजींचा मारेकरी जर मुसलमानांपैकीं एकादा निघाला असता तर त्याचे परिणाम काय झाले असते, याची कल्पनाहि करवत नाहीं. परंतु त्यांचा मृत्यु त्यांच्या एका स्वबांधवाकडूनच झाला. यामुळें हिंदी प्रश्नाच्या आंतरिक आणि आध्यात्मिक स्वरूपावर असा एक नाट्यमय कळस चढला आहे कीं, त्याचे परिणाम हिंदी समाजांतील सर्व जातींच्या घटकांपर्यंत जाऊन भिडणें अपरिहार्य आहे.

गांधीजींचा देह नष्ट झाला खरा; पण विरोधाभास असा कीं ते जिवंत आहेत येवढेंच नव्हे तर अत्यंत प्रभावी रीतीनें जिवंत आहेत! ते हिंदुस्थानांतील सामान्य जनतेच्या रूपानें जिवंत आहेत; कारण, आधुनिक इतिहासांत त्यांनींच पहिल्यांदा त्या जनतेची उन्नति करून तिचा स्वाभिमान जागृत केला. नेहरू आणि इतर हिंदी पुढारी यांच्या रूपानेंहि गांधीजी जिवंत आहेत; कारण, या पुढाऱ्यांनीं अपकाराची फेड उपकारानें करण्याचें त्यांचेंच व्रत घेतलें आहे. गांधीजी जगभर पसरलेल्या खिस्ती समाजाच्या रूपानेंहि जिवंत आहेत; कारण, आपल्या खिस्ततुल्य धर्माचरणानें सर्वांचीं मनें खेंचून घेणारा त्यांच्याइतका उत्कृष्ट मूर्तिमंत आदर्श खुद्द खिस्ती समाजांतहि उत्पन्न झालेला नाहीं. त्यामुळें गांधीजींना आपला मूर्तिमंत आदर्श मानणें खिस्तीधर्मीयांना भागच पडलें आहे. ते इतिहासांतहि चिरंजीव झाले आहेत; कारण, आपली अंतःसृष्टि व बहिःसृष्टि यांमधील संघर्ष तद्वत्‌च आपले आध्यात्मिक व राजकीय संग्राम ह्यांचें स्वरूप शेवटीं एकच असून त्यांचा निर्णय जर लागायचा असेल तर तो दोहोंचा एकदमच व एकत्रच लागला पाहिजे, याची साक्ष गांधीजींचें जीवन चिरकाल देत राहील.

येवढें वर्णन करून झाल्यावरहि गांधीजींच्या जीवनांत अजूनहि कांहीं सांगण्यासारखें शिल्लक उरतें का? तें जर उरत नसेल तर गांधीजींच्या जीवनाचें पर्यवसान शेवटीं विफलतेंत झालें असें मान्य करणें भाग आहे. आपल्या ७८ वर्षांच्या आयुष्यांत त्यांनीं सुष्टपणानें दुष्टपणावर विजय मिळविण्याचा केलेला प्रयत्न शेवटीं एका मारेकऱ्याच्या गोळीनें पार वायां गेला! गेल्या सबंध शतकांत गांधीजींसारखा खिस्ततुल्य आदर्श-पुरुष दुसरा झाला नाहीं. या इहलोकांतील जीवनानंतर दुसरें कांहीं जीवन नाहीं असें जर










# गांधीजींच्या मोठेपणाचें रहस्य

गृहीत धरलें तर त्या महात्म्याच्या जीवनावर अन्याय, द्वेष आणि अत्याचार यांनीं शेवटीं मात केली आहे असेंच म्हटलें पाहिजे. मनुष्याच्या व्यक्तिमत्त्वाचें परिणाम त्याच्या निधनानन्तरहि शिल्लक राहतात, हें खरें. गांधीजींचें संजीवनी–मात्रेसारखें व्यक्तिमत्त्व तर अधिकच दूरगामी परिणाम करीत राहील. हें सर्व गृहीत धरूनहि जगांतील दुष्टपणाला कसें तोंड द्यावयाचें हा सनातन प्रश्न या सज्जन माणसाच्या खुनाच्या रूपानें अजूनहि मूर्तिमंत उभा राहतोच; त्याला समाधानकारक उत्तर मिळत नाहींच !

खिस्ती धर्मातल्याप्रमाणें गांधीजींचीहि अशी श्रद्धा होती कीं सच्चरितमय जीवन मृत्यूनें नष्ट होत नाहीं; मृत्यूनंतरहि आत्मा राहतोच. पुष्कळ वर्षांपूर्वीं त्यांनीं जे उद्गार काढले त्यांचें स्मरण करून देणें वावगें होणार नाहीं. ते असे:—

"मला एक गोष्ट स्पष्ट दिसत आहे. माझ्या भोंवतींची प्रत्येक वस्तु जरी क्षणभंगुर आणि विनाशी असली तरी त्या बदलणाऱ्या वस्तूंच्या बुडाशीं अशी एक चैतन्यमय शक्ति आहे कीं जी स्वतः न बदलतां सर्व वस्तुमात्राला आधारभूत राहते, वस्तुमात्राला उत्पन्न करते, नष्ट करते व पुनः उत्पन्न करते. अशी वस्तुजात व्यापून टाकणारी चैतन्यमय शक्ति म्हणजेच परमेश्वर. ही शक्ति निर्भेळपणें सत्प्रवृत्तिपूर्ण व मंगलमय आहे, याची साक्ष मला पटते; कारण, नाशवंत सृष्टींत शेवटीं चैतन्य शिल्लक राहतेंच; असत्यामधूनहि सत्य हें टिकतेंच आणि अंधारामधूनहि शेवटीं प्रकाश उरतोच. म्हणून मी अशा निर्णयाला येतों कीं ईश्वर हा चैतन्य, सत्य आणि प्रकाश यांची मूर्ति आहे. तो मूर्तिमंत प्रेम आहे. सर्वश्रेष्ठ, एकमेव, सन्मंगल असें तोच आहे."

ही श्रद्धा चिरकाल राहील आणि या श्रद्धेच्या रूपानें गांधीजी अजरामर राहतील.

याच एकमेव श्रद्धेच्या रूपानें सुळीं गेलेल्या खिस्ताचा 'सूळ' आपणांला अर्थपूर्ण वाटत आला आहे आणि तो सदैव तसाच अर्थपूर्ण वाटत राहील.

—खिचन सेंचरी, चिकॅगो, अमेरिका,
११–२–'४८.

* * *

वरील संपादकीयावर 'हरिजन'चे संपादक श्री. किशोरलाल मश्रूवाला यांनीं एक टीप लिहिली आहे तिचा सारांश असा :—

'हें संपादकीय सुंदर आहे यांत शंकाच नाहीं. परंतु संपादकांनीं शेवटीं शेवटीं जें आपलें मत दिलें आहे तें मला मान्य नाहीं. मरणोत्तर आत्म्याचें अस्तित्व असो वा नसो, दुष्टपणाचा प्रतिकार जो जिवाचें मोल देऊन करतो, त्याच्या यशापयशाचें मूल्यमापन त्याच्या मृत्यूनें किंवा देहनाशानें ठरविणें शक्य नसतें. मारेकऱ्याच्या ज्या गोळीनें त्या सज्जनाचा बळी घेतला, त्या गोळीनें जर त्या मारेकऱ्याचाच पक्ष कायमचा जायबंदी होऊन, बलिदान गेलेल्या सज्जनाचा पक्ष कायमचा प्रभावी होणार असेल तर त्या सज्जनाचा जीव गेल्यामुळें त्या सज्जनाच्या जीवितकार्यावर पाणी पडून तें विफळ झालें असें म्हणतां येत नाहीं. ती त्या सत्कार्याची किंमतच आहे; कोणीं सांगावें ? अशी किंमत आणखी मुद्दां द्यावी लागेल ! त्यांत यश कितपत मिळतें हें केवळ भविष्यकाळच ठरवील.'

—हरिजन, २५–७–'४८.

---

या माणसाचें शरीर दिसायला किती दुबळें ! पण दुःख आणि यातना सहन करायचें किती अपार सामर्थ्य त्याच्या ठिकाणीं आहे ? त्याच्या दुर्दम्य इच्छाशक्तीमुळें त्याच्या जीवनांतील प्रत्येक क्षण न् क्षण किती अनंत मोलाचा झाला आहे ? अशी ही साधना दुसरीकडे कोठें दिसून येते ? इतकी अवर्णनीय आणि इतकी जाज्वल्य ! अशी तीर्थयात्रा ! इतकी महान् नि अखण्ड ! अशी विशुद्ध सेवावृत्ति ! इतकी उत्स्फूर्त आणि सहज, खडक फोडून उमळून खळाळून वाहणारी जणूं निर्झरिणीच ! असा प्रेमाचा स्नेहाचा अथांग सागर ! ज्याला सीमा नाहीं !

—रवीन्द्रनाथ ठाकूर

श्री. वा. ल. चिपळूणकर

# सुप्रसिद्ध तत्त्वचिंतक श्री. जि. कृष्णमूर्ति

**"जगदुद्धाराचा प्रश्न हा मूलतः, व्यक्तिगत उद्धाराचाच प्रश्न आहे. कोणत्याहि व्यक्तीच्या उद्धाराचा मार्ग हा कोणाहि पूर्वाचार्यांनीं पूर्वीपासून मळलेला मार्ग नाहीं. प्रत्येक व्यक्तीचा मार्ग निराळा व तो ज्याचा त्यानें शोधून काढला पाहिजे. कोणत्याहि धर्माच्या, पंथाच्या, संप्रदायाच्या, समाजाच्या, देवतेच्या, गुरूच्या किंवा अन्य कोणत्याहि व्यक्तीच्या—येवढेंच नव्हे तर माझ्याहि स्वतःच्या—द्वारा, हें आत्मोद्धाराचें कार्य होणें शक्य नाहीं. हा उद्धार ज्याचा त्यानें स्वावलंबनानेंच करून घेतला पाहिजे."**

अश्या तऱ्हेचा आत्यंतिक व्यक्तिमत्त्वाचा व बुद्धिस्वातंत्र्याचा दिव्य संदेश आजच्या भांबावलेल्या व संकटग्रस्त जगताला देत कृष्णमूर्ति मोठ्या प्रेमानें व आस्थेनें सर्व जगतीतलावर आज कित्येक वर्षें परिभ्रमण करीत आहेत.

सध्यां त्यांचें वास्तव्य पुण्यास महिनादीडमहिनाभर आहे. हिंदुस्थानांत त्यांचें आगमन या वेळीं दहा वर्षांनंतर होत आहे. १९४७च्या अखेरीस ते हिंदुस्थानांत आले. त्यानंतर त्यांचीं प्रवचनें व त्यांच्या चर्चासभा प्रत्येक ठिकाणीं महिना, दीड महिना अश्या, मद्रास, मुंबई व बंगलोर येथें झाल्या. येथून पुढें ते दिल्लीस जाणार असें कळतें.

## बालवयांतील हकीकत

यांचा जन्म दक्षिण हिंदुस्थानांत मदनपल्ली येथें तेलगू ब्राह्मण कुटुंबांत १२ मे १८९५ रोजीं झाला. त्या वेळीं यांचे वडील नारायणय्या तेथें तहशीलदार (मामलतदार) होते. त्यांना चार मुलगे होते. एक यांच्यापेक्षां वडील व दोघे धाकटे. हे आठवें अपत्य असल्याकारणानें यांचें नांव आई-बापांनीं प्रचलित रिवाजाप्रमाणें 'कृष्णमूर्ति' असें ठेवलें.

हे दहा वर्षांचे असतांना यांची आई वारली. तिच्या दहा दिवसांतच एकदां हे स्नान करीत असतांना एकदम ओलेतेच बाहेर आले व म्हणाले कीं 'आतांच आई स्नान करून बाहेर आली व ती तिकडे लुगडें बदलण्याकरतां जात आहे, मीहि तिकडेच जातों.' असें म्हणून ज्या खोलींत लुगडीं वाळत घातलीं होतीं तिकडे हे गेले व कांहीं वेळानें ती दिसेनाशी झाली असें पाहून बाहेर आले. याप्रमाणें त्यांना सूक्ष्मदृष्टि (Clairvoyance) आहे असें त्यांच्या वडिलांच्या नजरेस आलें. ही दृष्टि त्यांना पुढील आयुष्यांत बहुत वर्षेंपर्यंत होती असें म्हणतात.

सन १९०७ सालीं यांचे वडील सेवानिवृत्त झाले. ते सन १८८२ सालापासून थिऑसफिकल् सोसायटीचे एकनिष्ठ सभासद होते. उर्वरित आयुष्य सोसायटीच्या सेवेमध्यें घालवावें म्हणून अड्यार येथें राहण्याची आपली इच्छा त्यांनीं बेझंटबाईंच्या जवळ प्रकट केली. तेव्हां त्यांच्या कुटुंबांत बरींच माणसें असल्याकारणानें बाईंनीं प्रथम नकार दिला. पण पुढें १९०९च्या आरंभीं त्यांनीं 'हो' म्हटलें व ते अड्यार येथें येऊन राहिले.

## बेझंटबाईंनीं त्यांना कसें ओळखिलें ?

फेब्रुवारी १९०९मध्यें मि. लेडबीटर (सुप्रसिद्ध थिऑसफिकल् ग्रंथकार व गूढसंशोधनतज्ज्ञ) हे अड्यार येथें कायम वस्तीकरतां युरोपांतून येऊन राहिले. रोजचें कामकाज संपल्यावर ते सहकारी मंडळींना घेऊन समुद्रावर पोहावयास जात असत. अशाच एका प्रसंगीं कृष्णमूर्ति व इतर मुलें किनाऱ्यावर

# सुप्रसिद्ध तत्त्वचिंतक श्री. जि. कृष्णमूर्ति

पाहत उभी असतां, मि. लेडबीटर यांनीं " तुम्हांला पोहायला शिकायचें आहे का ? " असें विचारलें व त्यांच्या वडिलांच्या सम्मतीनें त्यांना शिकविण्यास सुरुवात केली. थोड्याच दिवसांत, एके दिवशीं लेडबीटर हे पोहून आल्यावर, त्यांचे खासगी चिटणीस मि. अर्नेस्ट वुड यांना ग्रंथकार्याला सुरुवात करण्याच्या पूर्वी म्हणाले कीं "आज माझा एक अत्यंत प्राचीन जिवलग मित्र मी ओळखला. तो तहशीलदार नारायणय्या यांचा द्वितीय पुत्र होय." लेडबीटर यांनीं यापूर्वी सोसायटीच्या अनेक सभासदांचे पूर्वजन्म संशोधिले होते. तेव्हां यापुढें यांचे जन्महि संशोधून पाहावे व हे या ठिकाणीं सोसायटीच्या पीठामध्यें वास्तव्य करण्यास कां आले याची कारण-परंपरा शोधून पाहावी, अशी कल्पना दोघांच्याहि मनांत येऊन त्याबद्दल नारायणय्या यांची संमति घेऊन या संशोधनकार्यास त्यांनीं आरंभ केला व रोज एका जन्माचा वृत्तांत लिहिण्याचा क्रम सुरू झाला. या वेळीं लेडबीटर हे कोचावर किंवा खुर्चीवर बसून, कधीं डोळे उघडे ठेवून, तर कधीं मिटून, निवेदन करीत व मि. वुड हे तो मजकूर लिहून काढीत. लेडबीटर यांनीं त्यांना सांगून ठेवलें होतें कीं, 'मला महत्त्वाचा वाटेल तो भाग मला जसा दिसेल तसा मी सांगत राहीन; पण तुम्हांला एकादा तपशील विशेष विस्तारानें हवा असल्यास तसें मला तुम्हीं सांगावें.' याप्रमाणें पहिल्या दिवशीं त्यांचा बुद्धकालीन जन्म लिहिला गेला. याप्रमाणें रोज एक, याप्रमाणें दहा जन्म लिहिले गेले व त्यांमध्यें अनेक वेळां त्या जन्मांतून यांची निःस्वार्थता, यांचें शुद्ध प्रेम व यांचा अलोट त्याग प्रकट झाल्याचे व गौतम बुद्धांसारख्या महापुरुषांच्या सन्निध यांनीं लोकसेवेचीं व्रतें घेतल्याचे प्रसंग पाहण्यांत आले व एकदम लेडबीटर यांना विचार उमगला कीं, "मला व बेझंटबाईना गुरुदेवांकडून जगद्गुरूंच्या आगमनाची जगभर जाहीर घोषणा करावी अशी जी आज्ञा मिळाली आहे, तदनुसार या जन्मामध्यें कदाचित् त्यांच्या कार्याचें अधिष्ठान होण्याकरितां, या मुलाचें आगमन सोसायटीच्या हद्दींत झालें असेल. त्या वेळीं बेझंटबाई या युरोपमध्यें व अमेरिकेमध्यें जगद्गुरूंच्या आगमनाबद्दल 'Changing World' (बदलतें जग) या संज्ञेखालीं व्याख्यानें देत फिरत होत्या. त्यांजकडे हे पहिल्या दहा जन्मांचे पूर्व-वृत्तान्त त्यांनीं रवाना केले व नंतर फिरून दोन दशकें, याप्रमाणें तीस जन्मांचे वृत्तान्त पाठविले. यानंतर बेझंटबाई १९०९ सालच्या अखेरीस हिंदुस्थानांत आल्या व यांचें दिव्य भवितव्य दोघांच्याहि प्रत्ययास आलें.

## निराळ्या राहणीस सुरुवात

येथें आल्यावर अशा अलौकिक मुलाचें शिक्षण विशेष रीतीनें झालें पाहिजे, ही गोष्ट त्यांनीं त्यांच्या वडिलांस कळविली व 'कृष्णमूर्ति व नित्यानंद या दोन्ही मुलांच्या शिक्षणाची जबाबदारी इंग्लंडांतील उच्च शिक्षणासह मजकडे आहे' असें त्यांस सांगितलें.

नारायणय्या यांना त्यांच्याबद्दल विश्वास व आदर वाटत असल्यामुळें, त्यांनींहि या योजनेला संमति दिली. या वेळीं हीं दोन्ही मुलें मैलापुर(मद्रास)च्या शाळेंत जात असत. त्या वेळीं शिक्षकांच्या मतानें यांचे धाकटे बंधु नित्यानंद हे चलाख व बुद्धिमान् असून हे अगदींच मंदबुद्धीचे वाटत. त्या वेळीं यांची शरीरयष्टि कृश असून, यांचा चेहराहि मनांत भरण्यासारखा नव्हता. वरील व्यवस्था झाल्यावर वडिलांनीं बाईंना कृष्णमूर्तींचे पालक नेमल्याबद्दल रीतसर पालकपत्रहि दिलें. तेव्हांपासून कृष्णमूर्तींच्या राहण्या-जेवण्याची व्यवस्था बाईंच्या सन्निधच झाली.

## योगाभ्यास व अंतर्यामांतील स्थित्यंतरें

जानेवारी ११, सन १९१०, या दिवशीं अड्यार येथील पीठांतच यांना पहिली महादीक्षा प्राप्त झाली. ही दीक्षा मिळण्याची पूर्वतयारी म्हणून यांचे गुरुदेव यांना स्वप्नस्थितींत रोज जो पाठ देत असत, तो सकाळीं उठल्यावर बेझंटबाईंच्या खोलींत असतांना, 'स्वप्नस्मृति' म्हणून हे लिहून काढीत. याप्रमाणें साधन-चतुष्टयाबद्दल यांना मिळालेला उपदेश, यांनीं रोजच्या रोज लिहून काढला. हाच उपदेश अनुक्रम-दृष्टीनें सुसंगत करून 'At the Feet of the Master' या नांवानें पुढें प्रसिद्ध करण्यांत आला. या ग्रंथाची भाषा अत्यंत सुगम व सरळ अशी आहे व त्यांत अत्यंत प्रसादहि भरलेला आहे. हा ग्रंथ या विसाव्या शतकांतील सद्गुरूंच्या चरणांसन्निध बसून ऐकलेला








एक नवीन उपनिषद्-ग्रन्थच होय. कृष्णमूर्तींनीं या जन्मांत, जनतेला दिलेला हा पहिला प्रसाद होय.

## वृद्धाः शिष्या, गुरुर्युवा

वर लिहिलेला पूर्वजन्माचा वृत्तान्त 'थिऑसॉफिस्ट' मासिकांतून बाईंनीं प्रसिद्ध केला, हा मुलगा जगद्गुरूंच्या अवताराचें अधिष्ठान होणार असल्याचें आपलें मत प्रसिद्ध केलें व त्याला बरोबर घेऊन हिंदुस्थानांतील कांहीं ठिकाणीं त्यांनीं प्रवास केला. त्यांतच तीं दोघें बुद्धगयेस गेलीं होतीं, त्या ठिकाणीं बोधिवृक्षाखालीं ध्यानस्थ असतांना त्यांना गौतमबुद्धांचा साक्षात्कार झाल्याचें त्यांनीं त्या वेळीं "Lotus Journal" या मासिकांत प्रसिद्ध केलें. बनारस येथें असतांना तेथें चाललेल्या सेंट्रल हिंदु कॉलेजमधील शिक्षणकार्याचें त्यांनीं निरीक्षण केलें व कांहीं सभासदांपुढें व तेथील प्राध्यापकांपुढें वरील साधन-चतुष्टयाच्या ग्रंथाधारें अध्यात्म व शिक्षण या शास्त्रांवर प्रवचनें दिलीं. तीं त्यांच्याहून दुप्पट तिप्पट वयोमान असलेल्या कांहीं शिक्षकांना अलौकिक वाटलीं. तीं पुढें 'Education as Service' या नांवानें प्रसिद्ध केलीं गेलीं. त्याच वेळेस जगद्गुरूंच्या कार्याची पूर्वतयारी म्हणून बाईंनीं (ऑर्डर ऑफ स्टार इन दि ईस्ट) 'पूर्वतारकसंघ' ही संस्था काढली. या संस्थेचें मुख्य कार्य जनतेचा हृदय-पालट घडवून आणणें हें होतें.

## वडिलांना संशयपिशाच्चिकेनें पछाडलें

याप्रमाणें काम चाललें असतां, यांच्या भावी दैवी भवितव्याबद्दलच्या खऱ्याखोट्या वदन्ता कानीं जाऊन दक्षिण हिंदुस्थानांतील नारायणय्यांचे कित्येक सनातनी वृत्तीचे नातलग व स्नेही यांना हा सर्व प्रकार अत्यंत अंधश्रद्धेचा व भ्रष्टाकाराचा, अतएव मुलांच्या अनहिताचा वाटून त्यांनीं त्यांना आपलीं मुलें परत घेण्याची गळ घातली व त्यांतच लेडबीटर यांच्याविरुद्ध पूर्वी शीलभ्रष्टतेचें जें वादळ सोसायटींत उठलें होतें, त्याहि गोष्टीची त्यांच्या मनावर भर दिली. त्यामुळें नारायणय्या यांच्या मनाची चलबिचल होऊन त्यांनीं बेझंटबाईकडे मुलें परत मिळण्याबद्दल खासगी मागणी करून, त्यांचा रुकार न मिळाल्यामुळें त्यांना फिर्याद करण्याची कायदेशीर नोटीसहि दिली. हें पाहून आपल्या कार्यांत येणारें विघ्न टाळण्यासाठीं बाईंनीं मुलांना लागलींच १९१२ सालच्या फेब्रुवारींत विलायतेंत नेलें व त्यांच्या ऑक्सफर्ड-विश्वविद्यालयांतील शिक्षणाची योजना करून त्यांच्या पूर्वशिक्षणाकरतां डॉ. अरंडेल, मि. जिनराजदास व प्रो. वुडहाऊस यांची अनुक्रमें इतिहास, संस्कृत व इंग्रजी या विषयांकरतां नेमणूक केली, तोंच मद्रास हाय-कोर्टांत मुलांच्या कबज्याबद्दल, यांच्या वडिलांकडून त्यांच्यावर दावा दाखल झाला. या दाव्याच्या चौकशींत मुलें परत मिळण्याबद्दल कारण म्हणून जो लेडबीटर यांच्या अनीतिमत्तेबद्दल आक्षेप घेण्यांत आला होता तो शाबीत झाला नाहीं. पण 'कायद्यानें बापाला मुलें परत घेण्याचा हक्क आहे' असा हाय-कोर्टाचा निर्णय झाला व तोच निकाल हायकोर्टांतील अपिलांत कायम झाला; तथापि बाईंनीं केलेल्या प्रिव्ही कौन्सिलच्या अपिलांत हा निर्णय, मुलांचें स्वतःचें मनोगत काय, हें खालच्या कोर्टानें न पाहिल्यामुळें व मूलतः फिर्याद कायद्यानें चालूं शकत नसल्यामुळें, रद्द केला गेला (एप्रिल १९१४).

## बाईंचें व जनतेचें कृष्णजींच्याबद्दलचें गाढ प्रेम

याप्रमाणें हे व यांचे बंधु नित्यानंद यांच्या शैक्षणिक जीवनास इंग्लंडांत स्वस्थतेनें सुरुवात झाली. नित्यानंद हे ऑक्सफर्ड-विश्वविद्यालयाचे बी. ए. झाले व पुढें कायद्याच्या अभ्यासास लागले. यांत बेझंटबाईंचा हेतु असा होता कीं कृष्णमूर्ति हे संन्यस्त धर्मानें राहण्याचा संभव असल्यामुळें त्यांना लहान भावाचा सांपत्तिक आधार असावा. यांच्या शिक्षणाची वरीलप्रमाणें व्यवस्था केली गेली होती; पण व्यावहारिक शिक्षणाबद्दल यांची आत्यंतिक उदासीनता शिक्षकांच्या नजरेस आली. यांनीं अनेक ग्रंथ वाचले; पण शिक्षकांच्या दृष्टीनें यांना त्यांच्या कार्यांत यश आलें नाहीं. १९२१ सालीं आपल्या बंधूंबरोबर हे हिंदुस्थानांत आले व लोककार्यांत लक्ष घालून व्याख्यान व लेखन करूं लागले. पुनः कांहीं दिवसांनीं हे ऑस्ट्रेलियाच्या मार्गानें अमेरिकेंत गेले व तेथें राहून कधीं युरोपांत तर कधीं हिंदुस्थानांत असें प्रचारकार्य करूं लागले. यांचीं प्रवचनें ऐकून व विषयचर्चेची स्वतंत्र रचना व तिचें मौलिक स्वरूप पाहून बाईंच्या










म्हणण्याप्रमाणें हे खरोखरच अलौकिक पुरुष आहेत असें लोकांस वाटलें. सोसायटीच्या बाहेरचेहि शेंकडों, हजारों लोक श्रवणास येऊं लागले. यांच्या कार्याकरतां हॉलंडमधील बॅरन पॅलँड या नांवाच्या एका श्रीमंत गृहस्थानें आपला मालकीचा एरडे या गांवीं असलेला एक प्राचीन किल्ला, भोंवतालच्या पांच हजार एकर जमिनीसमवेत, यांना बक्षीस दिला. बाईनीं यांच्याकरितां रहिवासाला म्हणून आर्यविहार नांवाची एक इमारत कॅलिफोर्निया( अमेरिका )मध्यें विकत घेऊन दिली. याप्रमाणें काम चालत असतां १९२५ सालच्या अखेरीस सोसायटीच्या सुवर्णमहोत्सवानिमित्त बेझंटबाईबरोबर हे हिंदुस्थानकडे परत येत असतां यांचे बंधु नित्यानंद हे अमेरिकेंत क्षयानें वारल्याचें वृत्त यांच्या कानीं पडलें. त्यायोगें यांना आत्यंतिक दुःख झालें. पण ' त्या दुःखाग्नींतूनच मला आत्मज्ञान व अखंड शांति हीं प्राप्त झालीं ' असें हे म्हणत.

## कांहीं अलौकिक प्रसंग

सन १९२५ सालीं थिऑसॉफिकल सोसायटीचा सुवर्ण–महोत्सव(Golden Jubilee)–प्रसंग अडयार येथें पीठस्थानीं साजरा केला गेला. त्या वेळीं उपस्थित सभासदांची संख्या तीन हजारपर्यंत होती; त्यांतैकीं हिंदुस्थानबाहेरील सदस्य चारशें होते. सन १९११ सालच्या ता. २८ डिसेंबर रोजीं बनारस येथील वार्षिक परिषदेच्या वेळीं 'पूर्वतारक–संप्रदाया'ची सभा चालू असतांना जगद्गुरूंचा प्रवेश कृष्णजींच्या देहांत झाला असें बेझंटबाई आदिकरून तज्ज्ञांनीं प्रसिद्ध केलें होतें. तसेंच १९२५ सालीं हॉलंडमध्यें ऑमेनला 'पूर्वतारक–परिषदे'च्या वेळीं असाच प्रसंग नजीक असल्याचें त्यांनीं मंडळींना सांगितलें होतें. त्यामुळें वरील सुवर्णमहोत्सवप्रसंगीं सदस्यांचीं मनें अपेक्षेनें उत्कंठापूर्ण झालीं होतीं. ता. २८ डिसेंबर १९२५ रोजीं 'पूर्वतारक'–सभेंत कृष्णजी जगद्गुरूंच्या आगमनाबद्दल 'सुप्रसिद्ध वटवृक्षा 'खालीं भाषण करीत होते. भाषण करतांना ते ' जगद्गुरु आपणां सर्वांना अखंड व नित्य सुखाचें निधान दाखविण्यासाठीं येतील ' असें तृतीय पुरुषीं बोलत असतां, एकदम त्यांच्या स्वरांत किंचित् बदल झाला व त्यांच्या मुखांतून पुढीलप्रमाणें प्रथमपुरुषी वाक्यें बोलली गेलीः—

''ज्यांना सहानुभूति, सुख व मुक्ति हवीं आहेत, त्यांच्याकरतां मी येत आहें. ज्यांना सर्व परिस्थितींत सुख कसें मिळेल याची उत्कंठा लागली आहे, त्यांच्याकरतां मी येत आहें. मी तोडताड––विघातक कार्यकरण्याकरतां नव्हे, तर रचनात्मक म्हणजे विधायक कार्य करण्याकरतां येत आहें. '' हे शब्द उच्चारल्याबरोबर ते स्तब्ध झाले व खालीं बसले. सभा संपून मंडळी परतली. ज्यांनीं हे शब्द ऐकले ते चकित झाले! मागाहून बाईनीं त्यांच्यापाशीं पृच्छा केली असतां ते म्हणाले, '' हे शब्द मला आठवत नाहींत. त्या वेळीं मला चक्कर आल्यासारखें वाटलें. '' असलेच प्रसंग यापुढें हॉलंडमध्यें व अमेरिकेमध्यें अनेक वेळां झाल्याचें ऐकिवांत आहे.

## एक अकल्पित गूढ घटना

सन १९२७ सालच्या आरंभींच कृष्णमूर्तींचा योगाभ्य स पुरा झाला; पण तेव्हांपासून सर्वांनाच अनपेक्षित अशी एक नवीन विचारसरणि त्यांच्या मुखांतून नित्य निघूं लागली. यासंबंधींचें त्यांचें पहिलें प्रवचन हॉलंडमधील ऑमेन येथें ऑगस्ट २, १९२७ रोजीं ''Who brings the Truth ?'' ( सत्यप्रतीति कोण देतो ?) या संज्ञेनें झालें तें होय. या प्रवचनांत ते म्हणाले, '' ज्या चित्राची आज गेल्या १६ वर्षांपासून तुम्ही उपासना करीत आहां तें आजपर्यंत मुग्ध व अबोल होतें; त्या व्यक्तींचें मनोगत तुम्ही आपल्या वृत्तीप्रमाणें ठरवीत होतां; त्यामधूनच तुम्हांला स्फूर्ति तशीच शांति मिळत असे व ती व्यक्ति अबोल असल्यामुळें तुमच्या श्रद्धेला कधींच धक्का लागला नाहीं; पण तें चित्र आतां हलतें–बोलतें झालें आहे व म्हणूनच तुम्ही आतां एकमेकांस विचारूं लागलां आहां कीं ' ही व्यक्ति जें बोलत आहे तें बरोबर आहे काय ?'. जगद्गुरूंचें अधिष्ठान होणारी व्यक्ति हीच आहे काय, असा विचार तुमच्या मनांत येऊं लागला आहे व म्हणूनच मी तुम्हांला हा प्रश्न विचारतों कीं सत्याची प्रतीति कोण देतो ? बाह्य जगांतील कोणतीहि श्रेष्ठ विभूति व मनुष्याच्या अंतर्यामांत वसत असलेलें व्यक्तिमत्त्व यांपैकीं सत्यप्रतीति कोण देतो ?'' व तेव्हांपासून या लेखाच्या आरंभीं दिलेल्या वचनांच्या स्वरूपाचा










विचाराचा ओघ त्यांच्या मुखांतून निरनिराळ्या तऱ्हांनीं निघूं लागला. "जगांतील विविध धर्म, नाना पंथ, अनेक संप्रदाय, नानाविध समाज, नानाविध देवता, अनेक गुरू व पैगंबर आणि अनेक आध्यात्मिक संस्था, या सर्व सत्यशोधनाच्या मार्गांतील अडचणी व अडगळी आहेत. या सर्वांमधून लौकिक महत्त्वाकांक्षा, आध्यात्मिक अभिनिवेश, अधिकार, धन–लोलुपता व बुद्धिमंदांमध्यें अंधश्रद्धा हीं उत्पन्न झालीं आहेत. मला कोणताहि संप्रदाय उत्पन्न करावयाचा नाहीं, मी कोणाचाहि गुरु नाहीं व मला कोणालाहि शिष्य करावयाचें नाहीं. प्रत्यक्ष माझ्या योग्यतेचा होण्याचा अधिकार निसर्गानें प्रत्येक मानवास दिला असतांना त्यानें माझें किंवा कोणत्याहि अन्य व्यक्तीचें शिष्यत्व पतकरणें हा त्याचा अपकर्ष आहे" असें ते सांगूं लागले व याप्रमाणें त्यांचा विचारप्रवाह अजूनपर्यंत चालू आहे. ही विचारसरणि सुरू झाल्याबरोबर लागलीच त्यांच्या कार्याच्या पूर्वतयारीकरतां बाईंनीं काढलेला 'पूर्व–तारक–संप्रदाय' त्यांनीं बंद केला (१९२८). या वेळीं त्या संप्रदायाचे नानादेशींचे चारी खंडांतील ९०,००० सदस्य होते. हॉलंड देशामधील ऑमेन येथील वर लिहिलेला किल्ला भोंवतालच्या ५००० एकर जमिनीसह त्यांनीं त्याचे पूर्व– मालक बॅरन पॅलॅंड यांना परत देऊन टकला व बाईंनीं दिलेलें कॅलिफोर्नियांतील घर 'आर्यविहार' याचाहि त्याग केला. याप्रमाणें पूर्ण संन्यस्त होऊन ते तेव्हांपासून जगांत शब्दशः 'अनिकेत' स्थितींत राहूं लागले. हें ऐकून पुष्कळांना पुराणकालीन श्रीगुरुदत्तात्रेय अवधूत यांची आठवण झाली. याप्रमाणें त्यांचा जीवनक्रम अजूनपर्यंत चालू आहे. या घटनेनें अनेकांचीं हृदयें हललीं, संशय गेले व त्यांचें अलौकिकत्व अनेकांच्या मनाला पटलें. नुकत्याच संपलेल्या जागतिक महायुद्धाच्या अंतरायकालांत त्यांना लाभलेल्या स्वस्थ चिंतनामुळें अगर अन्य कोणत्याहि जागतिक अगर वैयक्तिक घटनेमुळें त्यांच्या जीवनौघाला यापुढें काय वळण लागेल हें एका भविष्यकालालाच माहीत! तेथें आम्हांसारख्यांनीं काय लिहावें!

### कृष्णजींच्या चरित्राची परिणति

वरील घटना अलौकिक आणि गूढ तर खरीच, पण तिच्या परिणतीची दिशा स्पष्टपणें दाखविणारे धागेदोरे व्यवहाराच्या व बुद्धिवादाच्या दृष्टींनीं सुद्धां वरील चरित्रामध्यें अनेक स्थळीं दिसून येतील. सुशिक्षित व संपन्न आईबापांना सुद्धां आपलीं मुलें आपल्या ध्येयाप्रमाणें वाढवून त्यांचें शरीरसंवर्धन व त्यांच्या मनाचा विकास घडवून आणणें किती दूरापास्त आहे, हें प्रत्येकानें आपल्या भोंवतालच्या खासगी जीवनक्षेत्राचें अगर महाराष्ट्रांतील किंवा हिंदुस्थानांतील सार्वजनिक क्षेत्राचें निरीक्षण केलें असतां स्पष्ट होईल. असें असतां बेझंटबाईंनीं भिन्न धर्मांत जन्मलेला, भिन्न समाजांत व संस्कृतींत वाढलेला आणि वडिलांनीं व शिक्षकांनीं मंद बुद्धीचा ठरविलेला एक चौदा वर्षांचा मुलगा "हा जगांतील एक लोकोत्तर पुरुष होईल" असें सांगून आपला म्हणून स्वीकारला, त्याच्या शिक्षणाची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली, त्याच्या शिक्षणाकरतां ऑक्सफर्ड–विद्यापीठांत प्रवेश मिळवून देण्याची पूर्व–तयारी म्हणून डॉ. ॲरंडेल, प्रो. वुडहाउस, सी. जिनराजदास यांच्यासारख्या थोर व विद्वान् शिक्षण–तज्ज्ञांची योजना केली; पण त्या मुलानें येवढ्या मोठ्या पाश्चिमात्य विद्यापीठाच्या थोर पदवीबद्दल उदासीनता दाखविली, स्वतःच्या स्वतंत्र बुद्धीनें, पाश्चिमात्य व पौर्वात्य समाजांचें त्याचप्रमाणें अनेक धार्मिक, आध्यात्मिक व सांस्कृतिक संस्थांचें निरीक्षण केलें, गाढ विचारांअंतीं आपले मौलिक विचार ठाम बनवून, ते सर्व देशांतून निर्भीडपणानें सांगण्याचा उपक्रम सुरू केला व शेंकडों, हजारों स्त्रीपुरुषांचें चित्त वेधून घेऊन वर लिहिल्याप्रमाणें पूर्ण संन्यस्त वृत्तीनें आपल्या मताच्या प्रचारार्थ अनेक देशांत संचार सुरू केला. या सर्व घटना व वर वर्णन केलेले १९११, १९२५ व १९२६ सालांमधील अलौकिक प्रसंग म्हणजे लेखकाच्या मतें बेझंटबाईंनी चाळीस वर्षांपूर्वी (पाहा: Changing World पृष्ठ २९१.) भाकित केलेल्या त्यांच्या आगामी दिव्य अधिकाराच्या पूर्वच्छायाच होत. कांहीं झालें तरी कृष्णमूर्तीचें चारित्र म्हणजे थिऑसफिकल सोसायटीच्या गेल्या







त्र्याहत्तर वर्षांच्या तेजस्वी इतिहासाचा मुकुट–अध्याय ( Crowning Chapter ) होणार, हें खास.

**कृष्णजींनीं लिहिलेले कांहीं ग्रंथः—** 1 At the Feet of the Master (1910), 2 Education as Service (1912), 3 Kingdom of Happiness (1927), 4 Who brings the Truth? (1927), 5 Life in Freedom (1928), 6 By what Authority?, 7 Let Understanding be the Law (1928), 8 Pool of Wisdom, 9 Life the Goal (1928,) 10 Search, 11 Immortal Friend, 12 Come away, 13 Talks at various places (1935-1948).

वरील ग्रंथभांडारांतून वेंचून काढलेलीं कृष्णमूर्तींचीं कांहीं रंगदार विचार–मौक्तिकें:—

1. The world-problem is (essentially) the individual-problem. ( जगदुद्धाराचा प्रश्न हा वस्तुतः व्यक्तिगत उद्धाराचाच प्रश्न होय. )

2. Behaviour is righteousness. ( सदाचार हाच ( खरा ) धर्म होय. 'आचार–लक्षणो धर्मः'.)

3. Let Understanding be the Law. ('सम्यक्' ज्ञान हेंच धर्माचें मूळ असें ओळखलें पाहिजे. 'ज्ञानम् सम्यक् अवेक्षणम्'।)

4. Pain gives the parfume of understanding. (दुःखानुभव हा सत्यज्ञानाच्या परिमलाचा आस्वाद देतो. जो संसार–दुःखें दुखावला। जो त्रिविध–तापें पोळला। तोचि अधिकारी झाला। परमार्थासी॥ — दासबोध. )

5 Spirituality is the poise of Reason and Love. (अध्यात्मसिद्धि म्हणजे बुद्धि व प्रेम यांचें समत्व होय.) 'समत्वम् योग उच्यते'। —भगवद्गीता. )

6. The highest spirituality is the attainment of one's own individual uniqueness. (अध्यात्म–सिद्धीची उच्चतम स्थिति म्हणजे आपापल्या व्यक्तिगत वैशिष्ट्याचें संपादन होय.)

7. Masters are wayside shrines; we never worship those, who started on their journey yesterday. They have to attain the same life, which we have to attain.

(सिद्ध पुरुष म्हणजे जीवनाच्या अखेरच्या मुक्कामाला जाण्याच्या मार्गावर असतांना वाटेंत लागणारीं देवालयें. आपण जीवन–यात्रेला काल प्रारंभ केलेल्या-( प्रवाशां )चें पूजन करीत नाहीं; जीवनाचा जो अखेरचा मुक्काम आपणांला गांठावयाचा आहे, तोच मुक्काम त्यांनाहि पण अजून गांठावयाचा आहे. )

8. What is the difference between the religion of Mylapur and the religion of Adyar? They worship brass-Idols and you worship paper--pictures. ( मैलापूरवासी लोकांच्या व अड्यार येथील लोकांच्या धर्मांत काय भेद आहे? ते पितळेच्या मूर्तींचें पूजन करतात, तर तुम्ही कागदावर काढलेल्या चित्रांचें पूजन करतां.)

9. Truth is a pathless land.

(सत्यज्ञानाची प्रतीति होण्याकरतां कोणाहि पूर्वाचार्योनीं मार्ग आधींच मळून ठेविलेला नाहीं.)

10. No salvation can be had through any religion, any society, any scripture, any angel or देव or through any other—nor even through me. ( कोणताहि धर्म, कोणताहि संप्रदाय, कोणताहि पवित्र ग्रंथ, कोणतीहि देव–देवता, कोणतीहि अन्य व्यक्ति यांच्या—नव्हे,माझ्या द्वाराहि मुक्ति मिळणें शक्य नाहीं. )

———

शांततेचा मार्ग साधा आणि सोपा आहे. तोच सत्याचा आणि प्रेमाचाही पण मार्ग आहे. तो व्यक्तीच्या स्वतःपासूनच सुरू होतो. लांब जायचें म्हणजे जवळूनच सुरुवात केली पाहिजे. कृतीला आपणां स्वतः पासूनच सुरुवात होते. शांतीचें उगमस्थान आपल्या बाहेर नाहीं. तें आपल्या हृदयांत आहे आणि हृदय प्रत्येकाच्या स्वाधीन आहे.

—जि. कृष्णमूर्ति








म. म. द. वा. पोतदार

# लो. टिळकांचा 'बेमालूम' सांधेकार गेला!

कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांचें देहावसान गेल्या शके १८७० श्रावण वद्य ६ (ता. २६-८-४८) मितीस मुंबई मुक्कामीं त्यांच्या नव्या कर्मक्षेत्रांत झालें! एक थोर आणि कर्तबगार संपादक, निष्ठावंत देशभक्त आणि पराक्रमी नाटककार हरपला म्हणून, हें वृत्त कळतांच, सर्वत्र एकमुखानें शोकाक्रोश झाला! खरोखर गेल्या कित्येक महिन्यांत आपण एकामागून एक अशा जुन्या पिढींतल्या थोर पुरुषांस मुकत चाललों आहों! हे जुने दुवे निखळून पडल्यामुळें आपलीं मनें विषण्ण झाल्याशिवाय कशीं राहतील?

तसें म्हटलें तर काकासाहेब खाडिलकर यांची प्रकृति अलीकडे कित्येक वर्षे रोगजर्जर झालेली होती; आणि तशांतच त्यांचेवर कौटुंबिक दुःखांचेहि कित्येक दुर्धर आघात झाले होते. अश्या कठिण स्थितींतहि त्यांनीं आपल्या मनाची खंबिरी सोडली नाहीं आणि तत्त्वचिंतनानें, धैर्यानें दुःखाचे आवेग सहन केले. अखेर या कठोर झगड्यांत त्यांचा अंत झाला! लौकिक दृष्ट्या पाऊणशें वर्षांचें त्यांचें वय असल्यामुळें हें कांहीं अकाल-निधन म्हणतां येणार नाहीं. तथापि आपल्याला प्रिय वाटणारी व्यक्ति आपल्यांतून कायमची गेल्याची जाणीव होऊन होणाऱ्या दुःखाचे चटके मनाला आंतून पोळत राहणारच!

## काकासाहेबांच्या लेखणीची पहिली सलामी

काकासाहेब भाग्यवान् खरे; कारण, गेल्या पिढींतल्या सर्वश्रेष्ठ अशा लोकमान्यांसारख्या थोरांच्या संगतींत राहून देशसेवा करण्याचा अपूर्व सुयोग काकासाहेबांना तरुणपणींच लाभला! काकांच्या एका परीक्षणात्मक लेखामुळें टिळकांचें लक्ष्य त्यांचेकडे गेलें आणि त्यांनीं त्यांची आपल्या 'केसरी'-साठीं निवड केली. काकांच्या आधीं थोडेच दिवस तात्यांची निवड आणि योजना टिळकांनीं केली होती. केळकर आणि खाडिलकर या दोन तरुणांची 'सहकारी' म्हणून टिळकांनीं केलेली निवड किती पारखीची ठरली हें जगजाहीरच आहे.

डे. ए. सोसायटीच्या कांहींशा मर्यादित क्षेत्रांतून अधिक व्यापक क्षेत्रांत टिळक हिरीरीनें कामाला लागून कित्येक वर्षे झालीं होतीं. 'आधीं सामाजिक कीं आधीं राजकीय?' असले वाद संपवून टिळकांना जनतेचें लक्ष्य आपणांवर केंद्रित करून घेण्यांत वाढतें यश मिळूं लागलें होतें. लोकहितवादींची जुनी पिढी लुप्त होत चालली होती. नवीन पिढींतले टिळकांचे आगरकर-आपट्यांसारखे उमदे उमदे सहकारी अल्पवयांत मृत्यूला बळी पडले होते. दुष्काळाची भीषण छाया देशावर पडून लोकांची अस्वस्थता वाढत होती. त्यांतच प्लेगसारख्या नवीनच लोकसंहारक रोगाचा प्रादुर्भाव झाला!

प्रथम गणेशोत्सव आणि त्याच्या जोडीला शिवाजीस्मारक आणि शिवाजीउत्सव या कल्पना हातीं धरून टिळकांनीं जनताजागृतीचीं चक्रें वेगानें चालू करण्यासाठीं कंबर कसली होती. याप्रमाणें टिळक आपल्या सार्वजनिक आयुष्याची नवी पायरी चढूं लागले होते. आणि त्यासाठींच त्यांना हुषार आणि कर्तबगार अशा तरुण सहकाऱ्यांची गरज होती. त्यांची शोधक नजर केळकरखाडिलकरांकडे वळून सफळ झाली. खाडिलकरांच्या लेखणीचें पाणी 'राष्ट्रीय महोत्सवांच्या आवश्यकते'च्या प्रतिपादनाच्या सलामीनें केसरींतून सर्वांच्या प्रत्ययास आलें!

लवकरच प्लेगप्रतिबंधक उपायांचा जुलूम झाला व










## लो. टिळकांचा 'बेमालूम' सांधेकार गेला !

प्रजेचा असंतोष भडकला ! रँडसाहेबांचा खून झाला. चापेकरबंधूंच्या तरुण मंडळाचा असा तडाखा बसतांच सरकारी दडपशाहीला जोर आला आणि तिची धग केसरी आणि टिळक यांनाहि लागली. टिळकांवर तुरुंगांत खडी फोडण्याचा प्रसंग ओढवला ! असंतोष आणखी वाढला ! हा सर्व प्रसंग उभ्या हिंदुस्थानांत अभिनव आणि भयंकर धक्का देणारा असा होता. या कठिण प्रसंगांत केसरीची नौका तिची अब्रू संभाळून पुढें ढकलीत नेणें हें एक महाकर्म होतें आणि तें यशस्वी करण्याची अवघड कामगिरी केळकर व खाडिलकर या टिळकांनीं नुकत्याच जोडून घेतलेल्या तरुण सहकाऱ्यांवर पडली. ही या तरुणांच्या कसोटीची वेळ होती. त्यांचें कौशल्य आणि धैर्य हीं कसाला लागणार होतीं. भाग्याची गोष्ट अशी कीं या दिव्यांतून ही जोडी सहीसलामत बाहेर पडली; येवढेंच नव्हे तर, पसंतीची शाबासकी खुद्द टिळकांकडून 'पुनश्च हरिः ॐ' हा मंत्रोचार करतांना मिळाली. 'बेमालूम सांधा जुळविला !' म्हणून टिळकांनीं या बहाद्दरांची मोकळ्या मनानें पाठ थोपटली ! यशाचा सिंहगड या तानाजी–सूर्याजींनीं पहिल्या झटक्यास सर केला ! आज हे दोन्ही बहाद्दर लेखणी–वीर एकापाठोपाठ एक असे आपल्यांतून निघून गेले ! त्यांच्या पराक्रमाचें स्मरण आणि मनन करणें हें आपलें पहिलें कर्तव्य होय.

याप्रमाणें ही जोडी जी एकदां आखाड्यांत उतरली, ती अखेरपावेतों आपलें कार्य वाढत्या यशानें करीत राहिली. दोघेहि एकाच आखाड्यांतले खरे, पण दोघांनींहि आपापलें वैशिष्ट्य प्रकट केलें. दोघेहि नामांकित वृत्तपत्रकर्ते, तसेच नामवंत नाटककर्ते म्हणून त्या काळीं दोन्ही सृष्टींत चमकले आणि दोघांनींहि आपापलें आघाडीचें स्थान सतत टिकवून धरलें. हीं त्यांचीं महनीय यशें त्यांनीं कशीं मिळविलीं, वाढविलीं आणि टिकविलीं या बाबींचें चिंतन त्या वाटेनें जाणाऱ्या पुढिलांस खाचित लाभप्रद आणि मार्गदर्शक झाल्याशिवाय राहणार नाहीं.

काकासाहेबांच्या पाऊणशें वर्षांच्या आयुष्याचे तीन स्थूल आणि सारखे टप्पे सहज पाडतां येतात. त्यांचा जन्म इ. स. १८७२ सालचा. तेथून पहिला पंचविशीचा टप्पा १८९७ ला संपतो. याच टप्प्यांत आपला विद्याभ्यास संपवून, पदवी मिळवून आणि आपल्या लेखणीची व विचारांची चमक 'विविध–ज्ञान–विस्तारां'तून दाखवून त्यांनीं 'केसरी'त प्रवेश मिळविला आणि पहिल्याच झटक्यास टिळकांसारख्यांकडून 'बेमालूम' सांधेकार म्हणून मानाचें आणि यशाचें प्रशस्तिपत्र प्राप्त करून घेतलें.

पहिल्या पंचविशीनंतरची दुसरी पंचविशी (१८९७–१९२२) काकासाहेबांनीं साधारणपणें 'केसरी'च्या सेवेंतच घालविली असें म्हटलें असतां चालेल. कारण, त्यांनीं आपला स्वतंत्र 'नवा काळ' १९२३त सुरू केला. १९२०पर्यंत ते 'केसरी'शीं संबद्ध होतेच. त्यानंतर कांहीं दिवस त्यांनीं मुंबईत टिळकपक्षाच्याच 'लोकमान्य' दैनिकाचे संपादक म्हणून काम केलें. परंतु या घटनेमुळें आम्हीं ठरविलेल्या दुसऱ्या पंचविशीचा हिशेब चूक ठरण्यासारखा नाहीं.

### लो. टिळकांशीं एकात्मता साधण्याचा प्रयत्न

या दुसऱ्या पंचविशींत टिळकांनीं सुरू केलेल्या विविध राष्ट्रोद्धारक चळवळींचें तेज वाढत गेलें. वंग–भंगाच्या चळवळीचा उठाव टिळकांनीं महाराष्ट्रांत जोरानें केला. त्यांतूनच स्वदेशी, बहिष्कार, स्वावलंबन आणि राष्ट्रीय शिक्षण हीं चतुःसूत्री जन्मास आली. नवा राष्ट्रीय पक्ष जोमांत आला. टिळक त्याचे सर्वाग्रगण्य पुढारी म्हणून 'लोकमान्य' पदवीला पोंचले. नोकरशाही हादरून गेली. पुनः दडपशाहीला जोर आला; पुनः लोकमान्य टिळकांना शिक्षा झाली; पण या वेळची शिक्षा मागच्या शिक्षेपेक्षांहि उग्र होती. हद्दपारी आणि तुरुंगवास यांचा एक नवाच जोड टिळकांच्या पायांत नोकरशाहीनें अडकविला. टिळकांना १८९७ सालीं आणि पुनः १९०८ सालीं ज्या शिक्षा भोगाव्या लागल्या त्यांना आपलेच लेख कारणीभूत झाले ही रुखरूख काकासाहेबांच्या मनाला जन्मभर खात राहिली. परंतु या घटनेमुळें आपलें व्रत पूर्वीपेक्षांहि चिकाटीनें चालविण्याचा त्यांचा निश्चय मात्र अधिक दृढ झाला.

जसजसें राष्ट्रीय चळवळीला तेज चढलें तसतशी केसरींतून खाडिलकरांच्या लेखणीची धारहि वाढत गेली. टिळकांच्या सहवासांत येण्यापूर्वीं आपणाला








'केसरी' या अक्षरांचा स्वप्नांतहि साक्षात्कार झाला अशी स्वतः खाडिलकरांनींच साक्ष भरली आहे; ही त्यांची श्रद्धेची बैठकहि शेवटपर्यंत कायम राहिली; म्हणूनच त्यांनीं वार्धक्यांत आपल्या सांगली गांवीं एक दत्तमंदिर उभें केलें आणि वेदोपनिषदांच्या तत्त्वचिंतनांत ते गढून गेले.

खाडिलकरांनीं टिळकांची विचारसरणि तशीच शिकवण आपल्या ठिकाणीं पक्की मुरविण्याचा अगदीं श्रद्धापूर्वक प्रयत्न केला असावा असें दिसतें. वेद, उपनिषदें, महाभारत इत्यादि आमच्या प्राचीन भारतीय संस्कृतीचे ग्रंथ लक्षपूर्वक अभ्यासण्याविषयीं टिळकांचा आग्रह असे आणि हा आग्रह खाडिलकरांनीं मनापासून अंमलांत आणण्याचा कसून प्रयत्न केला. या ग्रंथांतील रहस्य आत्मसात् करण्याच्या दृष्टीनें ते त्यांचें अवलोकन करीत. कालनिर्णय, पाठचर्चा, असल्या बाह्यांगांकडे त्यांचें लक्ष्य होतें असें दिसत नाहीं. या ग्रंथांची शिकवण मनावर बिंबावी असा त्यांचा रोख दिसतो. आपल्या मनांत नवीन राजकारणाची मांडणी करतांना खाडिलकरांचें तत्त्वचिंतन वरील धोरणानें आणि दिशेनें चाले. टिळकांचे अंतर्गत विचार आपल्या लेखांतून बेमालूम प्रकट व्हावे ही ईर्ष्या त्यांनीं आपल्या मनांत वागविली होती. या ध्यासामुळेंच टिळकांच्या मनांतल्याच गोष्टी जणूं कांहीं त्यांच्या लेखांतून उठून येत असें वाटे आणि त्यामुळें साधारण वाचकाला खाडिलकरांचा लेख टिळकांच्या लेखापासून एकाएकीं निराळा काढून दाखविणें कठिण पडत असे, इतकी एकात्मता खाडिलकरांनीं साध्य केली होती. ही एकात्मता बहिरंगापेक्षां अंतरंगावरच केंद्रित झाली होती हें मात्र विसरतां उपयोगीं नाहीं.

## उद्दीपक आणि प्रेरक लेखनशैली

मथळ्यापासून उपसंहारापर्यंत टिळकांचा लेख सरळ, जोरदार परंतु कायदेशीर, तर्कपद्धतीनें आणि कोटिक्रमांनीं भरलेला असा असे. खाडिलकरांच्या मनाचें वळण कायदेशीरपणांत रमणारें नव्हतें. त्यांची भाषाहि टिळकांसारखी अगदींच सरळ होती असें म्हणतां यावयाचें नाहीं. तथापि धडाडी आणि जोम या गुणांत ती टिळकांना शोभणारी असे. प्रतिपक्षाचे वाभाडे काढण्यांत टिळक अत्यंत कठोर आणि तीव्र स्वरूप धारण करीत. याहि गुणांत खाडिलकर टिळकांची सहज बरोबरी करूं शकतील इतके कुशल होते. पण तीव्रता आणि उपहास यांची पेरणी खाडिलकरांकडून जरा अधिकच होत असे असें म्हटलें तर तें न्यायाचेंच होईल. 'मद्रासची मजलीस' या आपल्या अत्यंत बोचक लेखांत प्रतिपक्षाला हिणवून 'तिरडी'ची जी उपमा खाडिलकरांनीं योजिली ती आज चाळीस वर्षें झालीं तरी आमच्या स्मरणांतून गेलेली नाहीं. आणि आम्ही कांहीं 'अमुक पक्षाचे अनुयायी' असा आभिनिवेश तेव्हांहि बाळगीत नव्हतों. स्थूलमानानें आमच्या मताचें माप टिळकपक्षाकडे झुकत होतें, तरीहि खाडिलकरांचें हें लिहिणें आम्हांला रुचलें नाहीं; मग त्यांच्या प्रतिपक्षीयांनीं केसरीवर किती आणि कशी लाखोली वाहिली असेल याची चाणाक्ष वाचकांना सहज कल्पना येईल. जे कोणी ज्ञानप्रकाशाचे एक मार्मिक आणि खोंचदार संपादक कै. बापूराव आंबेकर यांच्या टिळकांवरील लेखांचें पुस्तक वाचतील ते केसरी–विरोधी ज्ञानप्रकाशांतून अशा लिखाणाची कशी संभावना होत असेल याचा अंदाज सहज करूं शकतील.

अशा कट्टरपणामुळेंच खाडिलकर केळकरांपेक्षां त्या वेळच्या 'केसरी'–पक्षांत अधिक प्रिय असत! विरोधी पक्षाचें नांवच मवाळ किंवा नरम पक्ष असें केसरी–बाजूकडून ठेवण्यांत आलें होतें आणि 'भिक्षांदेहि'–पक्ष म्हणूनहि त्याची बोळवण लो॰ टिळक देखील करीत! खेळीमेळीच्या मर्यादेपलीकडे जर अशी टर उडविण्याचें स्वरूप गेलें तर त्यापासून आधींच चिरफळलेला समाज तडे पडून फाटत जातो. समाजपटाची वीण आणि त्यांतील धाग्यांचा बाणा आणि ताणा हे जर मूळचेच मजबूत नसतील तर अशा छिद्रांचे मोठाले भोसके होतात आणि समाजाची शक्ति क्षीण होत जाते.

ही बाजू सोडली तर उद्दीपक आणि प्रेरक लेख लिहिण्यांतहि खाडिलकरांचा हातखंडा होता. असले लेख त्यांनीं मोठ्या उत्साहानें लिहिले. त्या वेळच्या राष्ट्रीय चळवळीच्या काळांत लोकांत चैतन्य उत्पन्न करण्यास आणि लोकांचा उत्साह वाढविण्यास खाडिलकरांच्या तेजस्वी लेखांनीं केलेलें साहाय्य निःसंशय

# लो. टिळकांचा 'बेमालूम' संपादक गेला !

संस्मरणीय आहे. याचें एक उदाहरण चांगलें लक्ष्यांत राहिलेलें व तेंहि टिळकांच्या दुसऱ्या संकटकालांतलेंच आहे. टिळकांना शिक्षा झाली आणि मुंबईतील अखिल जनता इतकी प्रक्षुब्ध झाली कीं तेथील कामकरी वर्गानें केलेल्या असंतोषप्रदर्शनाला दंग्याचें स्वरूप आलें ! मुंबई म्हणजे प्रागतिक किंवा मवाळ पक्षाचा बालेकिल्ला; असल्या या भरंवशाच्या म्हशीला टोणगा झाला तर तो टिळकप्रतिपक्षीयांना व सरकारला कसा सहन व्हावा ? या आमच्या मुंबईत अन् या तेल्यातांबोळ्यांच्या पुढाऱ्यांवर जनतेकडून असा प्रेमवर्षाव व्हावा अं ? ही क्रांतीच म्हटली पाहिजे होती ! या क्रांतीची मीमांसा करून तिचें मर्म उकलून दाखविण्यासाठीं आमच्या खाडिलकरांनीं आपली लेखणी पुढें सरसावली आणि केसरींत 'सर्वांत पुढें मुंबईच कां ?' म्हणून लेखमाला लिहून एक अभिनव रीतीची अंतर्भेदी राजकीय उकल करून दाखवून हजारों वाचकांस चकित करून सोडलें ! एकाद्या प्रश्नाचा खाडिलकर वरवर विचार करीत नसत. चार ठिकाणच्या सुप्रतिष्ठितांच्या मतांचा सुबकसा अनुवाद करून समाधान मानणारे संपादक खाडिलकर नव्हते ! वरील लेखमालेसारख्या लेखांनीं खाडिलकरांच्या वजनदारीची मातब्बरी प्रकट झाली. त्यांचे जोडीदार केळकर हेहि कांहीं कमी नव्हते; पण त्यांचा ठसा निराळा. त्यांनींहि 'आयर्लंड आणि हिन्दुस्तान' या विषयावर जेव्हां विचारपरिप्लुत लेखमाला 'केसरींत' लिहिली, तेव्हां टिळक–शिष्यांची ही जोडी कशी कसलेली आहे याचा अनुभव सर्वांस येऊन गेला ! 'सर्वांत पुढें मुंबईच कां ?' या लेखमालेंत स्वतंत्र अन्न खाणाऱ्याच्या रक्तांतच स्वातंत्र्यप्रीतीचें रक्त कसें खेळतें याची त्या काळीं तरी अभिनव वाटणारी सखोल मीमांसा खाडिलकरांनीं केलेली वाचून आजहि आपली मान डोलल्याशिवाय राहणार नाहीं. आमचे काकासाहेब असे पट्टीचे राष्ट्रीय संपादक होते आणि म्हणूनच टिळकांच्या गादीवर ते आपल्या अंगच्या प्रौढीनेंच शोभत होते. खाडिलकरांची दुसरी पंचविशी या प्रमाणें वाढत्या पराक्रमानें आणि यशानें संपन्न झाली.

## गांधी–'संवादी' खाडिलकर

खाडिलकरांची तिसरी पंचविशी अर्थात् १९२२ ते १९४७–१९४८ ही म्हणतां येईल. दुसऱ्या पंचविशीच्या अखेरीस त्यांचा केसरीशीं संबंध तुटला, त्यांचें गुरुदैवत—लो० टिळक हेहि दिवंगत झाले आणि 'पुढें काय ?' असा प्रश्न त्यांच्यासमोर उभा राहिला ! या काळांत त्यांनीं 'नवा काळ' नांवाचें दैनिक मुंबईत सुरू करण्याचा धाडसी मनसुबा योजिला. माझे मित्र श्री. न. र. फाटक हे त्या वेळीं यंदेशेटजींच्या इंदुप्रकाशांत संपादकीय खात्यांत काम करीत असत. खाडिलकरांना वासुकाका जोशी यांचें प्रोत्साहन मिळालें होतें. पण त्यांनीं योजिलेला मनसुबा तडीस नेणें कांहीं सोपें नव्हतें. अशा अवघड परिस्थितीशीं टक्कर देऊन काकासाहेबांनीं अखेर मुंबई जिंकलीच !

टिळक गेले आणि गांधी आले ! त्यांनीं आपलें युगच सुरू केलें. या क्रांतीचीं पावलें खाडिलकरांनीं ओळखलीं. ते समजून चुकले कीं 'नवा काळ' येत आहे. म्हणून तेंच नांव घेऊन ते पुढें आले. पालटलेल्या काळाचें स्वरूप त्यांनीं ओळखलें. गांधींचें तत्त्वज्ञान आणि टिळकांचें तत्त्वज्ञान यांच्यांत कांहीं मूलभूत फरक होता. वास्तविक त्या दोन निराळ्या निष्ठा होत्या; तथापि त्या नित्यविरोधीच होत्या असें मात्र नव्हे; त्यांचा समन्वय होण्यासारखा होता. हरिहरांतील अभेदाचा मनोहर आणि मार्मिक दृष्टांत देऊन केळकरांनीं या समन्वयाची चुणूक दाखविलीहि होती. हा समन्वय नित्यसमन्वय या कोटींत जरी जाऊं शकला नसता तरी अनित्य–समन्वयाची कोटि त्याला लाभूं शकली असती. गांधींनीं आपली निष्ठा राजकारणांत आणली तेव्हां तिला स्वाधीन परंतु लवचीक ठेवण्याचें सामंजस्य प्रत्ययास आणून दिलें होतें. हा लवचीक समन्वय खाडिलकरांनीं केला. गांधीवाद या नांवानें जें तत्त्वज्ञान वगैरे पुढें विकसित आणि विश्रुत झालें त्याचे अनेक भाष्यकार आज आपणांत आहेत. संपूर्णपणें या वादाशीं तद्रूप झालेल्यांची पहिली प्रत मानली तर त्यांत जसे काकासाहेब कालेलकर जाऊन बसतील त्याच पंक्तीला काकासाहेब खाडिलकर यांना नेऊन बसवितां येणार नाहीं असें आम्हांस वाटतें. पहिल्यांस








जर **गांधीवादी** म्हटलें तर दुसऱ्यांस **गांधीसंवादी** म्हणणें योग्य होईल. काकासाहेब खाडिलकर यांस 'गांधीवादी' म्हणण्यापेक्षां ते 'गांधीसंवादी' वर्गांतच मोडतील असें म्हणणें वस्तुस्थितीस अधिक धरून होईल.

## मराठी दैनिकाचा धाडसी व यशस्वी प्रयत्न

येथें हेंहि लक्ष्यांत घेतलें पाहिजे कीं 'नवा काळ' हें दैनिक पत्र होतें. काळ झपाट्यानें बदलत होता. 'केसरी'सारखीं साप्ताहिक पत्रें आतां नित्य जोरानें फोंफावणाऱ्या राष्ट्रीय जागृतीचा बोजा वाहण्यास तोटकीं पडत होतीं. साप्ताहिकांना दैनिकांची जोड देणें अवश्य झालें होतें. म्हणूनच टिळकपक्षीयांनीं मुंबईस 'लोकमान्य' दैनिक चालू केलें होतें. 'राष्ट्र–मत' दैनिकहि अशाच विचारांतून जन्मास आलें होतें. ज्ञानप्रकाश, इंदुप्रकाश इत्यादि जुनीं दैनिकें होतीं हें खरें; परंतु एक तर तीं मवाळपक्षीयांचीं आणि तींहि कशींबशीं रुटूखुटू चाललेलीं. खाडिल-करांना साप्ताहिकांचा अनुभव दीर्घकालीन होता; पण दैनिक चालवावयाचें तंत्र अगदीं निराळें. दैनि-काचा कारखाना संततधारेसारखा अहोरात्र चालवावा लागतो. बातमी—ताजी बातमी—पुरविण्याविषयीं दैनिकांच्या चालकांना फार दक्ष असावें लागतें. दैनिक हें विचारपत्रापेक्षां प्रचारपत्र या न्यायानेंच चालवावें लागतें. हीं सर्व तंत्रें संभाळून खाडिल-करांनीं 'नवा काळ' मुंबईसारख्या ठिकाणीं यशस्वी करून दाखविला व त्याला स्थैर्य आणि प्रतिष्ठा मिळवून दिली, हें त्यांचें त्यांच्या तिसऱ्या पंचविशीं-तील स्पृहणीय यश गणलें पाहिजे.

मुंबईसारख्या ठिकाणीं असें वर कित्येक वेळां विशे-षत्वानें म्हटलें आहे त्याचें मर्म थोडें ध्यानांत घेतलें पाहिजे. मुंबई शहराचा अगदीं जुना इतिहास घट-काभर बाजूस ठेवला तरी अव्वल इंग्रजीच्या नवीन युगाच्या सुरुवातीस महाराष्ट्रमंडळाचे पुढारी कै. नाना शंकरशेट हे होते. त्यांच्या काळीं त्यांचें आख्या मुंबईवर जितकें वजन होतें तितकें महाराष्ट्रीय पुढा-ऱ्यांचें आणि अर्थातच तदनुषंगानें महाराष्ट्रीय समा-जाचें वजन मुंबईत पुढें राहिलें नाहीं. महाराष्ट्री-यांचें वजन पिढीपिढीला उतरतच गेलें. नाना शंकर-शेट यांच्या मागून रावसाहेब मंडलीक हे महाराष्ट्री-यांचे म्होरके गणतां येतील. त्यांचें वजन नाना शंकरशेट यांच्यापेक्षां एकंदरींत जरा कमीच भरेल. नानांपेक्षां रावसाहेब विद्वत्तेंत वरचढ असतील, पण बहुजनसमाजांतलें वजन तोलून पाहिलें तर नानांचें पारडें मंडलिकांपेक्षां केव्हांहि जडच भरेल. नाना गेले, रावसाहेब गेले आणि त्यांच्या मागून बोट घालून एकहि नांव त्या तोलाचें म्हणून घेतां येणार नाहीं. सर भालचंद्र किंवा सर नारायण इत्यादि नांवें आठवतील; पण नाना–मंडलिकांच्या तोलाचें वजन त्यांना नव्हतें असें म्हटल्यानें त्यांच्या वास्तविक मोठेपणास कमी-पणा आणल्याचा दोष लावतां येणार नाहीं असें प्रांजलबुद्धीनें वाटतें. तात्पर्य, इ. स. १८०० ते १९०० या शतकांत महाराष्ट्रीयांचें वजन अंशाअं-शानें कमीकमी होत होतें. हें महत्त्व वाढविण्याच्या हेतूनें असें जरी नाहीं, तरी मराठी भाषा बोलणाऱ्या जनतेंत राष्ट्रीय जागृतीचा फैलाव करण्याच्या ईर्ष्येनें खाडिलकरांनीं 'नवा काळ' दैनिकाचा धाडसी मनसुबा योजिला आणि यशस्वी केला. काकासाहे-बांच्या या महनीय सेवेसाठीं सर्व मराठी बोलणाऱ्या जनतेनें त्यांचें ऋण सदैव स्मरणांत ठेवलें पाहिजे.

साप्ताहिकांतील लेखांची दीप्ति दैनिकांतील लेखांत क्वचितच आणतां येते. खाडिलकरांनीं 'नवा काळ' आणि 'केसरी' यांतून लिहिलेल्या लेखसंभाराचें परीक्षण या दृष्टीनेंच केलें पाहिजे.

मुंबईंत गुजराती आणि इंग्रजी दैनिकांचाच पूर्वी जोर होता, त्या जागीं मराठी दैनिकाला मानाचें स्थान, तसेंच वजन काकासाहेबांनीं प्राप्त करून दिलें. काकासाहेबांच्या पूर्वी संदेशकर्ते अच्युत-राव कोल्हटकर यांनीं मुंबई हलवून सोडली होती आणि या क्रांतीचा पहिला डंका कडाडून वाजविला होता; परंतु भडकपणावर भर न देतां भारदस्त-पणावर भिस्त ठेवून काकासाहेबांनीं 'नवा काळ'ला मिळवून दिलेली प्रतिष्ठा हा त्यांच्या कामगिरीचा विशेष मनांत भरल्याशिवाय राहत नाहीं.

पूर्वी केसरींत बोअरयुद्धाचे वेळीं, तदनंतर पहिल्या महायुद्धाचें मासिक समालोचन करतांना 'चित्रमयजगत्'मध्यें आणि अलीकडील महायुद्धा–

## लो. टिळकांचा 'बेमालूम' सांधेकार गेला !

संबंधीं त्यांनीं बारकाईनें अभ्यास करून लिहिलेले लेख त्यांच्या एतद्विषयक सूक्ष्म व्यासंगाची भरपूर साक्ष देतात. खाडिलकरांच्या अभ्यासाचा हा विशेष सर्वांनीच वाखाणलेला आहे.

खाडिलकरांनीं वर्तमानपत्रांतून लिहिलेले निवडक लेख प्रसिद्ध व्हावे म्हणून पुष्कळ वेळां खटपट झाली; परंतु काकासाहेबांनीं परवां–परवांपर्यंत या कामीं परवानगी दिली नाहीं येवढेंच नव्हे, तर उलट मोडताच घातला. पुढें त्यांची परवानगी मिळाली; परंतु आपले हे विखुरलेले लेख एकत्र छापलेले पाहण्याचा सुदिन उगवण्याच्या पूर्वींच त्यांचें देहावसान झालें. त्यांचे सुविद्य चिरंजीव त्यांची गादी उत्साहानें चालवीत आहेत. तेव्हां काकासाहेबांचा लेखसंभार आणि चरित्र हीं ते महाराष्ट्रास सादर करून हजारों वाचकांच्या आजवर अतृप्त राहिलेल्या आकांक्षा सत्वर तृप्त करतील असा भरंवसा आम्हांस वाटतो.

### समाजाची उंची वाढविणारा नाटककार

नाटककार म्हणून काकासाहेब खाडिलकरांनीं केलेली कामागिरी त्यांच्या वृत्तपत्रीय कामगिरीपेक्षांहि एक प्रकारें अधिक विख्यात आहे. नाटकांचे प्रेक्षक विविध वर्गांतले तर पक्षवादी वर्तमानपत्रांचे वाचक पक्षांतच अधिक ! नाटकांची रुचि भिन्न भिन्न वर्गांतील लोकांतहि आढळते; पण तीच गोष्ट वर्तमान–पत्रांसंबंधानें आपणांस सांगतां येणार नाहीं. सार्वजनिक चळवळींची अभिरुचि असणाऱ्या वर्गांतच वर्तमानपत्रांची कदर होते; परंतु नाटकांचा प्रेक्षकवर्ग मनोरंजनाकडे ओढ असलेला, हौशी आणि रसिक असतो.

या नाट्यप्रिय वर्गाचीहि उपेक्षा काकासाहेबांनीं केली नाहीं. त्यांनीं एकाहून एक वरचढ अशीं चौदा नाटकें लिहून आपणास 'नाट्याचार्य' म्हणून यथार्थपणें म्हणवून घेतलें. नटश्रेष्ठ बालगंधर्व आणि नाट्याचार्य खाडिलकर यांनीं मराठी नाट्यसृष्टीवर अनिर्बंध प्रभुत्व दोन तपांवर गाजविलें ! या त्यांच्या यशाला तोड नाहीं.

खाडिलकरांनीं आपलीं नाटकें केवळ मनोरंजनासाठीं लिहिलेलीं नाहींत हें सर्वमान्य आहे. अगदीं 'सवाईमाधवरावांचा मृत्यु' किंवा 'कांचनगडची मोहना' हीं त्यांचीं पहिलीं पहिलीं नाटकें घेतलीं तरी त्यांच्या मनांतले, लोकांच्या चित्तास कांहीं चटका लावावा, वीरवृत्तींचें पोषण करावें वगैरे, हेतू स्पष्ट दिसून येतात. त्यांच्या 'कीचकवधा'वर तर सरकारनें बंदीच घातली ! पौराणिक कथा घेऊन त्यांच्या द्वारें कालोचित वृत्तींचें पोषण करण्याचें त्यांचें कौशल्य अनन्यसाधारण होतें. मोठा कलावंत आपल्याबरोबर आपल्या समाजाचीहि उंची वाढवितो याचें काकासाहेब खाडिलकर हें एक उत्तम उदाहरण आहे.

केळकर–खाडिलकर हे दोघे टिळकशिष्य नाटकी झाले म्हणून कित्येक सोंवळे टिळकपंथी नाकें मुरडीत हें आम्हांस माहीत आहे. टिळकांना आपल्या शिष्यांची ही वृत्ति नापसंत असल्याचा पुष्कळ बोभाटाहि कानीं येत होता; परंतु या प्रवादांत तितकेंसें तथ्य नाहीं. परिणामकारक नाटकाचें जनजागृतीस केवढें साहाय्य होऊं शकतें, ही गोष्ट टिळकांना चांगली अवगत होती.

### "हाथी चलत है अपनी गतमों"

खाडिलकर भाषणें करीत तेव्हांहि त्यांच्या वृत्तींतील सारा आवेश आणि गांभीर्य दिसून येत; पण एकंदरींत ते थोडेंच बोलत हें खरें. अगदीं शेलक्या मंडळींच्या बैठकींत ते मोकळेपणानें हास्यविनोदहि करीत; पण एरव्हीं ते लोकांशीं किंवा लोक त्यांच्याशीं बोलत असे प्रसंग विरळाच ! केळकरांचें याच्या अगदीं उलट असे !

खाडिलकर बोलत क्वचित्, येवढेंच नाहीं तर ते कधीं वादविवादांतहि भाग घेत नसत. त्यांच्या नाटकांवर येवढ्या टीका झाल्या, इतकीं भाष्यें झालीं ! पण खाडिलकरांनीं एक वार 'काळ' पत्रांत सवाई माधवरावांच्या मृत्यूच्या प्रकरणीं लिहिलेला लेख सोडला, तर त्या टीकांना अगर भाष्यांना उत्तरादाखल चकार शब्दहि त्यांनीं काढिला नाहीं. खुलासा नाहीं, समर्थन नाहीं, कांहीं कांहीं नाहीं ! 'हाथी चलत है अपनी गतमों' हा त्यांचा बाणा ! पन्नास वर्षें ते लेखणी हातांत घेऊन समाजासमोर उभे होते; परंतु असल्या कामासाठीं त्यांनीं टांक शाईत बुडविला








असेल तर शपथ ! हा संयम विलक्षण तर खराच; तथापि या मौनामुळें त्यांनीं अनेकांची निराशा केली हेंहि तितकेंच खरें !

असो ! असा बाणेदार देशभक्त, ज्वलंत लेखन-तपस्वी, चतुर आणि प्रभावी नाटककार व निष्कलंक चारित्र्याचा, धीमा, धडाडीचा आणि धैर्यवान् मार्ग-दर्शक आपल्यांतून गेला याबद्दलची हळहळ केव्हांहि कमी होणार नाहीं.

---

## जगावरील भावी दुष्काळाचें अरिष्ट !

सर्व जगाची लोकसंख्या हल्लीं सुमारें दोनशें कोटींच्या वर असून ती दरवर्षी दोन कोटींनीं वाढत आहे असें दिसून येतें. तीनशें वर्षांपूर्वी ही वाढ त्या मानानें फार मंद अशी होत असे. परंतु गेल्या दोनशें वर्षांत वैद्यक आणि सार्वजनिक आरोग्य यांच्या शास्त्रीय प्रगतीमुळें ही वाढ भरधांव होत आहे. महायुद्धांत भयंकर प्राणहानि होऊनसुद्धां जगाच्या लोकसंख्येंत वीस कोटींची भर पडलेली दिसून येते.

१८ व्या शतकाच्या मध्यकालीं युरोपची लोकसंख्या चौदा कोट होती ती हल्लीं ५० कोट झाली आहे. अतिपूर्वेकडील देशांतून तर लोकसंख्येच्या वाढीचें प्रमाण बघून अचंबा वाटल्याशिवाय रहात नाहीं. चीनमध्यें लोकसंख्या ५५ कोट आहे. हिंदुस्थानांत व पाकिस्तानांत मिळून ४० कोट आहे. सर्वसाधारण मृत्यूचें त्याचप्रमाणें मुलांच्या अपमृत्यूंचें प्रमाण बरेंच मोठें असूनही हिंदुस्थानची व पाकिस्तानची लोकसंख्या एक शतकानंतर ९० कोट होईल असें आतांपर्यंतच्या वाढीच्या प्रमाणावरून म्हणतां येईल. आपल्या पुढील पिढींत सर्व जगाची लोकसंख्या आणखी ५० कोटींनीं वाढलेली दिसेल. जगांतील आरोग्यसंघटनेचा कार्यक्रम जर यशस्वी झाला तर ही वाढ शंभर कोटींपर्यंत जाईल.

या भराभर वाढणाऱ्या लोकसंख्येला खायला मिळून त्यांचें शरीरपोषण कसें होणार हा खरोखरी मोठा प्रश्न आहे. या वाढत्या लोकसंख्येबरोबर शेतजमिनींचा सुपीकपणा कमी होत आहे, याचा विचार केल्यास ह्या प्रश्नाचें स्वरूप अधिकच गंभीर आणि भीतिदायक दिसूं लागतें. शेतजमिनींवरील माती धुपून जाऊन त्यांचा सुपीकपणा कमी होत आहे. शेतजमिनीवरील एक इंचाचा सुपीक थर घडवायला निसर्गाला पांचशें वर्षें लागतात परंतु अदूरदर्शी आणि स्वार्थी मनुष्य सुपीक जमिनीवरील आठ इंच थर केवळ दोनतीन पिढ्यांत नष्ट करूं शकतो. अशा रीतीनें जमिनी नापीक बनून वाळवंटाचा विस्तार वाढत आहे. म्हणून पुढें जगाची उपासमार व्हायची नसेल तर ही जमिनीची धूळधाण तावडतोब थांबविली पाहिजे. झाडें व अरण्य यांची लागवड केली पाहिजे. अमेरिकेंत दोन झाडें लावतात तर तीन झाडें कापतात; हें उलटें प्रमाण तात्काळ थांबविलें पाहिजे. ज्या प्रचंड उत्साहानें आपण हिटलरशीं सामना देऊन त्याला जमीनदोस्त केलें, तितक्याच उत्साहानें हा भावी दुष्काळाला पण जमीनदोस्त केलें पाहिजे.''

— **सर जॉन बाईड ऑर**

यू. एन्.च्या फूड आणि ॲग्रिकल्चरल ऑर्गनायझेशनचे माजी डायरेक्टरजनरल, यांच्या मुलाखतीचा सारांश.

(संडे न्यूज १८।५।४८)








संकलनकार **प्रा. प्रभाकर माचवे**

# भारतीय साहित्य व संस्कृति

[ मधून मधून 'नवभारतां'तून या सदराच्या द्वारें प्रा. प्रभाकर माचवे यांनीं हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भाषांमधील समकालीन वाङ्मयांतून सुंदर सद्विचार व सद्भाव प्रकट करणाऱ्या वेंचक उताऱ्यांचें संकलन करून तें अनुवादरूपानें 'नवभारता'च्या वाचकांना सादर करण्याचें योजिलें आहे. त्यावरून भिन्नभिन्न भाषाभगिनींचें मनोगत व तद्द्वारा प्रकट होणारी भारतीय संस्कृतीची एकात्मता यांचा वाचकांना परिचय होईल असा दृढ विश्वास वाटतो.– प्रा. माचवे यांचे आम्ही अत्यंत आभारी आहों.—का. सं.]

### आज ती ज्योत विझली

वामिक अहमद मुजतबा नांवाच्या तरुण उर्दू कवीच्या गांधीविषयक कविता—'जवाब इसका कौन दे?' व इतर कविता युक्तप्रांतांत, रेडिओवर व इतरत्र फार लोकप्रिय झाल्या आहेत. त्यांपैकीं एक 'हंस'च्या अंकांत प्रसिद्ध झाली आहे. ती मूळ व तिचा अनुवाद येथें देत आहें:—

( उर्दू )

आज वह शमा बुझ गई जिससे
रोशनी दिलकी कायनात में थी
मौतने उसको हमसे छीन लिया
जिंदगी जिसकी बात–बात में थी ।
जिंदगीभर तू रहा गर्मे सफर
औ' बनाता रहा दिलोंमें घर
मर गये आज तेरे खुद कातिल
औ' तू मरके हो गया है अमर ।
घुप अँधेरे को रोशनी बख्शी
पस्त कौमों को बरतरी बख्शी
गोलियाँ खाके तूने छातीपर
मरनेवालों को जिंदगी बख्शी ।
तेरा सीना था हक ज्वालामुखी
जिसमें रोशन थी आग अहिंसाकी
मरते–मरते भी तूने अपनी जबीं
अपने कातिलके सामने रख दी ।
तेरे आदर्श के महकते बाग
ढूँढनेवाले पा गए हैं सुराग
तेरे नक्शे–कदम हैं यों रोशन
जैसे जलते हों रास्ते में चिराग ।

अनुवादः——

आज ती ज्योत विझून गेली, जिनें
या हृदयाच्या विश्वाला दीप्त केलें होतें.
ज्याच्या प्रत्येक गोष्टींत जीवन भरलें होतें,
त्याला मृत्यूनें आमच्यांतून हिरावून घेतलें.
जीवनभर तूं प्रवासी राहिलास
व प्रत्येक हृदयांत घर केलेंस.
आज तुला मारणारे स्वतः मेल्याहून मेले झालेत
व तूं मरूनहि अमर झाला आहेस.
अंधार फार होता. त्याला उजळलेंस.
निराश जातींना हिम्मत दिलीस.
स्वतःच्या छातीवर गोळ्या झेलून
तूं मरणाऱ्यांना जीवदान दिलेंस.
तुझें अंतःकरण एकाद्या ज्वालामुखीप्रमाणें होतें.
त्यांत अहिंसेची आग जळत होती.
मरतां–मरतांना सुद्धां तूं आपलें मस्तक
आपल्या मारणाऱ्याच्यां हातीं ठेवून दिलेंस.

तुझ्या आदर्शाची बाग अजूनहि सुगंधानें डंवरत आहे. जे शोधणारे असतात, त्यांना तिचा पत्ता लागला आहे. तुझीं पदचिन्हें अशीं प्रकाशत आहेत कीं जणूं रस्त्यांत दिवे तेवत असावे !








## ' सहज '-साधना

शांतिनिकेतनचे हिंदी आचार्य पं. हजारीप्रसाद द्विवेदी यांचे विविध निबंध 'अशोक के फूल' नांवानें 'सस्ता-साहित्य-मंडळ, दिल्ली'हून प्रसिद्ध होणार आहेत. तीन वर्षांपूर्वी काशी येथें प्रसाद-परिषदेंत त्यांनीं अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणांतील हा मननीय अंश पाहाः—

'सत्य आपली संपूर्ण किंमत मागतें. त्याच्याशीं कोणत्याहि प्रकारें समझोता होऊं शकत नाहीं. साहित्यांतील चरम सत्य मिळवावयाचें असेल तर पूर्ण किंमत द्यायला हवी. जे लोक नेहमीं पावलो-पावलीं सहज साधनांची चर्चा करतात, त्यांची कदाचित् मोठ्या ध्येयाकडे दृष्टि नसते. मनुष्याच्या उच्चतर व उच्चतम ध्येयाप्रत पोंचण्यासाठीं दैनंदिन व्यवहारांत येणाऱ्या गोष्टींशीं तह करून काम भागणार नाहीं. कठोर संयमानें आणि त्यागानेंच वृत्तींना मोठेंपण देतां येईल. जी गोष्ट एका क्षेत्रांत खरी, तीच सर्व क्षेत्रांत खरी—साहित्यांत, भाषेंत, आचार-विचारांत,.- सर्वत्र ! भाषाच घ्या-मनुष्य आपल्या आहारनिद्रेची साधनें गोळा करण्यासाठीं ज्या भाषेचा व्यवहार करतो, ती त्याची अनायासलब्ध भाषा आहे. परंतु जर या सपाटीवरून उंच जायचें असेल तर तेवढ्या भाषेनें काम चालणार नाहीं. सहज भाषा आवश्यक आहे. परंतु सहज भाषेचा अर्थ आहे 'सहज महान् बनविणारी भाषा', रस्त्यांतून संग्रह करून मिळविलेली भाषा नव्हे. कबीरदासांनीं म्हटलें आहेः—

सहज सहज सब कोई कहै,
सहज न बूझे कोई।
जिन सहजैं विषया तजी,
सहज कहीजै सोई॥

सहज विषयवासनेचा त्याग हें मोठें कठिण काम आहे. सरळ रेघ काढणें अत्यंत जिकिरीचें काम आहे. सहज भाषा येण्यास कठोर तप हवें. जोंवर मनुष्य सहज होत नाहीं, तोंपर्यंत भाषा सहज होणें असंभव. स्वदेश-परदेशच्या अतीत-वर्तमान सर्व वाङ्मयाचें सार ज्यानें घेतलें त्याला हा सहजभाव मिळाला. कबीर म्हणतोः—

चाढिये हाथी ज्ञानको, सहज दुलीचा डारि।
स्वानरूप संसार है, भूँखन दे झख मारि॥

रवींद्रनाथांनीं स्वतःला संबोधून म्हटलें आहेः—
'अरे मना, तूं सहज बन. सहज हो. तुला सहज व्हावेंच लागेल. जो जवळची वस्तु दूर ठेवून देतो, त्यापासून दूर राहा. तूं आपले दोन्ही हात पसरतोस कशाला ? दान हवें का तुला ? हो, हवें आहे; हे दाता ! जेव्हां तूं सहज देऊं शकशील तेव्हां सहज घेऊंहि शकशील. अरे मना, तूं सहज हो, सहज. तुला सहज व्हावेंच लागेल. हे कवे, तूं आपल्या वचनरचनेबाहेर निघून ये.-तुझ्या सर्व गोष्टींच्या बाहेर हें त्रिभुवन आपलें हृदय मोकळें करून पसरलें आहे. तो पाहा, प्रभात-रवि नीरव पुष्पांच्या डोळ्यांकडे पाहत आहे. अरे मना, तद्वत् सहज हो.'
मूळ कविता अशीः—

सहज हबि, सहज हबि, ओ रे मन, सहज हबि !
काछेर जिनिस दूरे ए'ले, ता'र थेके तुइ दुरे र'बि।
केन रे तोर दु हात पाता, दान तो ना चाइ-चाइ
हे दाता !
सहजे तुबि दिबि जखन, सहजे तुइ सकल लबि।
सहज हबि, सहज हबि, ओ रे मन, सहज हबि।
आपन वचन-रचन हते बाहिरे हये आय् रे कवि,
सकल कथार बाहिरे ते भुवन आछे हृदय पेते,
नीरव फुलेर नयन पाने चेये आछे प्रभात रवि।
ओरे मन, सहज हबि !

---

## चिनी माझे बंधू

आचार्य गुरुदयाल मल्लिक (शांतिनिकेतन) यांचा हा लहानसा लेख सरकारी हिंदी मासिक 'आजकल'च्या एप्रिल १९४८च्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे. त्याचा अनुवाद खालीं देत आहें:—

'अरबांच्या पैगंबराचें म्हणणें आहे कीं, जर ज्ञान-पिपासा शांत करावयाची असेल तर चीनपावेतों यात्रा करण्याची तयारी हवी.

मीं अनेकदां आश्चर्यानें विचार केला आहे कीं, इस्लामी भ्रातृत्वाचा संदेश देणाऱ्या त्या महापुरुषानें आमच्या शेजारच्या चीन देशाबद्दलच कां म्हटलें आहे ? कदाचित् यासाठीं कीं त्यांच्या मनाच्या पीठिकेंत अरब व चीन यांच्या जुन्या स्नेह-







संबंधांची आठवण कायम असेल. ते स्नेहसंबंध मध्यंतरींच्या राजकीय उद्दंडतेमुळें कांहींसे दुरावले होते. किंवा कदाचित् त्या काळीं भारत व अरब यांपेक्षां आफ्रिका व चीन या देशांत अधिक जिवंत आदानप्रदान—देवाणघेवाण (आणि हाच तर 'सांस्कृतिक' विनिमय) चालली होती. त्यामुळें त्यांनीं आपल्या श्रोत्यांना सत्याच्या शोधासाठीं भारतांत न जातां चीनमध्यें जाण्याचा आदेश दिला. त्या वेळीं भारत व अरब यांत एकमेकांचे इतके घनिष्ठ संबंध होते काय कीं त्यांची वाणी दोघांनाहि लागू पडली?

कांहींहि असो, हें मात्र निर्विवाद खरें कीं महंमदाच्या काळीं चीन देशाच्या ज्ञानश्रेष्ठतेची ख्याति सर्वत्र होती. यासाठींच त्यांनीं चीन देश म्हणजे ज्ञान–स्तंभ असें घोषित केलें.

वस्तुतः विश्वसंस्कृतीच्या भांडारांत चीनचा विशेष असा काय वांटा आहे? कविगुरु रवींद्रनाथांच्या शब्दांत हा वांटा असा आहे:—आपल्या जवळपासच्या वस्तूंमध्यें निहित 'गोपन छंदा'चा सजीव साक्षात्कार. कारण, असें पाहा कीं, इतर देशांनीं आपली दृष्टि एक तर आकाशांत तरी खिळविली किंवा तिला जमिनींतच गाडून टाकलें. फक्त चिनी लोकांनीं धरित्रीच्या या प्रपंचांत सामावलेल्या रहस्यमय जंजाळांत येवढ्या विशिष्ट तालाचें व लयाचें दर्शन करून घेतलें कीं त्या तालामुळें व लयबद्धतेमुळेंच संसाराला सार्थकता लाभलेली आहे.

चीन देशाचें हेंच वैशिष्ट्य आहे. तेथले रहिवासी आकाश व पाताळ यांचीं टोंकें मिळवूं इच्छितात. यामुळेंच आमच्या चिनी बांधवांत एकसमयावच्छेदेंकरून परिहास व परमार्थ यांबद्दल सारखाच अनुराग आढळतो. त्यांच्यांत कला आहे, कौशलहि आहे, दर्शन आहे व अध्यात्महि आहे; ते स्तब्ध राहणें जाणतात व अक्लांत श्रम करणेंहि जाणतात. संसारांत रस घेणेंहि त्यांना ठाऊक आहे व संसारांत सामावलेला गुप्त रस शोधणेंहि त्यांना माहीत आहे.

यामुळेंच मी जेव्हां माझ्या चिनी मित्राकडे पाहतों तेव्हां माझ्या मनांत एकच चित्र उभें राहतें—एकाद्या प्रशांत सरोवराच्या कांठीं उमललेल्या कमळाची शोभा. चिन्याभोंवतीं असेंच सौम्य शांतीचें वातावरण पसरलेलें असतें. जराशी गडबड झाली कीं त्यानें कांसवाप्रमाणें आपले हातपाय आंत ओढून घेऊन शांततेच्या कवचांत स्वतःला गुरफटून घेतलेंच म्हणून समजावें.

आज जग जेव्हां खरोखरींच वेड्यांच्या इस्पितळाप्रमाणें बनत चाललें आहे, तेव्हां आपण चीन देशाची तीर्थयात्रा करावयास जाणें आणि तेथील संसारांत सामावलेल्या 'गोपन छंदा'ला ओळखावयास शिकणें यापेक्षां अधिक चांगलें व योग्य असें काय असणार? तेथें गेल्यावर आम्हांला कळेल कीं कर्मप्रवाह हा कर्महीन अशा मौनांत लपलेला आहे.

———

## 'अवधी' लोकगीत

लखनौ–रेडिओवर बुद्धिभद्र दीक्षित 'पढीस' नांवाची, खेडवळ कार्यक्रम करणारी, एक प्रतिभाशाली व्यक्ति होती. ती बऱ्याच वर्षांपूर्वी वारली. त्या गृहस्थानें अत्यंत सुंदर जानपदगीतें रचलीं आहेत. 'खेत राजा' नांवाचें हें गीत अवधी बोलींत आहे:—

जाग जाग मोरे खेत राजा, अब काहे मुरझाने?
तुइ दुखिया किसान की आसा
तुइ पलटइ जीवन का पासा
काहे मन सकुचाने?
जाग जाग तुइ सब दुख हर ले
सुख–संपतिसे घर मोरा भर दे
तुम्हरी सरनि लुकाने!
जाग जाग मोरे खेत राजा, अब काहे मुरझाने?
(आजकल, दिल्ली.)

(अर्थः—माझ्या शेत–राजा, ऊठ; आतां कां म्हणून मलूल आहेस? तूंच दुःखी किसानांची आशा आहेस, तूंच जीवनाचा डाव पलटवूं शकणारा आहेस; मग कां हा संकोच? जाग जाग, तूं सर्वांचें दुःख हरण कर, सुखसंपत्तीनें माझें घर भरून टाक.—तुझ्याच आसऱ्यानें, तुझ्याच कुशींत मी लपलों आहें. जाग, शेता जाग.)










# पुस्तक-परीक्षण

## काव्याचीं भूषणें

( लेखकः—प्रा. **मधुकर वासुदेव धोंड**, एम्. ए., एलुएल्. बी., कर्नाटक कॉलेज, धारवाड.
पारिजात-प्रकाशन ( १९४८ ), पुष्प १६९वें, किंमत ५ रु. )

अलंकार-प्रकाश, अलंकार-चंद्रिका, अर्थालंकार-निरूपण यांसारखीं अलंकारांची चर्चा करणारीं पुस्तकें मराठी भाषेंत असलीं तरी 'काव्याचीं भूषणें' या प्रा. धोंड यांच्या सुंदर पुस्तकाचें आनंदानें स्वागत करावें असें वाटतें. अलंकारांचें विवेचन करावयाचें असल्यास शब्दालंकार आणि अर्थालंकार यांचीं नुसतीं लक्षणें आणि उदाहरणें देऊन तात्पुरता कार्यभाग होईल; परंतु ज्यांत अलंकारांना विशेष महत्त्व आहे अशा काव्याचें स्वरूप कोणतें, त्यांत रस, अलंकार, रीति, वक्रोक्ति इत्यादिकांचें स्थान काय व त्यांचे परस्पर-संबंध कोणते, या गोष्टींचें निरूपण आवश्यक असतें. सुमारें चाळीस पृष्ठांच्या प्रास्ताविक विभागांत या प्रकारचें सुंदर विवेचन थोडक्यांत आणि सुबोधपणें केलेलें आहे. केवळ जुन्या गोष्टींचा हवाला न देतां लेखकानें रस व अलंकार यांविषयीं आपली स्वतंत्र भूमिका मांडली आहे आणि अलंकारांच्या वर्गीकरणाची कांहीं निराळी दिशा दाखविली आहे. आरंभींच्या ७।८ पृष्ठांमध्यें अलंकारशास्त्राचा संक्षिप्त इतिहास दिला असून भरतमुनींपासून जगन्नाथपंडितांपर्यंत होऊन गेलेल्या नामवंत साहित्याचार्यांची ओळख करून दिली आहे. या प्रकारें हा प्रास्ताविक विभाग आटोपशीर आणि सर्वांगसुंदर झाला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

प्रस्तुत ग्रंथाचा एक लक्षणीय विशेष म्हणजे त्यांतील अलंकारांच्या लक्षणांमध्यें आणि तुलनात्मक विवेचनामध्यें दिसून येणारी सूक्ष्मता आणि स्पष्टता. त्यामुळें प्रतिपाद्य अलंकाराचें ज्ञान निश्चयात्मक होतें, त्यांत संदिग्धता राहत नाहीं. इतर शास्त्रांमध्यें ही चिकित्सा नीरस व रूक्ष वाटण्याचा संभव असतो; परंतु काव्यशास्त्रामध्यें समर्पक आणि रसात्मक उदाहरणांची प्रसन्नता सारखीच अनुभवण्यास मिळते. साहित्यशास्त्रांत गोडी उत्पन्न होण्याचे कामीं सुंदर काव्यपंक्तींचा मोठाच उपयोग होतो. काव्यप्रकाशाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना ही गोष्ट नित्य परिचयाचीच आहे. प्रस्तुत पुस्तकांतील उदाहरणें तर अत्यंत मार्मिकपणें निवडलेलीं व रसपूर्ण अशीं आहेत व त्यांपैकीं बरींच अगदीं अर्वाचीन मराठी काव्यवाङ्मयांतील असल्यामुळें विश्वविद्यालयांतील विद्यार्थ्यांना चित्ताकर्षकहि वाटतील.

आतां लेखकाच्या अलंकारविषयक भूमिकेचा थोडा विचार करूं. जैसें आंगाचेनि सुंदरपणें। लेणिया आंगाचि होय लेणें। तेथ अलंकारिलें कवण कवणें। हें निर्वचेना ॥ आलंकार हे केवळ आगंतुक आहेत, हे काव्यशरीरावरचे दागिने वाटेल तेव्हां घालावे किंवा तेथून उतरावे, अलंकारिक काव्य रस-शून्य असतें, इत्यादि भ्रामक कल्पनांना रजा देऊन अलंकार हे स्वाभाविक व रससिद्धीस उपकारक असतात ही भूमिका लेखकानें सोदाहरण सिद्ध केली आहे. अलंकारांवाचून काव्य सरस होणार नाहीं असें नव्हे. परंतु सरस काव्यरचनेच्या वेळीं स्फुट किंवा अस्फुट अलंकार कवीकडून अगदीं सहजपणें योजिले जातात. पुष्कळ अलंकारांच्या मुळाशीं साम्य, विरोध इत्यादि संबंध आहेत, याचें कारण कोणताहि प्रसंग किंवा विचार कवीच्या मनास जेव्हां झोंबतो, तेव्हां त्याच्या पूर्वस्मृती जागृत होतात व तो विविध










दृश्यें पाहूं लागतो. कवि-मनाचा हा कल्पनाप्रवाह काव्यनिर्मिति आणि रससिद्धि यांस फार आवश्यक असतो. काव्याचा विषय आणि त्याच्या चिंतनामुळें उत्पन्न होणाऱ्या पूर्वस्मृती यांतील संबंध साम्य, विरोध, कार्यकारणभाव, स्थल व काल इत्यादि प्रकारचा असतो व त्यावरच अनेक प्रकारचे अलंकार-अभिधानप्रकार आधारलेले असतात. अलंकारांच्या वर्गीकरणाची ही तत्त्वमीमांसा अलंकारसर्वस्व, साहित्य-दर्पण इत्यादि प्राचीन साहित्यशास्त्रकारांस संमत अशीच आहे. यापुढें प्रस्तुत लेखकानें या सर्व विविध संबंधांवर आधारलेल्या अलंकारराशींच्या मुळाशी सर्वांना समान असें एक व्यापक आत्मस्थानीय तत्त्व शोधण्याचा प्रयत्न केला आहे. अलंकारांचा आत्मा अप्रस्तुतप्रशंसा होय ही कल्पना विचारार्ह आहे हें खरेंच. कारण, बहुतेक अलंकारांमध्यें प्रस्तुतार्थाचा नीट उठाव व्हावा म्हणूनच अप्रस्तुताचें कथन असतें. सर्वत्रच उपमेय आणि उपमान यांसारखा साम्यभाव असतो असें नव्हे. कोठें कार्यकारणभाव, आधाराधेयभाव वगैरे इतर संबंधहि असतात. म्हणून प्रकृत, अप्रकृत, प्रस्तुत, अप्रस्तुत, अशा पारिभाषिक शब्दांचा उपयोग केला जातो. शृंखलाबंधमूल, तर्क-न्यायमूल, काव्यन्यायमूल, गूढार्थप्रतीतिमूल अलंकार केवळ सादृश्यगर्भ किंवा विरोधगर्भ नाहींत. तेव्हां इतर संबंधांचें ग्रहण व्हावें म्हणून अप्रस्तुतप्रशंसा हा अलंकाराचा आत्मा असें प्रतिपादन करण्यांत आलें आहे. अर्थात् स्वभावोक्ति आणि 'उदात्तं वस्तुनः संपद्' असा म्हणजे ज्यांत वस्तूच्या समृद्धतेचें आणि संपन्नतेचें वर्णन केलेलें असतें असा उदात्त अलंकार, यांत केवळ प्रस्तुत-प्रशंसाच असते. येथें अप्रस्तुत-प्रशंसेचें तत्त्व लावतां येत नाहीं, हें ग्रंथलेखकानें मान्य केलेंच आहे. तसेंच "अनुप्रासयमकादि शब्दालंकार आणि यथासंख्य, परिकर, परिसंख्या, सार, कारणमाला, एकावलि, मालादीपक इत्यादि आजपर्यंत अर्थालंकारांच्या सदरांत समाविष्ट झालेले अलंकार यांविषयीं अप्रस्तुत-प्रशंसेचें तत्त्व चरितार्थ होत नाहीं; हे केवळ अर्थाच्या अभिव्यक्तीचे अलंकार असून किंचित् चमत्कृति उत्पन्न करणारे आहेत; यांचा रसाशीं संबंध नाहीं, अर्थात् यांस अर्थालंकार समजूं नये," असें म्हणून ग्रंथकारानें निर्वाह केला आहे.

परंतु या मार्गानें जातांना येणाऱ्या अडचणी येथेंच संपत नाहींत. 'स्कंधीं शिर आधारी, त्याच्या ती मृदुल कर गळां घाली। भ्याली भीरु, उसासे, स्फुंदे, अत्युष्ण आंसवें ढाळी॥' हा कारकदीपक अलंकार आहे. यांत 'ती' या एकच कर्त्याचा-शिर आधारी, कर गळां घाली, उसासे, स्फुंदे व आंसवें ढाळी-या अनेक क्रियापदांशीं संबंध आला आहे. येथें प्रस्तुत कोणतें आणि अप्रस्तुत-प्रशंसा कोणती ? सर्व कांहीं प्रस्तुताचेंच म्हणजे त्या स्त्रीच्या विकल अवस्थेचें वर्णन आहे व त्यांतील प्रत्येक क्रियापदाशीं झालेला 'ती' या एकच कर्त्याचा संबंध सारखाच सुंदर समजला पाहिजे. अशीच अडचण कमी-अधिक प्रमाणानें इतर कांहीं अलंकारांत येणार आहे.

अलंकार हे अंतःकरणांतील भावना छेडण्याचें कार्य करतात व काव्यनिर्मितीमध्यें स्वाभाविकपणें अवतीर्ण होतात. ज्या ज्या प्रकारांनीं कवीची रसमयी वृत्ति व्यक्त केली जाईल त्या त्या सर्व प्रकारांना अलंकार म्हटलें पाहिजे. अर्थशोभाकरान् धर्मान् अलंकारान् प्रचक्षते। शब्दार्थांना ज्याच्या योगें सौंदर्याचा संविभाग मिळतो तो वाक्प्रकार म्हणजे अलंकार. कविप्रतिभेचे उन्मेष नित्यनूतन असल्यामुळें आणि ललित कलाकृतीमध्यें कलावंताच्या व्यक्तिमत्त्वाचें सर्वाधिक महत्त्व असल्यामुळें त्याला भासणाऱ्या सौंदर्याची अभिव्यक्ति तो अनेक प्रकारें करील. त्या सर्वांचा समावेश अप्रस्तुतप्रशंसेंत होईलच असें नाहीं. ज्याला रसाळ काव्य म्हणतां येईल, तें 'अनलंकृती पुनः क्वापि।' असेंहि असूं शकेल. याच कारणानें, 'विदग्ध लोकांची बोलण्याची पद्धति' इतकाच 'वक्रोक्ति' शब्दाचा अर्थ केल्यास सर्व उत्तम काव्याचा परामर्श त्यामुळें घेतला जाईल असें नाहीं. अगदीं साधी परंतु रसात्मक उक्तीहि शब्दार्थशोभा उत्पन्न करूं शकते, भावसौंदर्य निर्माण करूं शकते. ग्रंथकारानेंच दिलेलें पुढील उदाहरण घेऊं:—

तूं जीव, तूं हृदय, तूं मजला विसांवा
तूं चंद्रिकाच नयनां, शरिरा सुधा वा।
मोहीं जिला वदुनि यापरि गुंतवावें
तीशीं असें कपट.........॥







रामानें गरोदर सीतेस विश्वासघात करून वनांत सोडलें, या गोष्टीचें तिची वनवासांतील मैत्रीण वासंती हिला आत्यंतिक दुःख होतें. त्याचें पूर्णतेनें वर्णन तिला करतांच येत नाहीं ! ती शेवटचें वाक्य अर्धवटच सोडते. या भाषणांत वर्णिलेली रामाच्या कृतीची कठोरता तशीच वासंतीच्या दुःखाची तीव्रता केवळ अनिर्वचनीय असून सर्व भावसौंदर्य या ठिकाणीं रूपकोत्प्रेक्षांमुळें नव्हे तर काव्याच्या सूचकतेमुळें–रसध्वनीमुळें उत्पन्न झालें आहे; त्यांत अप्रस्तुत प्रशंसेचा भाग नाहीं. अशा रसात्मक वाक्याला 'आक्षेप' अलंकार असें नांव दिलें तरी त्यांत प्रस्तुत–अप्रस्तुताचा संबंध दाखवितां येत नाहीं. जसें वक्रोक्तीमध्यें सौंदर्य असतें तसेंच तें काव्यांतील स्वाभाविक उक्तीमध्येंहि मोठ्या प्रमाणांत असतें हें संतकाव्य आणि पंडितकवींचें काव्य यांच्या अभ्यासकांस अवगत आहेच.

साम्य, विरोध, कार्यकारणभाव आणि स्थल-काल–व्यंजकत्व इत्यादि संबंध बऱ्याच अलंकारांच्या मुळाशीं असले, तरी साम्यविरोधांइतके पुढील संबंध सालंकार काव्यांत प्रभावी नाहींत. उत्तरोत्तर ते क्षीणबल असल्यामुळें त्या सर्वांचा अप्रस्तुत–प्रशंसेमध्यें समर्थपणें समावेश करणें कठिण आहे. अलंकारांच्या मुळाशीं बराचसा बुद्धिविलास असतो. साम्यविरोधाचें दर्शन हें बुद्धीचें कार्य. तथापि त्या कार्याला कलावंताच्या रससौंदर्याच्या अभिनव अनुभवांतूनच प्रेरणा मिळते आणि त्याचें मनश्चक्र व्यापार करूं लागतें. काव्यनिर्मितीमध्यें केव्हां स्वभावोक्तीचें माधुर्य असेल, केव्हां बुद्धिविलासाचें वैदग्ध्य असेल. या दोनाहि प्रकारच्या सरस उक्तींचें प्रवृत्तिकारण रससौंदर्य आणि त्याचे उन्मेष, कवीची सौंदर्यदर्शिनी रसमयी वृत्ति.

अलंकारांचें स्वाभाविकत्व ग्रंथकाराला मान्य आहेच. " अलंकाराचा आत्मा, अप्रस्तुतप्रशंसा " या मानसशास्त्रीय भूमिकेची आम्हीं थोडी अधिक चिकित्सा केली आहे इतकेंच. तीवरून 'काव्याचीं भूषणें' या ग्रंथाचें विचारास चालना देण्याचें सामर्थ्य कसें आहे याची चांगलीच कल्पना येईल. विषय जुनाच परंतु नवीन कल्पना, नवीन विचार व सरस उदाहरणें यांनीं त्याला एक प्रकारचा ताजेपणा आला असल्यामुळें अभ्यासकांकडून त्याचा आदर होईल यांत शंकाच नाहीं.

प्रा. य. र. आगाशे

---

**वासुदेव बाळकृष्ण केळकर** यांचीं त्राटिका व इतर नाटकें. संपादक व प्रकाशकः—डॉ. य. ग. लेले पुणें २, पृ. ८० + ३७२, किं. ८ रु.

मराठी नाट्यसृष्टीच्या आरंभकाळीं तिच्या पालनपोषणाचें कार्य ज्याप्रमाणें किर्लोस्कर व देवल यांनीं केलें, त्याचप्रमाणें तिच्या भरभराटीसाठीं पाश्चात्य नाटकांचीं भाषांतरें व रूपांतरें करण्याचें कार्यहि इंग्रजी शिकलेल्या विद्वानांनीं केलें आहे. इंग्रजी नाटकांचें मराठीकरण करण्याचा आद्य मान महादेवशास्त्री कोल्हटकर यांनाच द्यावा लागेल. महादेवशास्त्री कोल्हटकरांनीं १८६७मध्यें शेक्सपिअरच्या ऑथेल्लो नाटकाचें भाषांतर केलें व त्या भाषांतरित नाटकाचा प्रयोगहि दहा वर्षांनीं जनतेच्या नजरेसमोर झाला. यामुळें शेक्सपिअरचीं नाटकें, त्यांतील कथाभाग, त्यांतील अप्रतिम व्यक्तिरेखा, त्यांतील रचनेचें चातुर्य व सरस भाषाशैली लोकांच्या आवडीचा विषय बनून सुशिक्षित लोकांचें लक्ष शेक्सपिअरचीं नाटकें मराठींत आणण्याकडे वेधलें. जठार, प्रधान, महाजनि, कीर्तने व रानडे यांनीं मुख्यत्वें शेक्सपिअरच्या प्रसिद्ध नाटकांचें मराठीकरण केलें. हें मराठीकरण नाट्यदृष्ट्या इतकें यशस्वी व लोकप्रिय झालें कीं त्या कलाकृतीचा परामर्ष निबंधमालेंतून घेण्याची इच्छा विष्णुशास्त्री चिपळूणकरांना झाली व त्यानुसार १८८०च्या पूर्वींच निबंधमालेंतून, महाजनि यांच्या 'तारा' या रूपान्तरित नाटकाचें रसग्रहण प्रसिद्ध झालें. खुद्द आगरकर यांनींहि हॅम्लेट या शेक्सपिअरच्या जगत्प्रसिद्ध नाटकाचें 'मराठी' रूपांतर–'विकारविलसित'–केलें आहे. आगरकरांच्यानंतरहि शेक्सपिअरचीं नाटकें मराठींत आणण्याचें कार्य चालूच होतें, हें प्रा. वासुदेव बाळकृष्ण केळकर व प्रा. शिवराम महादेव परांजपे यांच्या कृतींवरून स्पष्ट होईल. या भाषांतरित व रूपान्तरित नाटकांनीं मराठी नाट्यवाङ्मय व रंगभूमि वैभवास आणली यांत शंका नाहीं.








# पुस्तक-परीक्षण

रूपान्तरें करून नाट्यसेवा करणाऱ्या नाटककारांत फर्ग्युसन कॉलेजमधील इंग्रजीचे ख्यातनाम प्राध्यापक कै. वासुदेव बाळकृष्ण केळकर यांचा उल्लेख केला पाहिजे. त्यांनीं शेक्सपिअरच्या नाटकांपैकीं 'Taming of the Shrew' व 'Antony and Cleopatra' यांची रूपान्तरें 'त्राटिका' व 'वीरमणि व शृंगार-सुंदरी' या नांवांनीं केलीं आहेत, तर 'लटपट्या पद्या' हें रूपान्तरहि एका पाश्चात्य प्रहसनावरून केलें आहे. प्रा. केळकरांनीं रूपान्तरित केलेलीं हीं नाटकें सध्यां दुर्मिळ झालेलीं आहेत. तरुण पिढीला हीं नाटकेंच नव्हेत तर कै. प्रा. केळकर व त्यांचें जीवनकार्यहि माहीत नाहींत. अशा वेळीं ही उणीव दूर व्हावी या हेतूनें डॉ. य. ग. लेले यांनीं मोठ्या आस्थेनें व परिश्रमानें प्रा. केळकरांचीं उपर्युक्त नाटकें पुनर्मुद्रित केलीं असून त्यांच्या संपादनाबरोबरच, त्यांचें जीवनकार्य व वाङ्मयकार्य यांची ओळख करून देणारी प्रस्तावना लिहिली आहे. मराठी नाट्यसृष्टीच्या या पडत्या काळांत डॉ. लेले यांनीं घेतलेल्या परिश्रमाचें कोणीहि सहर्ष स्वागतच करील.

कै. प्रा. केळकर यांच्या नाटकांचें सविस्तर परीक्षण करणें हें आजचें प्रतिपाद्य नव्हे. १८९१मध्यें करण्यांत आलेल्या या रूपांतराचें रहस्य व महत्त्व आजच्या दृष्टीनें प्रकट करून दाखविणें अन्यायाचें होईल. मराठी गद्यलेखनाला शुद्ध व डौलदार वळण लावून देण्याचा पहिला यशस्वी प्रयत्न जरी विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं केला असला, तरी चिपळूणकरांच्या ह्या प्रयत्नाची दिशा केवळ निबंधवाङ्मयापुरतीच मर्यादित आहे. कथा—कादंबरी—नाटक इत्यादि ललितवाङ्मयाच्या प्रांतांत चिपळूणकरांनीं प्रवेश केला नव्हता. मराठी नाटकांस स्थूलपणें १८४३ मध्यें आरंभ झालेला असला तरी 'नाट्यवाङ्मय' त्या वेळीं तयार झालें नव्हतें. ग्रांथिक स्वरूपाचें नाट्य—वाङ्मय तयार होण्यास सहजच १८६०पर्यंत काल लोटला.

संस्कृत नाट्यवाङ्मयाचा आधार घेऊन मराठी नाट्यलेखक पुढें सरकले, हें शाकुंतल, वेणीसंहार, उत्तररामचरित इत्यादि संस्कृत नाटकांवरून तयार झालेल्या मराठी प्रतिकृतींवरून सिद्ध होईलच. याच वेळीं युनिव्हर्सिटीची पदवीधर मंडळी तयार झाली व त्यांनीं पाश्चात्य नाट्यकृतींचा आधार घेऊन नाटकांचें मराठीकरण केलें. वि. ज. कीर्तने यांचें 'जयपाल' हें नाटक रूपान्तरित असूनहि विशेष गाजलें. त्यांच्यानंतर शंकर मोरो रानडे यांनीं तर 'नाट्यकथार्णव' सुरू करून शेक्सपिअरचीं सुप्रसिद्ध नाटकें मराठींत आणलीं. King Lear या नाटकाचें 'अतिपीडचरित' हें रूपान्तर आजहि जुन्या पिढीच्या चांगलेंच स्मरणांत आहे. आगरकरांचें 'विकारविलसित' हें शक्य तों मुळास धरून केलेलें रूपान्तर आजहि मान्यता पावलेलें आहे. मराठी नाट्यसृष्टीचा भाषांतर व रूपान्तर या स्वरूपांतील १८९१च्या पूर्वीचा इतिहास स्पष्ट असूनहि डॉ. लेले म्हणतात कीं, '**कै. प्रा. केळकरांनाच मराठी गद्य नाटकांचे युगप्रवर्तक मानलें पाहिजे आणि त्यांची नाट्यकृति रूपान्तरित नसून स्वतंत्र कृति मानली पाहिजे.**' डॉ. लेले यांचीं हीं दोन्हीं विधानें अतिशयोक्तिपूर्ण आहेत आणि तीं तशींच राहूं देण्यांत केळकरांच्या पूर्वी झालेल्या नाट्यकार्यास अपायकारक आहेत. म्हणून त्यांचाच येथें मुख्यत्वें परामर्श घेणें अगत्याचें ठरतें.

डॉ. लेले यांनीं प्रा. केळकर हे पूर्वी केसरी-मराठा या पत्रांचे संपादक होते ही हकीकत सांगितली किंवा ते इंग्रजी विषयाचे एक अधिकारी प्राध्यापक होते हें वृत्त सोदाहरण पटवून दिलें, याबद्दल कोणी आक्षेप घेणार नाहीं. उलट विस्मृति व अज्ञान यांचीं बसलेलीं पुटें दूर करण्याचें श्रेयच डॉ. लेले यांना मिळेल. परंतु शेक्सपिअरच्या दोन नाटकांतील पात्रांना व चालीरीतींना मराठी भाषा व संस्कृति यांचा पेहराव केळकरांनीं चढविला असतांहि तीं नाटकें रूपान्तरित न मानतां स्वतंत्र दर्जाचीं माना असा आग्रह धरणें हें सत्यास व वाङ्मयीन मूल्यांस सोडून होणारें आहे.

कोणत्याहि इंग्रजी ललितकृतीचें मराठींत भाषांतर करतांना, लेखकाचें दोन्हीं भाषांवर प्रभुत्व हवेंच. भाषांतरकर्त्याचें यश या वेळीं योग्य व अचूक शब्द हुडकून त्या शब्दांतून मूळचा अर्थ तंतोतंत पटवून देण्याच्या कुशलतेवर अवलंबून असतें. उदाहरणार्थ, डॉक्टर जॉन्सन यांच्या रासेलस या कादंबरीचें सरस







भाषांतर करतांना हेंच धोरण चिपळूणकर पिता–पुत्रांनीं समोर ठेवलें होतें. प्राध्यापक फडके यांची वादळ ही कादंबरी भाषांतरित असूनहि याच कसोटीवर उतरते. परंतु रूपान्तर करतांना लेखकास दोन्ही भाषांवरील स्वामित्व तर हवेंच पण त्याच्या जोडीस सामाजिक चालीरीती व संकेत यांचेंहि ज्ञान असणें अवश्य ठरतें आणि तसें करतांना कलावंताला मूळ कथेंत थोडीफार ढवळाढवळ करण्याचें स्वातंत्र्यहि लाभतेंच. किंबहुना या स्वातंत्र्यामुळेंच त्याला रूपान्तरित कलाकृति स्वतःच्या समाजाशीं चटकन एकरूप करून घेतां येते. आजहि आपण जेव्हां जेव्हां परभाषेंतील वाङ्मयकृतींचें मराठीकरण करूं इच्छितों तेव्हां तेव्हां अशीच अपेक्षा करतों. शेकसपिअरपासून इब्सेनपर्यंतच्या श्रेष्ठ नाटककारांचीं नाटकें आणि जेन ऑस्टेन, रेनॉल्डस्, थॅकेरे यांच्या कादंबऱ्या यांचीं जीं जीं रूपान्तरें झालीं, त्या त्यांच्या रूपान्तरकर्त्यांस त्यांच्या रसिकतेचें, मर्मज्ञतेचें व कुशल अनुवादक्षमतेचें श्रेय देऊनहि टीकाकारांनीं त्यांना स्वतंत्र कलाकृतीच्या जनकत्वाचा मान दिलेला नाहीं. स्वतंत्र प्रतिभेच्या नवनिर्मितीची कलामूर्ति ही रूपान्तरित कलामूर्तीपेक्षां निःसंशय अधिक मानाची आहे. आपल्या समाजाच्या आवडीनिवडी, चालीरीती व धार्मिक वळणें यांना सोयीस्कर व्हावें म्हणून पाश्चात्य चालीरीतींच्या ऐवजीं अनुवादांत इष्ट तो बदल केला—हस्तांदोलनाच्या ऐवजीं नमस्कार ठेवला किंवा टेबलावर बसून केलेल्या खानपानाच्या ऐवजीं पाटांवर बसून फराळ केला—म्हणून कांहीं एकादी लघुकथा किंवा कादंबरी स्वतंत्र ठरत नाहीं. त्याचप्रमाणें रंगभूमीच्या सोयीनुसार किंवा नाट्याच्या बदलत्या कल्पनेनुसार एकाद्या अंकांतील प्रवेशांच्या संख्येंत फेरफार केला किंवा प्रवेशाच्या रचनेंत थोडासा बदल केला तरी त्यामुळें त्या रूपान्तरकर्त्यांस स्वतंत्र नाटक रचण्याचें श्रेय देतां येणार नाहीं. प्रा. फडके यांच्या प्रतिभासाधन ह्या बहुमोल ग्रंथावरील वादळाची या वेळीं आठवण होते. प्रा. फडके यांच्यासारख्या रसिक व मर्मज्ञ साहित्यिकानें थोडा फेरफार करून, मराठीच्या दृष्टीनें अस्सल व स्वतंत्र वाटावी अशी रचना प्रतिभासाधन–ग्रंथांत करूनहि, त्या ग्रंथास मौलिक—स्वतंत्र दर्जा प्राप्त झाला नाहीं याचें रहस्य दुसरें कोणतें? प्रा. केळकर यांनीं त्राटिका नाटकांत असाच किरकोळ बदल केलेला आहे. मुळांतील विधवा स्त्रीचे प्रसंग तत्कालीन महाराष्ट्रीय समाजाला विसंगत वाटतील हें जाणून प्रा. केळकर यांनीं ते बदलून घेतले यांत त्यांची रसिकता तशीच कल्पकता—हि सिद्ध झाली आणि त्याबद्दल त्यांना कोणीहि धन्यवादच देईल. परंतु हे धन्यवाद रूपान्तरकौशल्याचे ! ते स्वतंत्र नाटकाच्या रचनेबद्दलचे नव्हेत. प्रा. केळकरांच्या पूर्वी महाजनि यांनीं Cymbeline या नाटकाचें 'तारा' हें रूपांतर केलें तेव्हां विष्णुशास्त्री चिपळूणकरांनींहि त्यांना रूपांतरकौशल्याबद्दल धन्यवाद दिले आहेत. आजहि आपण प्रा. अनंत काणेकर यांनीं इब्सेनचें 'Doll's House' व गोल्डस्मिथचें 'She Stoops to Conquer' हीं दोन नाटकें 'घरकुल' व 'निशिकांताची नवरी' या नांवानें स्वैर रूपांतर करून मराठी रसिकांपुढें ठेवल्याबद्दल त्यांना धन्यवाद देतों. परंतु त्यामुळें काणेकर हे स्वतंत्र नाटकें लिहिणारे नाटककार ठरले नाहींत किंवा तशी रुखरुखहि त्यांनीं कधीं व्यक्त केल्याचें ऐकिवांत नाहीं. वरेरकर, खांडेकर, फडके, काणेकर, माधव मनोहर, यांनीं कादंबरी व नाटक या दोन्ही वाङ्मयप्रकारांत भाषांतर व रूपांतर अशा दोन्ही स्वरूपांनीं किती तरी मौलिक भर टाकलेली असतांना, डॉ. लेले यांनीं याच रूपांतरांना स्वतंत्र दर्जाच द्या असा आग्रह कां धरावा हें कळत नाहीं.

डॉ. लेले यांचा दुसरा मुद्दाहि मान्य होण्यासारखा नाहीं. डॉ. लेले प्रा. केळकरांना मराठी गद्य–नाटकाचे युगप्रवर्तक मानतात. परंतु या युगप्रवर्तनाचें गमक कोणतें ठरवायचें? केवळ पहिल्या प्रथम मराठींत गद्य नाटकें लिहिण्याचा परिपाठ केळकरांनीं पाडला असें म्हणणें असेल तर कालविपर्यासाचा व सत्यापलापाचा असा दुहेरी दोष पदरीं येईल. केळकरांनीं हीं नाटकें १८९१नंतर लिहिलीं हें स्पष्टच आहे. त्याच्या आधीं संस्कृत व इंग्रजी नाट्यवाङ्मयाच्या आधारें किती तरी नाटकें लिहिलीं गेलीं होतीं! महादेवशास्त्री कोल्हटकर, वि. ज. कीर्तने, वि. मो. महाजनि, शं. मो. रानडे, गो. ग. आगरकर यांचीं सर्वच नाटकें 'गद्य' ग्रंथ म्हणून व प्रयोग








म्हणूनहि १८९१च्या पूर्वींच लोकाभिरुचीस पात्र झालेलीं होतीं. बरें, कालानुक्रमाचा मुद्दा गौण मानून एक 'सरस नाटक रचणारा ग्रंथकार' या दृष्टीनें केळकरांचें युगप्रवर्तकत्व ठरवावें असें डॉ. लेले यांना म्हणावयाचें आहे काय? पण तसें म्हणणेंहि सत्यास व वाङ्मयीन कसोटीस सोडून होईल. महादेवशास्त्री कोल्हटकरांचें नाटक 'सरस गद्य'नाहीं का? 'जयपाल' हें नाटक त्याच काळांत 'सरस नाटक' म्हणूनच गाजलें! संगीत नाटक म्हणून मान्यता असलेल्या सौभद्र नाटकांतील गद्य सुबोध व रसाळ नाहीं काय? त्या काळांत लोकप्रियतेच्या शिखरावर असलेलें व लोकांच्या भावना थरारून सोडणारें 'राणा भीमदेव' हें नाटक ओजस्वी भाषाशैलीनें युक्त आहे हें सर्वमान्य नाहीं काय? भाषा, रचनाकौशल्य, स्वभावरेखनांतील मार्मिकता, भावनोत्कटता इत्यादि नाट्यरचनेंतील कोणते घटक इतर नाटकांपेक्षां केवळ केळकरांच्याच नाटकांत प्रथम व अधिक स्वरूपांत डॉ. लेले यांना आढळले हें कळत नाहीं. डॉ. लेले यांची ही अतिशयोक्ति मराठी नाटकांच्या ऐतिहासिक सत्याला मारक वाटते.

डॉ. लेले यांनीं निर्माण केलेले हे दोन मुद्दे जर सोडले तर वादविवादाचें कार्यच उरणार नाहीं. 'केसरी–मराठ्यां'च्या आरंभकाळांतील केळकरांचें नेतृत्व, देशी मनुष्यहि इंग्रजीचें सरस अध्यापन करूं शकतो हें उदाहरण, त्यांचा दांडगा व्यासंग, श्रेष्ठ ध्येयवाद, त्यांची स्वार्थनिरपेक्ष वृत्ति आणि मराठी नाट्यसृष्टींतील रूपांतरित दालनांत त्यांनीं घातलेली भर, हे कै. प्रा. केळकर यांचे विशेष त्यांच्याविषयींच्या कृतज्ञताबुद्धीनें डॉ. लेले यांनीं सर्वांना परिचित करून दिले, या त्यांच्या कार्याबद्दल कोणीहि त्यांचा उपकृतच राहील.

**प्रा. मधुकर वि. फाटक**

---

## साभार स्वीकार

**कुमार** — संपादक श्री. वीरेन्द्रभाई. स्वातंत्र्य–अंक, आढिया, माणिभुवन, डहाणू (ठाणें).

**धर्मचक्र** — संपादक प्रा. ना. के. भागवत, मुंबई २.

**सुषमा** — संपादक कुंडलराम मोहेकर, श्रीकृष्ण प्रिं. प्रेस (नागपूर).

**संपदा** — मराठा चेंबर ऑफ कामर्स ॲंड इंडस्ट्रीज, पुणें या संस्थेनें चालविलेलें मासिक. संपादक आ. रा. भट.

सा र-सं क ल न

# पै.वा. कायदेआझम महंमद अली जिना

[पाकिस्तानचे गव्हर्नर-जनरल कायदेआझम महंमदअली जिना हे ११-९-४८ रोजीं पैगंबरवासी झाले. त्यांच्या निधनानें एक महान् व असामान्य कर्तृत्वाचा पुरुष इहलोकांतून नष्ट झाला असून पाकिस्तान-राष्ट्राची तर अपरिमित हानि झाली आहे. प्रेसिडेंट ट्रूमन यांनीं म्हटल्याप्रमाणें, का. आ. जिना पाकिस्तान-रूपी स्वप्नाचे सत्यसृष्टींतील प्रणेते, एका स्वतंत्र राज्याचे निर्माते आणि जगांतील सर्वांत मोठ्या मुसलमानी राष्ट्राचे जनक होऊन गेले. एका वेळीं हिंदी राष्ट्रवादाचें प्रतीक असलेले जिनासाहेब कट्टर मुस्लिम-राष्ट्र-वादाचें प्रतीक बनले. आज आपण या घटनेच्या इतके जवळ आहों कीं ऐतिहासिक व भाविष्यकालीनं दृष्टीनें तिच्या इष्टानिष्टतेची चर्चा करून निर्विकार मनानें तिचें मूल्यमापन करणें आज तरी कठिण आहे. पै.वा. कायदेआझम जिना यांच्या मृत्यूनंतर निरनिराळ्या वृत्तपत्रांतून जे अग्रलेख आले आहेत, त्यांपैकीं कांहींचा सारांश खालीं दिला आहे:—का. सं]

## जिनांचें मुख्य बळ

शतकानुशतकें चालत आलेलीं साम्राज्यें ज्या काळीं धुळीला मिळत आहेत, अशा या काळीं या मुंबईतील वकिलाला आपल्या उत्तरायुष्यांत एक नवीन साम्राज्य स्थापन करावयाचें स्वप्न पडलें; धर्मा-बद्दलचा अभिनिवेश कमी होऊन धर्म-पंथ-निरपेक्ष वृत्तीचा जोरानें प्रसार होत आहे, अशा या युगांत ज्याचें स्वतःचें जीवन धार्मिक दृष्ट्या काटेकोर अगर कडवें असल्याबद्दल प्रसिद्ध नव्हतें, त्या मुसलमान गृहस्थाच्या कल्पनेनें स्वैर विहार करून असें ठरविलें कीं तें साम्राज्य म्हणजे इस्लामी राज्य व्हावें. आणि गंमत ही कीं, जणूं एका रात्रींत तें सुखस्वप्न सत्यसृष्टींत अवतरलें! तसें तें अवतरलेलें बघून जिनांइतका विस्मय कदाचित कोणालाच वाटला नसेल!

जिनांचें मुख्य बळ कशांत साठविलेलें होतें? त्यांच्यापाशीं विचारपूर्वक बनविलेलें जीवन-तत्त्वज्ञान नव्हतें, किंवा जीवन-सिद्धान्त नव्हते. दुसऱ्यानें जोपा-सिलेली आणि परिस्थितीमुळें विशिष्ट आकारास आलेली कल्पना दिसतांच ती फलद्रूप करण्याकरितां आपल्या सर्व असामान्य शक्ती—चिकाटी, डावपेंच लढविण्याचें चातुर्य, वकिली कौशल्य वगैरे—उपयोगांत आणण्यांत त्यांच वैशिष्ट्य दिसून येतें. या बाबतींत म. गांधी व का. आ. जिना यांच्यांत स्पष्ट फरक दिसून येतो. म. गांधींचें हिंदी राजकीय जीवनावर गेलीं तीस वर्षें असामान्य वर्चस्व असून त्यांच्याच हातीं सर्व सूत्रांचें चालकत्व होतें. परिस्थितीच्या आघातांमुळें त्यांनीं आपल्या योजनांत जरी वेळो-वेळीं थोडाफार बदल केला असला तरी एकंदरींत विचार करतां, त्यांच्या जीवनांत एक असामान्य सुसंगति आढळून येते; तशी जिनांच्या जीवनांत दिसून येत नाहीं. पाकिस्तानचा जन्म इकबाल यांच्या कविकल्पनेंत झाला. त्याला सिद्धान्ताचें व तत्त्वाचें स्वरूप देण्यास रहमतअली आणि त्यांचे ऑक्सफर्डमधील सहकारी कारणीभूत झाले. ब्रिटनच्या 'फोडा आणि झोडा' या राजनीतीच्या अर्ध्या शत-काच्या अंमलाखालीं त्या ध्येयाकडे देशाचें राजकारण जणूं अंधपणानें रेटलें जात होतें. अशा परिस्थितींत जिनांनीं काय केलें?

मृतप्राय अवस्थेंत असलेल्या मुस्लिम-लीगमधून त्यांनीं एक प्रभावी राजकीय संघटना निर्माण केली आणि मुस्लिम जनतेच्या अस्पष्ट इच्छा-आकांक्षांना पाकिस्तानच्या मनो-रथाशीं जुंपून त्यांना एक प्रका-










ऱ्चा एकसूत्रीपणा आणून दिला. आक्रमक जातीयवादाच्या भावनेला जिनांनीं अणकुचीदारपणा आणून दिला. हें जसें पाकिस्तान-निर्मितीचें एक कारण आहे, तशीं इतरहि अनेक परिस्थितिजन्य कारणें—एका पिढींत झालेलीं दोन जगद्व्यापी महायुद्धें, त्यांमुळें शकलें झालेल्या राष्ट्रांतून निर्माण झालेलीं नवीं राष्ट्रें, प्रस्थापित साम्राज्यवादाचा ऱ्हास आणि जखडबंद सर्वाधिकारवादाचा उदय (Rise of the Totalitarian Idea)—हीं पाकिस्ताननिर्मितीला सहायक झालीं.

गांधीजींच्या असहकाराच्या, सत्याग्रहाच्या चळवळीपासून जिना जरी पूर्णपणें अलिप्त राहिले असले, तरी त्यांच्या तीक्ष्ण नजरेला जनतेच्या चळवळीचें भव्य चैतन्यमय विराट् स्वरूप दिसून त्याची छाप त्यांच्या अंतःकरणावर पडली असलीच पाहिजे. त्यांना कळून चुकलें कीं, मुस्लिम समाजासारखा मागसलेला समाज जर उठवायचा असेल तर त्या समाजाच्या हृदयांतल्या खोल भावनेला—मग ती भावना कितीहि असंस्कृत असेना का—समाजाच्या हृदयांत वसत असलेल्या धर्मश्रद्धेला हात घातला पाहिजे. यानंतर युरोपमधील हिटलर, मुसोलिनी यांसारख्या सर्वाधिकाऱ्यांच्या कसबांचा सूक्ष्म अभ्यास करून त्यांनीं जनतेला उठविण्याचें, तसेंच प्रचाराचें एक विशिष्ट तंत्र पूर्णत्वाप्रत नेलें! त्या तंत्राचा मुख्य गाभा म्हणजे 'अत्याचारबाजी' (atrocity-mongering) होय! परंतु स्वतः पेरलेल्या बीजांचा परिणाम म्हणून पंजाबमध्यें जी हाहाकाराची शोकान्तिका घडून आली ती पाहून आपणच उठविलेल्या भस्मासुरासंबंधीं जिनांनाहि बरें वाटलें नसेल! ते स्वतः एक दूरदर्शी आणि सुज्ञ गृहस्थ असून, त्यांचा मूळ स्वभाव व त्यांचे शिक्षण—संस्कार असे होते कीं, त्यांना अराजकाची केव्हांहि शिसारीच यावी! पहिल्या गोलमेज-परिषदेसमोर त्यांनीं एकट्यांनीच एकमुखी सरकारची मागणी केली होती व संघराज्यामुळें हिंदुस्थानसारख्या देशांत वेगळेपणाची भावना कशी वाढत जाईल हें दाखविलें होतें. त्याच गृहस्थांनीं निराळें धोरण पुरस्कारावें व निसर्गानें एकसंधी असलेल्या देशावर अनैसर्गिक फाळणी लादण्यास निमित्त व्हावें, हा केवढा दैवदुर्विलास आहे! पण एकदां ज्या शक्ती त्यांनीं उठविल्या त्यांचा प्रचंड वेग आंवरणें त्यांनाहि शक्य झालें नाहीं. —हिंदु, १३-९-१९४८.

## हिंदी राजकारणांतील चमत्कारशाली शक्ति

इतिहासाच्या दीर्घ कालपटांत जमा झालेल्या गांधीजी आणि जिना यांच्या जीवनपटांमध्यें मोठा विरोध दिसून येतो. कांहीं काळपर्यंत दोघांचे जीवनक्रम समांतर सारख्या, चाकोऱ्यांतून जातांना दिसतातः दोघांनाहि आपल्या तारुण्यांत इंग्रजी कायद्याचें शिक्षण मिळालें असून दोघेहि परकीय सत्तेविरुद्ध एकाच राष्ट्रीय आघाडीवर उभे राहिलेले आढळून येतात. पण हें सकृद्दर्शनीं दिसणारें साम्य येथेंच संपतें. एकानें आपलें जीवन आध्यात्मिक मूल्यें आणि तत्त्वें यांच्यावर आधारून तीं आपल्या देशांत प्रचलित राजकारणाला लावून दाखविलीं, तर दुसरा आपल्या आग्रही आणि कडक स्वभावामुळें निर्दय अशा कायदेबाजपणांतच अडकून राहिला; तो कायदेबाजपणा वरपांगीं दिसायला सनदशीर पण आंतून निष्ठुर आणि हेकट व तडजोडीला विन्मुख असा असून परिणामांची तमा न बाळगतां शेवटपर्यंत आपला 'मांसाचा पौंड' न सोडणारा असा होता.

फ्रान्समधील चौदाव्या लुईचें इतकें सहीनूसही अनुकरण जिनांखेरीज दुसऱ्याच्या जीवनांत क्वचित् सांपडेल. ज्या राज्याचे ते पहिले सनदशीर अधिपति झाले, त्या राज्याची मूळ कल्पना जरी खरोखरी जिनांची नसली तरी त्यांनींच त्या कल्पनेला मूर्त स्वरूप आणून दाखविलें. म्हणून तें राज्य त्या अर्थानें त्यांचीच निर्मिति होय. एका व्यक्तीच्या प्रबळ इच्छाशक्तीचा हा विजय तात्पुरता आहे, कीं त्यापासून कांहीं विधायक कार्य होऊन कायमचें हित होणार आहे, कीं त्याच्या जन्मसमयींच्या भयंकर यातनांपेक्षांहि दुर्धर यातना त्यापासून पुढें होणार आहेत, याचें भविष्य कोण वर्तवूं शकेल? या एका व्यक्तीच्या ठिकाणीं एका बाजूनें दुरतिक्रम असा दयामाया न ठेवणारा तर्कटी स्वभाव, तर दुसऱ्या बाजूनें जाज्वल्य उत्कटत्व, राजकीय प्रतिकाराचें विलक्षण सामर्थ्य आणि मति कुंठित करणारी ध्येयपरायणता—हे गुण एकवटले होते. या गुणांच्या साहाय्यानें त्यांनीं असें एक राज्य स्थापलें कीं ज्या








राज्याचें अंतःस्वरूप किंवा बाह्य स्वरूप बघतां त्याला इतिहासांत तोड नाहीं! त्या राज्याचें संवर्धन तसेंच पोषण द्वेष आणि शंका यांनीं बुजबुजलेल्या वातावरणांत झालें! त्या राज्याचें आजचें स्वरूप पहातां, ज्या प्रदेशांमुळें व लोकांमुळें त्याला आज आकार आलेला आहे, त्या प्रदेशांचा व लोकांचा, जेथून खरा मूळ राजकीय झगडा सुरू झाला त्या भावनांशीं व नेतृत्वाशीं, जवळजवळ संबंध राहिलेला नाहीं, हें दिसतें

समाजाला नवीन वळण देणारे पुढारी जे निर्माण होतात ते बाह्य परिस्थितीमुळें का स्वतःच्या अंगच्या गुणांमुळें ही एक कूट समस्या असून तिचें निर्णयात्मक उत्तर देणें अशक्य आहे. एका वेळीं हिंदु-मुसलमान-ऐक्याचें जाज्वल्य पुरस्कर्ते म्हणून गाजलेल्याच जिनांची परिणति पुढें अगदीं विरुद्ध अशा द्विराष्ट्रवादाची आग्रहानें व जळफळाटानें तरफदारी करणाऱ्या जिनांमध्यें व्हावी ह्या घटनेची उपपत्ति लावण्याचे अनन्त प्रयत्न पुढें होतील. या घटनेचें कारण कांहींहि असो, तिचा परिणाम मात्र असा झाला कीं १९३७ सालीं हिंदी राजकारणाच्या रंगभूमीवर एक नवी विभूति आविर्भूत झाली व तिनें अभूतपूर्व चमत्कार करून दाखविला.

या विभूतीचा चमत्कार असा कीं, तिला नक्की काय पाहिजे आहे हेंच कळेना. तिनें कायद्याच्या अक्षरा-न्-अक्षराबद्दल आग्रह धरला आणि कोणतीहि विधायक सूचना येवो किंवा कोणताहि प्रयत्न होवो, ती सूचना वा तो प्रयत्न धुडकावून लावून प्रत्येक चळवळीचा—मग ती चळवळ परकीय सरकारविरुद्ध असो, राष्ट्रीय चळवळीला तारक असो वा मारक असो—आपल्या एकमेव स्वार्थाकरतां व एका विशिष्ट समाजांत आपलें आसन स्थिर करण्याकरतां उपयोग करून घेतला.

मुसलमान समाज मागसलेला व त्यांत निरनिराळे पंथ व निरनिराळ्या जमाती असल्यामुळें सर्व समाजावर पकड ठेवून त्याला निगडित करून ठेवणाऱ्या प्रभावी पुढाऱ्याची अत्यंत गरज होती. अशा वेळीं त्या समाजाला जिनांचा आधार मिळाला. तो समाज त्यांना जो बिलगला तो कांहीं प्रेमाची ऊब वाटून किंवा भक्तिभाव उचंबळून नव्हे, तर एकंदर अनिश्चिततेच्या व लहरी राजकारणी वावटळींत ते त्या समाजाला दृढनिश्चयी—धैर्याच्या मेरुसारखे—वाटले, म्हणूनच. जसजसा तो समाज या पर्वताचा अधिकाधिक आश्रय घेऊं लागला, तसतसा हा पर्वत अधिकाधिक उंच व विशाल असा होऊं लागला व जसजसा त्याला विरोध होऊं लागला तसतसा तो अधिकाधिकच ताठर आणि अभेद्य बनत गेला.

—टाइम्स ऑफ इंडिया, १३-९-'४८

## परिस्थिति बलवत्तर

ज्या अर्थानें गांधीजींनीं स्वतंत्र हिंदुस्थान निर्माण केला, त्या अर्थानें जिनांनीं पाकिस्तान निर्माण केलेलें नाहीं. जनतेचा दृष्टिकोण बनविणें, लोकांना दिव्यें करायला लावणें, कालप्रवाहांत जीं अबाधित टिकून राहतील अशीं ध्येयें किंवा त्या ध्येयांनुसार संस्था निर्माण करणें, या गोष्टी करण्याचा त्यांचा स्वभाव नव्हता व करण्याची त्यांना इच्छाहि नव्हती. मात्र ते राजकारणी डावपेंच लढविण्यांत पट्टीचे होते. अचूक नजरेनें आपल्याला योग्य अशी संधि पकडून, ब्रिटिश साम्राज्यवादाच्या गरजा आणि हिंदी राष्ट्रवादाच्या मर्यादा यांचा आपल्या फायद्याकरतां उपयोग करून घेण्यांत त्यांची अतुल चिकाटी दिसून येते. ... जिनांनीं आपल्या सार्वजनिक जीवनक्रमाला एक हिंदी राष्ट्रवादी म्हणूनच सुरुवात केली हें हिंदुस्थान विसरूं शकत नाहीं. ......... शेवटीं त्यांनीं फाळणीची भूमिका घेतल्यानंतर त्यांना ती सोडावयास लावून हिंदी राष्ट्रवादाकडे त्यांना पुनः परत आणणें शक्य होतें काय, या बाबतींत तर्कवितर्क करणें फुकट आहे. ज्यांची फाळणीबद्दलची हळहळ अजूनहि कमी झालेली नाहीं, ज्यांच्या भावना फाळणीपूर्वी व फाळणीनंतर झालेल्या घटनांनीं दूषित होऊन गेल्या आहेत, त्यांनीं जिनांना हिंदुस्थानच्या दृष्टीनें 'कट्टर अराष्ट्रीय' म्हणून म्हणण्यापूर्वी आपल्या निर्णयाचा फेरविचार केला पाहिजे. त्यांनीं असा विचार केला पाहिजे कीं जिनाहि शेवटीं परिस्थितीपुढें नमले आणि इतिहासानें जो मोह त्यांच्यापुढें उभा केला त्याचा प्रतिकार करण्याइतकें सामर्थ्य त्यांना लाभलें नाहीं.

—हिंदुस्थान टाइम्स, १४-९-'४८.











श्री. द. ग. येरवडेकर

# नवे हिन्दी कायदे

हिंदी कायदेमंडळाचें पावसाळी अधिवेशन ता. ९ ऑगस्ट १९४८ला सुरू होऊन नुकतेंच ता. ७ सप्टेंबर १९४८ रोजीं संपलें. प्रस्तुत लेखांत या अधिवेशनांत नवीन कायदे करण्याचें जें काम झालें त्याची विहंगमदृष्टीनें माहिती दिली आहे.

कायदेमंडळाच्या या अधिवेशनाच्या कार्यक्रम–पत्रिकेवर मागच्या अधिवेशनांत अर्धवट राहिलेलीं ११ सरकारी बिलें व या अधिवेशनांत प्रथमच मांडलीं जावयाचीं ४१ सरकारी बिलें अशीं एकूण ५२ बिलें होतीं. यांशिवाय सभासदांनीं मांडलेलीं बिन–सरकारी बिलें होतीं तीं वेगळीच. प्रत्येक बिलाचीं तीन वाचनें झाल्याशिवाय त्याची परिणति कायद्यांत होत नाहीं हीं गोष्ट लक्ष्यांत घेतली म्हणजे कायदे–मंडळाच्या प्रस्तुत अधिवेशनांत ज्या सुमारें २५ बैठकी झाल्या त्या बैठकींतून किती भरपूर व किती जलद काम झालें असलें पाहिजे याची कल्पना वाचकांना येईल. जवळजवळ ४० ते ४५ नवे कायदे या अधिवेशनाच्या टांकसाळींतून कोऱ्या करकरीत नाण्यांच्या स्वरूपांत बाहेर पडले आहेत. त्यांचा त्रोटक परिचय पुढें करून देण्यांत येत आहे.

**पुढें ढकललेले कायदे :** कोणते कायदे प्रस्तुत अधिवेशनांत पूर्णपणें संमत झाले हें सांगण्यापूर्वी कोणते कायदे या अधिवेशनांत चर्चिले गेले नाहींत तें अगोदर सांगणें जरूर आहे. हिंदु–कोडाचा कायदा मागच्याच अधिवेशनांत प्रविष्ट करण्यांत येऊन तो सिलेक्टकमिटीकडे धाडला गेला होता व या अधिवेशनांत त्याची संपूर्ण चर्चा होऊन त्याचें पक्क्या कायद्यांत रूपांतर व्हावें अशी हिंदुस्थानांतील नवमतवादी हिंदूंची फार मोठी मनीषा होती. पण सनातनी हिंदूंना हें बिल अत्यंत प्रतिगामी स्वरूपाचें वाटत असल्यामुळें नवीन राज्य–घटना मंजूर होऊन व त्या घटनेखालीं नव्या निवडणुकी होऊन जें खरें प्रातिनिधिक कायदेमंडळ अस्तित्वांत येईल त्यानेंच या कायद्याची निर्णायक चर्चा करावी असा सनातन्यांचा आग्रह होता. अखेर तडजोडीनें 'हिंदुकोडा'ची चर्चा येत्या अंदाजपत्रकी अधिवेशनापर्यंत तहकूब ठेवावी असें ठरलें. एक लक्ष रुपयांची वा त्याहून अधिक किंमतीची मिळकत वारसा–हक्कानें प्राप्त झाल्यास तीवर कर बसविणारें 'एस्टेट–ड्यूटी–बिल'हि पुढील अधिवेशनावर ढकलण्यांत आलें. बँकांसंबंधींचा नवा कायदाहि या अधिवेशनांत सिलेक्ट–कमिटीकडे पाठविण्यांत आला; पण त्यावरील अखेरची चर्चा वेळेच्या अभावीं पुढील अधिवेशनापर्यंत तहकूब झाल्यासारखी दिसते. बालविवाह–प्रतिबंधक शारदा–कायद्यांत दुरुस्ती करून मुलींचीं व मुलांचीं लग्नाचीं कायदेशीर किमान वयें अनुक्रमेंकरून १५ व २० ठरविणारीं, या कायद्याचा भंग करणारांना कडक शिक्षा देण्याची तरतूद करणारीं व वृद्ध वरांशीं इच्छेविरुद्ध विवाह ठरविला गेलेल्या मुलींना संरक्षण व आसरा देणारीं श्री. ठाकूरदास भार्गव यांचीं बिनसरकारी सामाजिक महत्त्वाचीं बिलेंहि सिलेक्ट–कमिटीकडे पाठविण्यांत आलीं आहेत.

**'महात्मा गांधी'–स्मारक निधीला देणगी :** मंजूर झालेल्या नव्या कायद्यांत 'महात्मा गांधी'–स्मारक निधीला देणग्या देण्यास परवानगी देणाऱ्या कंपनी–कायदा–दुरुस्तीला अग्रस्थान दिलें पाहिजे. या कायद्यानें कोणत्याहि कंपनीला खास ठराव मंजूर करून गांधी–स्मारक–राष्ट्रीय–निधीला केवढीहि मोठी देणगी देतां येईल. उद्योगपती व भांडवलवाले यांच्याकडून गांधी–स्मारकाला कोट्यवधि रुपये मिळविण्याचा मार्ग मोकळा करणाऱ्या या कायद्याचें








महत्त्व देशाच्या भावी प्रगतीच्या दृष्टीनें फार आहे.

**प्रादेशिक सैन्याची उभारणी :** काश्मीरमध्यें प्रत्यक्ष युद्ध चालू असून हैद्राबादेंतहि चकमक सुरू होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. अश्या परिस्थितींत देशाच्या संरक्षणाची काळजी प्रत्येक हिंदी नागरिकाला आज लागून राहिली आहे. या दृष्टीनें संरक्षण-मंत्री ना. बलदेवसिंग यांनीं मांडलेल्या व कायदेमंडळानें मंजूर केलेल्या **'प्रादेशिक सैन्य'-उभारणीच्या कायद्याचें** महत्त्व अतिशयच आहे. आरंभीं हें सैन्य १ लक्ष ३० हजार सैनिकांचें असेल व संरक्षणाची दुसरी फळी म्हणून त्याचा उपयोग केला जाईल. या महत्त्वाच्या तरतुदी या कायद्यांत आहेत.

**शिरगणतीचा कायम स्वरूपाचा कायदा :** सामाजिक स्थैर्याला व प्रगतीला सतत हातभार लावणाऱ्या या कायद्याचें स्वागत प्रत्येकाकडून झाल्याशिवाय राहणार नाहीं. आजपर्यंत दर दहा वर्षांनीं शिरगणती होत असे त्या वेळीं त्या त्या शिरगणतीपुरती तात्पुरती व्यवस्था करणारे वेगवेगळे कायदे मंजूर करण्यांत येत असत. पण ही शिरगणती अत्यंत असमाधानकारक व चुकीची होत असे. देशाच्या फाळणीच्या वेळीं चुकीच्या शिरगणतीच्या आंकड्यांवर अवलंबून राहावें लागल्यामुळें हिंदुस्थानचें फार मोठें नुकसान झालें, हा अनुभव आजच्या राज्यकर्त्यांना नुकताच आला असल्यामुळें, शिरगणती बिनचूक व भरपूर माहिती गोळा करण्यास समर्थ अशी होईल याबद्दल खबरदारी घेऊन त्यांनीं प्रस्तुतचा कायदा केला. शिरगणतीचें प्रत्यक्ष काम जरी दर दहा वर्षांनीं व्हावयाचें असलें तरी त्या वेळीं जी आंकडेवार माहिती गोळा करण्यांत येईल तिची संकलनपूर्व चिकित्सा करून तीवरून सामाजिक प्रगति घडवून आणण्यास मदत होईल अशी विषयवार माहिती वेळोवेळीं प्रसिद्ध करण्यासाठीं चिरंतन स्वरूपाची उपाययोजना त्यांना करण्यास सोपें जाईल अश्या दूरदृष्टीनें हा कायदा मंजूर करून घेण्यांत आला हें उचित झालें. विशेषतः नजीकच्या काळांत भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न आपणांस सोडवावयाचा असल्यामुळें या कायद्यानुसार १९५१ सालीं जी शिरगणती होईल ती अनेक बाबतींत आधारभूत समजण्यांत येणार असल्यामुळें आज हा कायदा करण्यांत आला हा शुभशकुनच समजण्यास हरकत नाहीं.

**रिझर्व्ह बँकेचें राष्ट्रीयीकरण :** देशांतील प्रमुख उद्योगधंदे व आर्थिक व्यवसाय राष्ट्रीय मालकीचे करण्याचें जें धोरण हिंदुस्थानसरकारनें आंखलें आहे त्याचा शुभारंभ, रिझर्व्ह बँक १ जानेवारी १९४९ पासून सरकारी मालकीची करणाऱ्या या कायद्यानें होत आहे, म्हणून त्याचें अत्यंत महत्त्व आहे. 'अर्थ एव प्रधानः' असें कौटिल्यवचन असल्यामुळें देशाच्या आर्थिक व्यवहाराचें अंतिम नियमन करणारी श्रेष्ठतम संस्था जी रिझर्व्ह बँक तीच सर्वांत अगोदर सरकारी मालकीची करण्यांत आली, हें यथाक्रमच झालें. या कायद्याप्रमाणें रिझर्व्ह बँकेच्या खासगी भागदारांचे भाग प्रत्येकीं ११८ रुपये १० आणे किंमत देऊन सक्तीनें विकत घेण्यांत यावयाचे आहेत. प्रत्येक भागाची दर्शनी किंमत १०० रुपये होती व भागदारांना आजवर बारापंधरा वर्षे दरसाल ४ टक्केप्रमाणें नफा अगोदरच मिळालेला आहे ही गोष्ट लक्ष्यांत घेतली असतां यापुढें प्रत्येक भागाचे ११८ रुपये १० आणे भागदारांना देण्यांत येणार आहेत. यांत त्यांचें कोणतेंहि नुकसान सरकारनें केलेलें नाहीं हें दिसून येईल. शिवाय राष्ट्रीयीकरणामुळें बँकेच्या अंतर्गत व्यवस्थेंत व दैनंदिन कारभाराच्या स्वातंत्र्यांत कोणतीहि ढवळाढवळ न होईल अशीहि खबरदारी घेण्यांत आली आहे.

**विद्युदुत्पादन व खाणींचें नियंत्रण :** देशांतील ग्रामीण विभागांत येत्या दहा वर्षांत वीज खेळवूं शकणारें विजेचें बिल व देशांतील खाणींचें नियंत्रण करणारें बिल कायद्यांत रूपांतरित करून महाराष्ट्रीय मंत्री ना. काकासाहेब गाडगीळ यांनीं फार मोठा विक्रम केला आहे, ही महाराष्ट्रीयांना मोठी अभिमानास्पद गोष्ट आहे. विद्युच्छक्तीची फार मोठ्या प्रमाणावर निपज व तिचा नियंत्रणपूर्वक पुरवठा करण्याची कामगिरी या कायद्यानें मूलतः सरकारकडे सोंपविण्यांत आली असून तें काम सेंट्रल इलेक्ट्रिसिटी अथॉरिटीनें करावयाचें असून प्रांतांतून तें प्रॉव्हिन्शियल इलेक्ट्रिक बोर्डांनीं करावयाचें आहे. त्या त्या प्रांतांत असणाऱ्या खाणींचें व खनिज पदार्थांचें नियमन










करण्याचा अधिकार त्या त्या प्रांतांना असावा असा प्रांतिक सरकारांचा आग्रह होता तो दूर सारून सर्व देशाच्या हिताच्या दृष्टीनें मध्यवर्ती सरकारला खाणींचें नियमन करण्याचा अधिकार देणारें बिल नामदार गाडगीळ यांनीं मंजूर करून घेतलें ही गोष्ट देशांतील खनिज संपत्ति देशाच्या आर्थिक व औद्योगिक भरभराटीची गुरुकिल्ली असल्यामुळें व त्या बाबतींत सर्व देशाचें मिळून खाणीविषयक एकच धोरण असणें हितावह असल्यामुळें इष्ट अशीच झाली. आतां सर्व देशांत खाणींचें नियंत्रण एकाच पद्धतीनें सुरू होऊन त्यांत सूत्रबद्धता येईल.

**मजुरांच्या सुखसोयी :** फॅक्टरी–ॲक्ट सुधारण्याचें बिल व कोळशांच्या खाणींतील मजुरांच्या प्रॉव्हिडंट–फंडाची योजना सक्तीची करण्याचें बिल अशीं दोनहि बिलें मंजूर झाल्यामुळें मजूर–वर्गाच्या सुखसोयींत फार मोठी भर पडणार आहे. मजूर–मंत्री ना. जगजीवनराम यांनीं मजुरांच्या परिस्थितींत सर्वांगीण सुधारणा करण्यासाठीं आपल्या परिश्रमांची पराकाष्ठा चालविली आहे व नवा फॅक्टरी–कायदा मंजूर करवून घेऊन त्यांनीं याच दिशेनें आणखी पुढें पाऊल टाकलें आहे. या कायद्याचें वर्णन ' मजुरांच्या हक्कांच्या सनदेचा एक महत्त्वाचा भाग ' असें स्वतः मजूर–मंत्र्यांनीं केलें व दुसऱ्या एका सभासदानें त्याचा ' ऐतिहासिक महत्त्वाचा कायदा ' असा उल्लेख केला आहे. या नव्या कायद्याप्रमाणें मजुरांचें आरोग्य व त्यांची सुरक्षितता कारखान्यांतून प्रत्यक्ष काम करीत असतांना धोक्यांत येणार नाहीं व त्यांना तें काम सोयीनें व समाधानानें करतां येईल अशा तरतुदी कारखान्यांतून सक्तीच्या केल्या गेल्या आहेत व कामाचा आठवडा ४८ तासांचा, तसाच दिवस ९ तासांचा प्रौढ मजुरांसाठीं ठरवून देण्यांत आला आहे. मजुरांना पगारी रजा मिळण्याची तरतूदहि या कायद्यांत आहे. मजुरांचा प्रॉव्हिडंट–फंड सक्तीनें सुरू करण्याची जबाबदारी कोळशांच्या खाणींच्या मालकांवर टाकण्यांत येणार असल्यानें कोळशांच्या खाणींतील मजुरांचें फार मोठें हित होणार आहे.

**निर्वासितांची मोजदाद व तरतूद :** निर्वासितांची वेगळी शिरगणती करण्याचें बिल व त्यांच्यासाठीं जमिनी सक्तीनें संपादन करण्याचें बिल कायद्यांत रूपांतरित करून सरकारनें हिन्दुस्थानांत कायम स्थायिक होणाऱ्या निर्वासितांचा बिकट प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीनें खात्रीनें पुढचें पाऊल टाकलें आहे.

**विलीन व सामील संस्थानांना लागू होणारे कायदे :** हिंदी संघराज्यांत विलीन होणाऱ्या व सामीलनाम्यानें सामील होणाऱ्या संस्थानांना हिंदी कायदे लागू होणें हें अपरिहार्य व क्रमप्राप्तच आहे. त्यामुळें हिंदी सैन्याचा कायदा संस्थानी फौजांना लागू करणारी 'इंडियन आर्मी'–ॲक्टची दुरुस्ती व 'इंडियन–टेलिग्राफ'–ॲक्टानुसार संस्थानांतील तारखातें हिंद–सरकारच्या ताब्यांत घेण्याची दुरुस्ती उल्लेखनीय आहे.

**फाळणीविषयक कायदा :** दिल्ली, पंजाब वगैरे प्रांतांतील हिंदु व मुसलमान कैद्यांची पाकिस्तानच्या व हिंदुस्थानच्या सरकारांनीं अदलाबदल करण्याचा निर्णय घेतला होता त्याला कायदेशीर स्वरूप देणारें ना. गोपाळ स्वामी आयंगार यांचें बिल या अधिवेशनांत मंजूर झालें आहे.

**इन्कमटॅक्स–दुरुस्ती :** कर चुकविणारांकडून मागील कर वसूल करतां यावा म्हणून पूर्वींच्या आठ वर्षांमागीलपर्यंतचें प्रकरण पुनः तपासण्यास परवानगी देणारी व आठ वर्षांचा कर वसूल करण्यास समर्थ ठरणारी दुरुस्ती इन्कमटॅक्स–कायद्यांत करण्यांत आली आहे. सरकारनें पसंत केलेल्या धर्मादाय संस्थांना वा सार्वजनिक संस्थांना ठराविक मर्यादेपर्यंत देणग्या दिल्यास त्या रकमा करमाफ समजण्यांत येतील असें आश्वासन मागील अंदाज–पत्रकाच्या वेळीं करांतील सवलती जाहीर करतांना अर्थमंत्र्यांनीं दिलें होतें; पण तशी प्रत्यक्ष दुरुस्ती इन्कम–टॅक्स–कायद्यांत करण्याचें त्या वेळीं नजर–चुकीनें राहून गेलें होतें. ती चूक या अधिवेशनांत दुरुस्त करण्यांत आली आहे. करमाफी मिळावयाच्या देणगीची कमाल मर्यादा २॥ लक्ष रुपयांची आहे. इन्कमटॅक्सकडे पुरविण्यांत येणारी माहिती तसेच तक्ते गुप्त समजण्यांत येतात व ते कोर्टदरबारीं पुराव्यांत आणण्याची परवानगी नसते; पण सरकारी अधिकाऱ्यांवर लांच–लुचपतीचे खटले होतील तेव्हां लांचलुचपत शाबीत व्हावी म्हणून










त्यांनीं इन्कमटॅक्स–अधिकाऱ्यापुढें स्वतःच्या उत्पन्नाचे व मिळकतींचे जे तक्ते दाखल केलेले असतील ते पुराव्यासाठीं आणतां येतील अशी परवानगी देणारी दुरुस्ती कायद्यांत करण्यांत आली आहे.

**अवांतर कायदे :** यांशिवाय कलकत्त्याच्या इंपीरियल लायब्ररीचें नांव 'नॅशनल' लायब्ररी करणारा कायदा, कॅंटोन्मेंट–कायद्यांतील दुरुस्तीचा कायदा, प्रांताला लागू करण्यांत आलेला मुंबईचा १९४७चा पब्लिक–सिक्युरिटी–मेझर्स–अॅक्ट–दुरुस्तीचा कायदा, रेल्वेवर होणाऱ्या अपघातांची चौकशी करून योग्य ती नुकसान–भरपाई देणारे क्लेम्स–कमिशनर्स नेमणारा व रेल्वेचे दर ठरविणारें 'रेट्स्–ट्रिब्यूनल' नांवाचें लवादमंडळ नेमतां येण्यासाठीं रेल्वेअॅक्टांत दुरुस्ती करणारा कायदा, कापडाच्या व इतर आवश्यक वस्तूंच्या नियंत्रणांचा भंग करणारांना कडक शिक्षा देण्याची दुरुस्ती करणारा कायदा, रेशमाच्या धंद्याची प्रगति व्हावी म्हणून मध्यवर्ती सिल्क–बोर्ड स्थापन करण्याची तरतूद करणारा कायदा, संरक्षक जकातींच्या कायद्यांत दुरुस्ती करणारा कायदा, हल्लीं असणारें कॉटन–सेसचें प्रमाण दुप्पट करणारा कॉटन–सेस–अॅक्ट–दुरुस्तीचा कायदा वगैरे अनेक महत्त्वाचे कायदे प्रस्तुतच्या अधिवेशनांत मंजूर होऊन देशाच्या सर्वांगीण प्रगतीस त्यांमुळें मोठीच मदत झाल्याशिवाय राहणार नाहीं.

११।९।४८.

———

कार्यकर्ते प्रत्यक्ष बोलून न दाखवोत, पण वस्तुस्थिति अशी दिसते कीं, कॉंग्रेसवरील लोकांचा विश्वास थोडा डळमळीत झाला असून लोकांना असें वाटूं लागलेलें दिसतें कीं, कॉंग्रेसजनांमध्यें कांहींच वैशिष्ट्य नसून राजकारणी लोक जसे जगभर असतात तसेच तेहि आहेत; म्हणजेच लोकसेवा करण्यापेक्षां निवडणुकींत जागा कशा मिळतील याकडेच त्यांचें अधिक लक्ष आहे.

यासंबंधांत मला बत्तीस वर्षांपूर्वी घडून आलेल्या एका गोष्टीची आठवण होते. एकदां लो. टिळक ज्या गाडीनें प्रवास करीत होते, त्याच गाडीनें प्रवास करण्याचा योग मला आला. माझ्या डब्यांत आयर्लंडमधला एक शिपाई उतारू म्हणून होता. मध्यरात्र होती, तरी प्रत्येक मोठ्या स्टेशनच्या प्लॅटफॉर्मवर लोकांच्या झुंडीच्या झुंडी जमून लोकमान्यांचा जयघोष करीत. त्या आयरिश शिपायानें मला लोकांच्या गर्दीचें आणि ह्या गोंगाटाचें कारण विचारलें. मी त्याला 'लोकमान्य कोण आहेत, ते आमचे किती मोठे पुढारी आहेत' हें वर्णन करून सांगत होतों, तोंच तो एकदम उद्गारला, 'हें सर्व फुकट आहे! मी अशा राजकारणी लोकांना चांगलें ओळखतों. आमच्या देशांतहि असे किती तरी आहेत ! पण त्यांपैकीं कोणावरहि विश्वास ठेवूं नये आणि कोणाचेंहि म्हणणें खरें मानूं नये!". 'आमचे हिंदी पुढारी तसे नाहींत' असें त्याला समजावून सांगण्यासाठीं मीं त्याच्याशीं हुजत घातली. तेव्हां तो शेवटीं म्हणाला, "अजून तुम्ही लहान आहां; प्रौढ झाल्यावर तुम्हांला खरें कळून येईल. पण अर्थात् तुम्हीच राजकारणी बनलां नाहीं तरच !"

**—श्री. किशोरलाल मश्रूवाला,**
(मूळ इंग्रजीवरून) हरिजन, ११।७।४८.

वर्षं दुसरें
अंक पहिला

# नवभारत

ऑक्टोबर
१९४८

## या अंकांतील जाहिराती व जाहिरातदार

डॉ. पुरोहित फार्मसी : आयडियल फर्निचर वर्क्स : नवभारत प्रकाशन लि. : यशवंत विमा संस्था : वेस्टर्न इंडिया लाइफ इंश्युअरन्स कं. : सेंट्रल ग्लास फॅक्टरी : आयुर्वेद रसशाळा लि : उद्यम : कैसरी इंडस्ट्रियल्स लि. : साठे बिस्किट कंपनी : अब्दुल हुसेन अल्लावक्षजी : धि सेंट्रल पॉटरीज लि. : विष्णू फार्मसी : दि सह्याद्रि विमा कंपनी लि. : आयुर्वेदाश्रम फार्मसी लि.

### यशवन्त म्यूचुअल विमासंस्था

ही विमासंस्था श्री. अण्णाराव लिमये यांनीं श्री. बापूराव गोरे, श्री. विश्वनाथराव गवंडी व इतर स्नेही मंडळींच्या सहाय्यानें १९४३ सालीं काढली. श्री. लिमये यांनीं सुरवातीला रु. ५२००० चें ऋण काढलें. बेसुमार महागाई, मोठ्या व स्थिर झालेल्या, अस्तित्वांत असलेल्या असंख्य विमा संस्था, विमा विधीप्रमाणें येणारी निरनिराळीं बंधनें यांतून कसा काय मार्ग निघेल याची मोठीच चिंता होती. भांडवलाच्या अभावीं संस्था संपुष्टांत येण्यासारखी परिस्थिति दोनदां निर्माण झाली, परंतु त्या सर्वाला धैर्यानें व शांतपणें तोंड देऊन श्री. अण्णाराव लिमये यांनीं आयुर्विमा क्षेत्रांत 'यशवन्त'ला मानाचें स्थान प्राप्त करून दिलेलें आहे. विनाकारण दिमाखाला बळी न पडतां झाडलोट करण्यापासून पत्रें घरोघरीं पोंचविण्यापासून, लोकांच्या घरोघर जाऊन हप्ते गोळा करण्यापासून तें मॅनेजिंग डायरेक्टरचीं सर्व कामें करण्यापर्यंत कामें त्यांनीं केलेलीं. अत्यंत रोखठोक व्यवहार, दीर्घपरिश्रम, विमेदारांशीं सौजन्यपूर्ण वागणूक, प्रतिनिधींशीं स्नेहीपणानें वागणें, यामुळें सार्वजनिक कंपन्यांच्या क्षेत्रांत एक नवीन आदर्श असा पायंडा त्यांनीं पाडलेला आहे. विमाक्षेत्रांत आयुष्यच्या आयुष्य घालविलेले लोकहि असें म्हणूं लागले आहेत कीं 'यशवंत'चा व्यवहार हा आदर्श आहे.

श्री. लिमये यांच्या दक्षतेमुळें संस्थेला पहिल्याच मूल्यमापनांत लाभ झालेला आढळून आला आहे हे निःसंशय प्रशंसनीय आहे. पहिल्या मूल्यमापनांत लाभ झालेला दाखविणाऱ्या हाताच्या बोटावर मोजतां येण्यासारख्या कंपन्या आहेत; त्यांतून यशवंत ही तर म्यूचुअल विमा कंपनी म्हणजे तिच्याजवळ भांडवल नाहीं. अशा परिस्थितींत लाभ होणे ही फारच कठीण गोष्ट होती. संस्थेच्या शाखाही मुंबई, बडोदे, नाशिक, नागपूर, पाटणा, गोहत्ती, कलकत्ता, कोल्हापूर, बेळगांव, बंगलोर इतक्या ठिकाणीं निघालेल्या आहेत.

विमा व्यवसाय म्हणजे टाकाऊ असें मानण्याची लोकांची प्रवृत्ति असते. परंतु श्री. लिमये यांनीं त्याला निराळें वळण लावून त्या व्यवसायाला व स्वतःला मानाचें स्थान प्राप्त करून घेतलेलें आहे.








ता. २ ऑक्टोबर १९४८ला इमारतींचें उद्घाटन, नवभारत छापखान्याची सुरुवात व महात्मा गांधींच्या फोटोचें अनावरण श्री. मुरारजीभाई देसाई, गृहमंत्री, मुंबई यांचे हस्तें होणार.

# नवभारत प्रकाशन लिमिटेड.

( इंडियन कंपनीज ॲक्ट सन १९१३ अन्वयें नोंदविली आहे. )
शेअर्स विक्री सुरू आहे.

**अधिकृत भांडवल रुपये** १०,००,००० दहा लक्ष.

१०० शंभर रुपयांचा एक भाग याप्रमाणें १०,०००; दहा हजार भागांमध्यें विभागलेलें.

**विक्रीस काढलेलें भांडवल** रुपये ५,०००. पांच हजार भागांमध्यें विभागलेलें.

**अर्जासोबत** :— प्रत्येक भागामागें रु. २५ पंचवीस प्रमाणें. **अर्जमंजुरीनंतर** :— प्रत्येक भागामागें रु. २५ पंचवीस प्रमाणें.

बाकीची रक्कम जरुरीप्रमाणें दोन सारख्या हप्त्यांनीं मागविण्यांत यावयाची आहे. त्या मागणीमध्यें निदान तीन महिन्याची मुदत राहील.

## संचालक मंडळ

१ श्री. **शांतीलाल एस्. शाह**. बी. ए., एल्एल्. बी.
सॉलिसिटर. एम्. एल. सी.
उपाध्यक्ष- मुंबई वरिष्ठ विधिमंडळ, मुंबई.
२ दे. भ. **शंकर दत्तात्रय देव**, शिवाजीनगर पुणें ५.
३ श्री **जंबूआण्णा बाबाजी आरवाडे**, ५५ वाळकेश्वर, मुंबई.
४ श्री. **सरदार खं. रा. विंचूरकर**, बी. ए., एल्. एल्. बी., कृष्णा–कित्तूर ( बेळगांव )
५ श्री. **ल. प्र. कोरगांवकर**, जनरल मर्चंट, शाहूपुरी–कोल्हापूर.
६ श्री. **सदाशिव शिवराम निसळ**, बँकर आणि आयात–निर्यात व्यापारी. अहमदनगर व मुंबई.
७ श्री. शेठ **देवकरण सुरजकरण माल्रू**, जनरल मर्चंट, माधवनगर (बुधगांव)
८ श्री. **ब. प्र. बडवे**, पंढरपूर.
९ श्री. **शं. वि. सोवनी**, बी. एस्सी., कॉर्पोरेटर व शास्त्रीय उपकरणांचे विक्रेते, मुंबई.
१० श्री. **शां. वि. गोरेगांवकर**, सोन्या–चांदीचे व्यापारी, बोर्ली मांडला (जिल्हा–कुलाबा)
११ श्री. **शं. वि. जोशी**, कागदाचे व्यापारी, मुंबई.
१२ श्री. **बाळकृष्ण विठ्ठल शिखरे**, सांगली ( मॅनेजिंग डायरेक्टर )





## बँकर्स

१ दी बँक ऑफ महाराष्ट्र लि. पुणें आणि शाखा
२ दी बॉंबे प्रॉव्हिन्शियल को-ऑपरेटिव्ह बँक लि. मुंबई आणि शाखा.
३ दी सेंट्रल बँक ऑफ इंडिया लि. मुंबई आणि शाखा
४ दी मिरज स्टेट बँक लि. मिरज आणि शाखा.
५ दी न्यू सिटिझन बँक ऑफ इंडिया लि. मुंबई आणि शाखा.
६ दी सांगली बँक लि. सांगली आणि शाखा.

## हिशेब तपासनीस

१ मेसर्स **व्ही. बी. कीर्तने आणि** कं. इनकॉर्पोरेटेड अकान्टन्ट्स आणि रजिस्टर्ड अकौन्टन्ट्स, पुणें.
श्री. **पां. जी. भागवत**, रजिस्टर्ड अकौन्टन्ट, मुंबई.

## कायद्याचे सल्लागार

१ मेसर्स **भाईशंकर कांगा** आणि **गिरिधारीलाल** सॉलिसिटर्स, नोटरी पब्लीक, (ऑलबर्ट--
--बिल्डिंग) फोर्ट, मुंबई.
२ श्री. **भा. म.** उर्फ **बापूसाहेब गुप्ते**, एम्. ए., एल्. एल्. बी., एम्. एल. ए. (मुंबई)
सभासद, घटना समिति (न्यू दिल्ली) पुणें नं. ४
३ श्री. **भिमाजी बाळाजी पोतदार**, बी. ए., एलूएल्. बी.
अध्यक्ष, बेळगांव नगरपालिका, बेळगांव.

## कायद्याचे स्थानिक सल्लागार

श्री. **के जी. कुलकर्णी** बी. ए., एल्एल्. बी. वकील, सांगली

## रजिस्टर्ड ऑफिस
## मिरज

---

## उद्देश

(१) अर्वाचीन साधनांनीं युक्त असा एक नमुनेदार छापखाना सुरू करावयाचा.
(२) देशाच्या प्रगतीस पोषक अशीं प्रकाशनें काढावयाचीं.
(३) [१] स्वतंत्र भारताची सार्वत्रिक सुखसमृद्धि व्हावी, [२] बहुसंख्य लोकांच्या सर्वांगीण विकासाचा विचारपूर्वक आणि योजनापूर्वक अंमल व्हावा आणि [३] भेदातीत आणि विधायक विचारास चालना देणारे लेख आणि बातम्या प्रसिद्ध करण्याच्या हेतूनें दैनिक, साप्ताहिक आणि मासिक चालवावयाचें.

## कार्यास सुरुवात

मिरज स्टेशनजवळ कंपनीनें एक मोठी जागा खरेदी केली आहे आणि ता. १७ ऑगस्ट रोजीं श्री. ना. वैकुंठलालजी मेहता, अर्थमंत्री, मुंबई यांच्या हस्तें इमारतीच्या पायाचा दगड बसविण्याचा समारंभ झाला. ता. २ ऑक्टोबर रोजीं कंपनीच्या इमारतींत छापखान्यास सुरुवात व्हावयाची आहे. ता. ३० जानेवारी १९४९ इ. रोजीं कंपनीचें साप्ताहिक सुरू होणार आहे. दरम्यान व नंतर आजच्या समाजजीवनास आवश्यक अशीं लहान लहान पुस्तकें प्रसिद्ध होतील. जनतेच्या सहानुभूतीच्या आणि आस्थेच्या भांडवलावर कंपनी आपलें उद्दिष्ट सिद्धीस नेईलच नेईल.

पत्रव्यवहाराचा पत्ता :— मॅनेजिंग डायरेक्टर— नवभारत प्रकाशन लि. मिरज (दक्षिण महाराष्ट्र)

अनुक्रमणिका






लाभ! ..................लाभ!! .................. लाभ!!!

## दुंदुभी वाजूं लागल्या

पहिल्याच मूल्य मापनांत लाभ. हें भाग्य फारच थोड्या विमा संस्थांना लाभते. त्यांतून भांडवल नसलेल्या विमा कंपन्यांना तर आतांपर्यंत लाभलेलेंच नाहीं. म्हणजे आम्हीं विमेदारांची सेवा किती चोख केली हें सिद्ध झालें आहे. त्यांच्या कसोटीला आम्हीं पूर्णपणें उतरलों आहोंत.

# यशवन्त म्यूचुअल विमा संस्था मर्यादित

५०६ सदाशिव, पुणें २.

### संचालक मंडळ

१] **श्री. का. श्री. (बापूराव) गोरे,** (अध्यक्ष) पुणें. गोरे आणि मंडळी, म्युनिसिपल सभासद, डायरेक्टर हेलियम बॅटरीज लि. पुणें.

२] **श्री वि. गो. गवंडी.** पुणें. शहाबादी फरशांचें व्यापारी, कॉंट्रॅक्टर, अध्यक्ष युनायटेड भारत कन्स्ट्रक्शन लि. पुणें.

३] **श्री. शे. दा. कट्टी,** कापडाचे व्यापारी, बेळगांव. डायरेक्टर, स्वस्तिक विव्हिंग मिल्स लि.

४] **श्री. व. ना. भिडे,** बी. ए. एल्एल्. बी. वकील, डायरेक्टर, हेलियम प्रॉडक्टस लि. पुणें.

५] **श्री. शेट वि. ना. शहा,** सोन्या-चांदीचे व्यापारी, तळेगांव दाभाडें. भागीदार, हिंदुस्थान ऑईल मिल्स, पुणें. भागीदार, जनरल ट्रेडिंग कंपनी, मुंबई.

६] **श्री. डॉ. अ. र. बापट,** कोल्हापूर.

७] **श्री. श्री. कृ. (बापूराव) कामत** श्रीकृष्ण विव्हिंग मिल्स, बेळगांव

८] **श्री. प्रा. वि. म. दांडेकर,** एम. ए. गोखले अर्थशास्त्र संशोधन संस्था, पुणें.

९] **श्री. र. वा. देसाई,** फळांचें व्यापारी, रत्नागिरी.

१०] **श्री. स. गो. जोशी,** बी. ए. एल्एल्. बी. वकील, माधवनगर ऑईल मिल्स, कुरुंदवाड.

११] **श्री. डॉ. ग. त्र्यं. घैसास,** म्यु. सभासद, पुणें. आरोग्य मंडळ सभासद, पुणें. चेअरमन, रेशनिंग ॲडव्हायसरी कमिटी.

१२] **श्री. द. रा. लिमये,** (आणाराव) बी. ए. एल्एल्. बी. (कार्य संचालक)

### —शाखा—




**म. शि. भिडे**
बी. ए. बी. कॉम्.
अकौन्टन्ट.

**द. रा. लिमये**
बी. ए. एल्एल्. बी.
कार्य संचालक






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

कुटुंबांतील प्रत्ये व्यक्तीच्या उपयोगाचें लोकप्रिय मासिक

# उद्यम

शेती, बागायती, उद्योगधंदे व व्यापारविषयक मासिक

धर्मपेठ, नागपूर

वार्षिक वर्गणी मनिऑर्डरनें रुपये सहा

उद्यमनें प्रसिद्ध केलेलीं नित्योपयोगी पुस्तकें

| | रु. आ. | | रु. आ. |
|---|---|---|---|
| १ एनॅमलिंग | ०– ८ | ९ शाई तयार करणें | १– ८ |
| २ बँका व त्यांचे व्यवहार | ०–१२ | १० खतें | १– ८ |
| ३ लिंबाची लागवड | ०–१२ | ११ सौंदर्यसाधनें | १– ८ |
| ४ गव्हाची लागवड | ०–१२ | १२ दुग्धव्यवसाय भाग २ रा | १– ८ |
| ५ विमाव्यवसाय | १– ० | १३ कोंबड्या पाळणें | १– ८ |
| ६ चर्मकलाव्यवसाय | १– ० | १४ फळांचे टिकाऊ पदार्थ | २– ० |
| ७ शेअर्सचा व्यापार | १– ४ | १५ दुग्धव्यवसाय भाग १ ला | २– ० |
| ८ तेजीमंदी | १– ४ | १६ सुलभ फोटोग्राफी | २– ० |

१७ संत्र्यांची लागवड २–०

कोणतेंहि पुस्तक वाचून पहा व उपयोगी माहिती मिळवा.

---

कैसरीचे बालेंदु

मुलांचे — दंतरोग, रिकेटस् वगैरे विकारांवर उत्तम टॉनिक

कैसरी इंडस्ट्रियल्स लि. अहमदनगर

---

अन्नटंचाईच्या काळांत पौष्टिक अन्न पुरेसें मिळत नाहीं

## साठे बिस्किटें, चॉकोलेट व कोको

ती उणीव भरून काढतील

कारखाना — साठे बिस्किट कंपनी, चॉकोलेट वर्क्स, पुणें २.






